# नाथमाधव

## त्रोटक चरित्र व आठवणी

संपादक

पुरुषोत्तम बाळकृष्ण कुळकर्णी

प्रस्तावना

श्री. वि. स. खांडेकर

किंमत २ रुपये

# नाथमाधव

## त्रोटक चरित्र व आठवणी

संपादक

**पुरुषोत्तम बाळकृष्ण कुळकर्णी**

प्रस्तावना

**श्री. वि. स. खांडेकर**

किंमत २ रुपये

# दोन शब्द

*

श्री. पु. बा. कुळकर्णी हे चरित्रकार या नात्यानें मराठी वाचकांना सुपरिचित आहेत. **'नाथमाधव—चरित्र व आठवणी'** हें छोटें पुस्तक संपादित करून आज ते त्याच प्रकारचें एक आवश्यक साहित्यविषयक कार्य करीत आहेत.

केशवसुत विद्यार्थी असतांना दुर्मुखलेला म्हणून कुणींतरी त्यांचा उपहास केला. त्यावेळीं त्यांनीं त्याला अभिमानानें उत्तर दिलें, 'माझ्या प्रतिभेंतून अमृततुल्य काव्याचा ओघ वाहणार आहे. त्या अमृताचा आस्वाद घेतांना कवीचा चेहरा कसा होता हें कुणींहि विचारणार नाहीं.' केशवसुतांचें हें उत्तर स्वाभिमानाच्या दृष्टीनें बरोबर असेल. पण अनुभवाच्या कसोटीवर मात्र तें तितकेंसें खरें ठरणार नाहीं. आपला प्रिय लेखक कसा होता, याविषयींचें पाश्चात्य देशांतील कुतूहल पाहिलें कीं मोठमोठ्या मुत्सद्यांना आणि बड्या बड्या कारखानदारांना सुद्धां साहित्यिकाच्या भाग्याचा हेवा वाटेल. आपला आवडता लेखक कोणत्या प्रकारच्या खुर्चींत बसत असे, त्याची लिहिण्याची वेळ कोणती, त्याला चहा आवडे कीं कॉफी आवडे, त्याला स्फूर्ति कशी येई, तो कोणत्या रंगाच्या शाईनें लिहीत असे, असल्या थोड्या फार बालिश वाटणाऱ्या प्रश्नांपासून त्याच्या आयुष्यांत किती प्रेयसी आल्या, त्याचें खरें प्रेम कुणावर होतें, त्याचें जीवनविषयक तत्त्वज्ञान काय होतें, विशिष्ट परिस्थितींत तो अशाच रीतीनें कां वागला, त्याचें जीवन त्याच्या वाङ्मयांत कुठें कुठें प्रतिबिंबित झालें आहे, अशा गंभीर प्रश्नांपर्यंत तिकडील वाचक आणि टीकाकार चर्चा करीत असतात. स्टेंडाल ( Stendhal ) हा फ्रेंच कादंबरीकार आपल्याकडे फारसा माहीत नाहीं. पण 'स्टेंडाल अर्थात् सुखाचा शोध' या नांवानें मॅथ्यू जोसेफसननें लिहिलेलें त्याचें चरित्र मीं नुक्तेंच वाचलें. साडेचारशें पानांचा ग्रंथ आहे हा. त्यांत स्टेंडालचें बालपणापासूनचें चरित्र इतक्या बारकाईनें चित्रित केलें आहे कीं, ग्रंथकार जणुं कांहीं त्याचा

बालमित्रच असला पाहिजे, त्याशिवाय त्याला आपल्या नायकाच्या स्वभावांतले आणि आयुष्यांतले इतके बारकावे दिग्दर्शित करतां आलेच नसते असें वाचकाला वाटतें. जीवन आणि वाङ्मय यांचे धागेदोरे किती सूक्ष्मतेनें गुंफले गेलेले असतात, लेखकाच्या भावभावनांची आणि विचारा-विकारांची छाया त्याच्या वाङ्मयावर अदृश्य रीतीनें कशी पसरलेली दिसते, हें या पुस्तकांत स्पष्टपणानें दृष्टोत्पत्तीला येतें. झ्वाइगचीं 'Adepts in self-portraiture' व 'Three Masters' हीं याच प्रकारचीं पण अधिक अभिजात व प्रतिभायुक्त पुस्तकें.

लेखकाविषयींचें हें कुतूहल पहिल्यापासूनच आपल्याकडे कमी आहे. आम्ही 'मेघदूत' मिटक्या मारीत वाचूं. पण यक्षानें मेघाला जिथें आपला संदेश सांगितला, तो हा कालिदासाच्या आयुष्यांतला पर्वत म्हणून त्याचें दर्शन घ्यायला कांहीं आम्ही धांवणार नाहीं. संशोधन हें भारतीय मनोवृत्तीला जणुं कांहीं आपलें सावत्र मूलच वाटतें.

अशा स्थितींत आधुनिक लेखक व कवी यांच्यासंबंधानें जेवढें विविध व चिकित्सक साहित्य उपलब्ध असावें तेवढें नाहीं, यांत अस्वाभाविक असें काय आहे? सर्व दृष्टींनीं विचार केला तर गेल्या पाऊणशें वर्षांतील ललित लेखकांत अग्रपूजेचा मान हरिभाऊ आपट्यांना द्यावा लागेल. अशा प्रतिभाशाली ग्रंथकारावर त्याच्या मातृभाषेंत काय काय लिहिलें गेलें आहे याचा आढावा आपण घेऊं लागलों तर तीन चार पुस्तकें मिळतील. नाहीं असें नाहीं. पण तीं मुख्यतः माहितीवजा आहेत. रसिकता व चिकित्सकता, तत्कालीनता आणि चिरंतनता, प्रतिभाविलास आणि जीवनविकास या सर्वांची सांगड घालून त्यांतून निष्पन्न होणाऱ्या निष्कर्षांच्या अनुरोधानें हरिभाऊंचें मूल्यमापन अद्यापि व्हावयाचें आहे.

म्हणूनच नाथमाधवांच्या बाबतींतला हा उपक्रम मला अभिनंदनीय वाटतो. या पुस्तकांत प्रारंभीं संपादकांनीं नाथमाधवांचें जें छोटें चरित्र दिलें आहे तें मोठें हृदयस्पर्शी आहे. प्रत्येकानें आपलें जीवन प्रामाणिकपणें चित्रित

केलें तर त्यांतून एक चांगली कादंबरी निर्माण होईल असें म्हणण्याचा प्रघात आहे. पण मला वाटतें, कित्येकांच्या आयुष्यांचें कादंबरीपेक्षां नाटकाशींच अधिक साम्य असतें. नाथमाधवांचें आयुष्य अशा नाट्यपूर्ण घटनांनीं भरलेलें आहे. एका शूर, धाडसी तरुणाचा प्रेमविवाह ठरतो, सुखी संसाराचीं स्वप्नें पाहत तो लग्नाकरितां रजा मागतो, रजा मंजूर होते, पण त्याच दिवशीं वरिष्ठाला सिंहगडासारख्या ठिकाणीं शिकारीकरितां जायची लहर येते. तो या साहसी तरुणाला आपल्याबरोबर येण्याचा आग्रह करतो, पण शिकारीला गेलेल्या या तरुणाची दैवच शिकार करतें. शिकार करतांना मागें तोल जाऊन त्याचा कडेलोट होतो. या अपघातामुळें तो तरुण जन्माचा पंगु बनतो आणि सर्व सुखांना मुकतो; पण शेवटीं दैवाचा डाव तो त्याच्यावर उलटवितो. पंगुत्वांतून त्याची प्रतिभा विकसित होते. एका जागीं खिळून राहिलेल्या त्याच्या शरीरांतलें मन सर्वकाळीं, सर्वस्थळीं स्वच्छंदानें संचार करूं लागतें. दुर्बल देहाची भरपाई आत्म्याच्या सामर्थ्यानें केली जाते.

किती रोमहर्षक जीवनकथा आहे ही! आणि नवल हें कीं तिच्यांतला एकहि दुवा कल्पित नाहीं. पाश्चात्य देशांत असा ग्रंथकार जन्माला आला असता तर त्याचा हा विलक्षण जीवनसंग्राम रुपेरी पडद्यावर केव्हांच चित्रित झाला असता!

नाथमाधवांनीं आयुष्याच्या आरंभीं लष्करी खात्याकडे धांव घेतली ती कांहीं उगीच नाहीं. ते जन्मतःच सैनिक होते. शेवटपर्यंत ते सैनिकच राहिले. आमरण त्यांनीं दुर्दैवाशीं झगडा केला, आणि या विषम संघर्षांत शेवटीं ते यशस्वी ठरले. त्यांनीं कादंबरीकार म्हणून मराठी वाङ्मयांत आपलें नांव अमर केलें.

स्वातंत्र्यशाहीर गोविंदाची जीवनकथा अशीच आहे. शरीरानें पंगु असलेल्या माणसांत वास करणाऱ्या या तेजस्वी आत्म्यांचें दर्शन घेतांना माझ्या मनांत येतें—त्यांतल्या तेजाचा लहानसा कण जरी सर्वसामान्य माणसांनीं संपादन केला तरी मानवी जीवनावर पसरलेली अवकळा अंशतः नाहींशी होईल.

व्यक्ति व वाङ्मय या दोन्ही नात्यांनीं नाथमाधवांच्या एकवीस स्नेह्यांनीं व चाहत्यांनीं या पुस्तकांत लिहिलें आहे. त्यांच्या लेखनाचें स्वरूप त्रोटक असलें तरी या पद्धतीमुळें नाथमाधवांविषयींच्या अनेक हृदयंगम आठवणी वाचून वाचकाचें मन हेलावल्यावांचून राहत नाहीं. प्रत्येकाच्या लेखनांत त्याच्या त्याच्या व्यक्तित्वाचें प्रतिबिंब पडलें असल्यामुळें हे लेख अधिकच मनोरंजक वठले आहेत. उदाहरणच द्यायचें तर तें ठाकऱ्यांच्या आठवणींचें देतां येईल. गौरवपर व माहितीपूर्ण असे दोन्ही प्रकारचे लेख या छोट्या पुस्तकांत आहेत. त्या सर्वांचें रसिक व चिकित्सक बुद्धीनें सार काढलें कीं नाथमाधवांची मूर्ति डोळ्यांपुढें उभी रहायला अडचण पडूं नये. अशा प्रकाऱच्या लेखांत त्याच त्याच गोष्टींची आवृत्ति होणें अपरिहार्य असतें. सिंहगडावरला अपघात किंवा अशाच दुसऱ्या कांहीं गोष्टी वाचकाला पुनः-पुन्हां वाचाव्या लागतात याचें कारण हेंच आहे.

कादंबरीकार नाथमाधवांसंबंधानें या आठवणींत सर्वांकडून थोडें थोडें लिहिलें गेलें असलें तरी विवेचन या दृष्टीनें तें फार अपुरें ठरेल. केवळ आपल्या हयातींतच नव्हे तर मृत्यूनंतरहि ज्यांची लोकप्रियता दीर्घकाळ कायम टिकते अशा विरळ लेखकांत नाथमाधवांची गणना होते. साधी व सुबोध भाषा, कथालोलुप वाचकाला रंजविणारी रचना, सात्त्विक व तेजस्वी अशा भावनांचा आविष्कार, इत्यादि गुणांमुळें त्यांचें आकर्षण आजतागायत सर्वसामान्य वाचकाला वाटत आलें आहे. हरिभाऊंची प्रतिभा, वामनराव जोश्यांची वैचारिकता, फडक्यांची कला, इत्यादिकांनीं मराठी कादंबरीच्या विकासाला जसें मोलाचें साहाय्य केलें आहे, तसा नाथमाधवांनींहि तिच्या लोकप्रियतेला मोठ्या प्रमाणांत हातभार लावला आहे. काळ, कला, व्यक्तित्व, वैशिष्ट्यें इत्यादि दृष्टींनीं त्यांच्या या विपुल कादंबरीवाङ्मयाची चिकित्सा विद्वान रसिकांनीं यापूर्वींच करायला हवी होती. या छोट्या पुस्तकानें तरुण पिढींतील एकाद्या अभ्यासकाला तशी प्रेरणा दिली तर श्री. कुलकर्णी यांचे परिश्रम पूर्णपणें सार्थकीं लागतील.

राजारामपुरी, कोल्हापूर.<br>
ता० १-६-१९५३

**वि. स. खांडेकर**

## कै. सौ. अलका वीरेंद्र पितळे



यांच्या पुण्यस्मृतीस

सादर समर्पण

# संपादकीय निवेदन
# व
# आभारप्रदर्शन

जनमनाचें सात्त्विक मनोरंजन करून पारतंत्र्याच्या काळांत जनतेला कर्तव्याची जाणीव करून देणारे वीर कादंबरीकार कै. नाथमाधव यांच्या निधनास पंचवीस वर्षांचा काळ लोटला, तरी वाचकांच्या मनावरील त्यांच्या कादंबऱ्यांची पकड अद्यापिही कायम आहे. अजूनही त्यांच्या कादंबऱ्या आबालवृद्धांकडून आवडीनें वाचल्या जात आहेत. विपरीत परिस्थितीशीं टक्कर देऊन त्यांनीं विपुल, त्याचप्रमाणें वाचकांच्या विचारांस चालना देणाऱ्या वाङ्मयाची निर्मिती केली. कितीही बिकट व असहाय्य परिस्थिती वांट्यास आली तरी निराश न होतां मनुष्यानें आपलें कर्तव्यपालन अत्यंत कसोशीनें करावें व जो मनावर घेईल त्याला तसें करतां येतें, हाच त्यांचा जीवनसंदेश आहे. पडत्या काळांतही घनघोर जीवनसंग्रामांत यश कसें मिळवावें हें त्यांनीं स्वतःच्या उदात्त उदाहरणानें सर्वांना दाखवून दिलें.

अशा या थोर व झुंझार कादंबरीकाराचें जीवन नाट्यपूर्ण व रोमहर्षणकारक असल्यास नवल नाहीं; परंतु त्यांचें जीवनचरित्र किंवा त्यांच्या जीवनविषयक आठवणी फारशा उपलब्ध नाहींत. श्री. वि. द. चिंदरकर यांनीं लिहिलेल्या छोटेखानी चरित्राचा या ठिकाणीं साभार उल्लेख करणें जरूर आहे. बऱ्याच वर्षांपूर्वी ( १९३६ ) नाथमाधवांच्या कांहीं लेखक मित्रांकडून व चहात्यांकडून महत् प्रयासांनीं मिळविलेल्या आठवणींचें एक छोटें पुस्तक आम्हीं प्रसिद्ध केलें होतें; परंतु त्याच्या प्रती फार थोड्या काढण्यांत आल्यामुळें त्याचा फारसा प्रचार होऊं शकला नाहीं व आज तें पुस्तकही दुर्मिळ झालें आहे.

त्यानंतर नाथमाधवांच्या आठवणी मिळविण्याचा आमचा उद्योग सतत चालूच होता. ज्यांनीं ज्यांनीं आतांपर्यंत या उद्योगांत सहाय्य केलें त्यांचे आम्ही आभारी आहोंत. नाथमाधवांच्या डायऱ्या, तसेंच अन्य मार्गांनीं मिळवितां आली तेवढी माहिती मिळवून तिच्या आधारें लिहिलेलें नाथमाधवांचें एक त्रोटक चरित्र या आठवणींबरोबर प्रसिद्ध करण्यांत येत आहे. हें चरित्र व आठवणी वाचणाऱ्या वाचकापुढें

नाथमाधव कसे होते व कोणत्या परिस्थितींत त्यांनीं कादंबरीलेखन केलें व आपलें असहाय्य परंतु स्फूर्तिदायक जीवन त्यांनीं कशा रीतीनें घालविलें याचें चित्र उभें करावें, हाच यांत उद्देश आहे. तो अंशतः तरी साध्य व्हावा एवढीच आमची आकांक्षा आहे.

या छोट्याशा पुस्तकास महाराष्ट्राचे आवडते कादंबरीकार श्री. वि. स. खांडेकर यांनीं प्रस्तावनेदाखल 'दोन शब्द' लिहावे अशी मनापासून इच्छा होती. तिला अनुसरून आम्हीं व आमचे परम स्नेही प्रा. का. धों. पेडणेकर एम्. ए. यांनीं त्यांस विनंति केली व ती मान्य करून त्यांनीं वेळांत वेळ काढून 'दोन शब्द' लिहून पाठविले, याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच होतील.

लेखकानें ग्रंथप्रकाशनाच्या क्षेत्रांत सहसा पाऊल टाकूं नये. कारण तो त्याचा प्रांत नव्हे. असें असतांही आम्हीं जाणूनबुजून तें धाडस केलें; परंतु आमच्या अनेक नाथमाधवप्रेमी मित्रांच्या व चहात्यांच्या प्रेमळ व उदार सहकार्यामुळें पाय फारसा न भाजतां त्यांतून पार पडतां आलें, हें लिहिण्यास समाधान वाटतें.

नाथमाधवांचे निस्सीम अभिमानी, चहाते व त्यांचे निकटवर्ती नातलग श्री. वीरेंद्र वसंतराव पितळे यांनीं ग्रंथप्रकाशनासाठीं उदारहस्तें सहाय्य करून या कार्यांत जें उत्तेजन दिलें तें चिरस्मरणीय तसेंच अभिनंदनीय आहे. नाथमाधव स्मारक समीतीनें स्मारकाच्या दृष्टीनें अशा प्रकाशनाचें महत्त्व ओळखून परत-फेडीच्या रूपानें जें आर्थिक सहकार्य केलें त्याबद्दल आम्हीं कितीही कृतज्ञताभाव प्रगट केला तरी तो थोडाच होईल. तसेंच आमचे सन्मित्र, चहाते व नाथमाधव-प्रेमी श्रीमान् भालचंद्र रावजी शंकरशेट बी. ए. म्यु. कौन्सिलर, श्री. दत्ताराम गणपतराव ऊर्फ भाईजी शेटे जे. पी. ऑ. प्रे. मॅजिस्ट्रेट, सौ. आनंदीबाई लक्ष्मणराव कवळे, श्री. गजाननस्वामी बोरकर, श्री. दत्ताराम धोंडो ऊर्फ भाई-साहेब देवरूखकर जे. पी. ऑ. प्रे. मॅ. व म्यु. कौन्सिलर, वैद्यराज रामचंद्र सदाशिव वेदपाठक, वैद्यभूषण विष्णुपंत मार्वेकर, श्री. जगन्नाथ विठ्ठल जामसंडेकर, श्री. वामन लक्ष्मण डेरे व श्री. काशीनाथ बाबाजी [illegible] यांनीं याच वेळीं नव्हे तर वेळोवेळीं आमच्या वाङ्मयकार्यास उदारहस्तें हातभार लावून आम्हांला कायमचें ऋणी करून ठेविलें आहे. त्याचप्रमाणें आमच्या विनंतीस मान देऊन ज्यांनीं

ज्यांनीं जाहिरातींच्या रूपानें ग्रंथप्रकाशनास हातभार लाविला त्यांचे आम्ही आभारी आहोंत. या पुस्तकाचा सुंदर कव्हर–डिझाईन अत्यंत थोड्या वेळांत व विनामूल्य करून देणारे नाणावलेले रेखाचित्रकार श्री. दि. ल. धारगळकर यांनीं, त्याचप्रमाणें सर्वोत्कृष्ट ब्लॉक्स बनविण्यांत कुशल असे श्री. एच्. एस्. धारगळकर, मालक–'प्रेस प्रोसेस स्टुडिओ' यांनींही अल्पावधींत व आपुलकीनें जरूर ते ब्लॉक्स तयार करून दिले, याबद्दल त्यांचा कृतज्ञतापूर्वक ऋणनिर्देश करणें अत्यंत जरूर आहे. कै. नाथमाधव यांचे पुतणे व आमचे मित्र श्री. विश्वासराव खं. पितळे यांनीं आम्हांला जरूर असलेली माहिती तसेंच दुर्मिळ असे फोटो पुरवून या पुस्तकाच्या उपयुक्ततेंत व सौंदर्यांत भर घातल्याबद्दल त्यांना शतशः धन्यवाद.

शेवटचे परंतु महत्त्वाचे आभार मानावयाचे राहिले ते निर्णयसागर प्रेसचे मालक, मॅनेजर व प्रेसमधील उत्साही कामगार मंडळी यांचे. या सर्वांनीं आम्हांला अनंत सवलती देऊन व वेळप्रसंगीं त्रास सोसून ग्रंथप्रकाशनाच्या बाबतींत जें सहकार्य केलें, त्याचें स्मरण आम्हांला चिरंतन काळपर्यंत राहील. या मंडळीचें सहकार्य आम्हांला नेहमींचेंच लाभलें आहे.

याप्रमाणें अनेकांचें प्रेमळ सहकार्य लाभल्यामुळें ही अल्पशी वाङ्मयसेवा आमच्या हातून घडत आहे. तिचें श्रेय आमच्या उपरोक्त सर्व सहकाऱ्यांस देऊन व पुन्हां एकवार त्यांचे आभार मानून आम्ही वाचकांची रजा घेतों.

बरोज लेन, टोपीवाला बिल्डिंग,
मुंबई नं. २

सर्वांचा नम्र,
**पु. बा. कुळकर्णी**

# अनुक्रमणिका

दोन शब्द—ले. वि. स. खांडेकर

आभार प्रदर्शन

# विषयानुक्रमणिका

| विषय | पृष्ठ |
| --- | --- |
| त्रोटक चरित्र | |
| १ रम्य तें बालपण ! | १ |
| २ सिंहगडावरील शिकार ! | ७ |
| ३ साहित्यसेवेचा ओनामा | १० |
| ४ ऐतिहासिक कादंबऱ्यांची पार्श्वभूमि | १८ |
| ५ नाथमाधवांचा कर्मयोग | २७ |
| आठवणी–लेखक | |
| १ श्री. ना. वि. कुळकर्णी | ३३ |
| २ प्रा. ना. के. बेहरे, एम्. ए. बी. एस्. सी. | ४६ |
| ३ रा. सा. गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए. | ४९ |
| ४ म. भा. भू. ज. र. आजगांवकर | ५४ |
| ५ श्री. धोंडो रघुनाथ तेंडूलकर | ५६ |
| ६ श्री. भार्गवराम विठ्ठल वरेरकर | ६३ |
| ७ श्री. यशवंत नारायण टिपणीस | ७० |
| ८ श्री. केशव सीताराम ठाकरे, प्रबोधनकार | ७५ |
| ९ श्री. पी. आर. लेले, बी. ए. एलएल्. बी. | ८३ |

| | | |
|---|---|---|
| १० | श्री. विठ्ठल वामन हडप | ८७ |
| ११ | श्री. गणेश महादेव वीरकर | ९४ |
| १२ | श्री. श्रीपाद केशव नाईक | ९७ |
| १३ | शेठ दामोदर सांवळाराम यंदे | ९९ |
| १४ | महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार, बी. ए. | १०१ |
| १५ | श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर | १०२ |
| १६ | प्रा. श्रीकृष्ण स. भावे, एम्. ए. एलएल्. बी., पी. एच्. डी. | १०३ |
| १७ | प्रा. कृ. र. पोतदार एम्. ए. | १०५ |
| १८ | डॉ. मि. अ. परब, एम्. ए., पी. एच्. डी. | १०९ |
| १९ | श्री. अच्युत बळवंत कोल्हटकर | १११ |
| २० | प्रा. विश्वनाथ गोपाळ शेळ्ये, बी. ए. एलएल्. बी. | ११४ |
| २१ | प्रा. सौ. चारुशीला गुप्ते, एम्. ए. | १२५ |

# कै. नाथमाधव



जन्म—४ एप्रिल १८८२ ] [ मृत्यु—२१ जून १९२८

# नाथमाधव-चरित्र व आठवणी.

## त्रोटक चरित्र



प्रकरण पहिलें

## रम्य तें बालपण !

**नाथमाधव** यांचा जन्म मुंबईतील सुसंपन्न अशा पितळे घराण्यांत सोमवार ता. ३ एप्रील इ. स. १८८२ रोजीं झाला. व्यवहाराच्या दृष्टीनें सोइस्कर व सुटसुटीत असें नाथमाधव हें नांव त्यांनीं वाङ्मयक्षेत्रांत पदार्पण केल्यानंतर घेतलें असलें तरी त्यांचें पाळण्यांतील नांव होतें द्वारकानाथ माधवराव पितळे. सर्वसाधारणपणें पहातां त्यांच्या आयुष्याचे तेवीस तेवीस वर्षांचे असे दोन भाग पडतात. अपघातपूर्व जीवन व अपघातोत्तर जीवन यांमध्यें केवढी तरी क्रांतिकारक तफावत झालेली दिसून येते. सर्वच बाबतींत थारेपालट झाला मग नांवांत तरी थारेपालट कां होऊं नये ? तो क्रांतिकारक बदल होण्याचा, त्यांच्या जीवनांतील काळ येईपर्यंत, आपण त्यांना तूर्त द्वारकानाथ याच नांवानें संबोधूं या.

द्वारकानाथ बालपणीं अत्यंत व्रात्य व खेळाडू होते. अभ्यासापेक्षां त्यांचें लक्ष खेळांकडे फार असे; आणि पुढें वयोमानाबरोबर या खेळकर वृत्तीची वाढ होत गेली.

मराठी शिक्षण संपवून इंग्रजी शिक्षणासाठीं मुंबईतील आर्यन एज्युकेशन सोसायटीच्या हायस्कूलमध्यें कांहीं वर्षें घालविल्यानंतर ते बोरीबंदरजवळील न्यू हायस्कूलमध्यें दाखल झाले. अभ्यासापेक्षां क्रिकेटकडे त्यांचें विशेष लक्ष्य असे. येथें त्यांच्या या वृत्तीस उत्तेजन मिळूं लागलें.

६०।६५ वर्षांपूर्वीच्या त्या काळांत सारें विद्यार्थी–जग क्रिकेटनें भारलें गेलें होतें. आजही त्या खेळाचें महत्त्व कांहीं कमी झालेलें नाहीं. त्या खेळांत प्रावीण्य दाखविणाऱ्याचें नांव हां हां म्हणतां सर्वतोमुखीं होत असे. हायस्कूलच्या शील्ड सामन्यांत पितळे हटकून निवडून यावयाचेच. टोल्वाटोल्वी असो, गोलंदाजी असो वा क्षेत्ररक्षण असो; सर्वत्र त्यांची चमक दिसून येत असे. एकाद्या सामन्यांत पितळे खेळणार हें समजतांच त्यांचा नेत्रदीपक खेळ पाहाण्यासाठीं सारें क्रिकेटप्रेमी विद्यार्थीजग क्रीडांगणावर लोटत असे. या खेळांत वेळोवेळीं प्रगट केलेल्या प्रावीण्यामुळें त्यांनीं पदकें, पोषाख व नाना प्रकारचीं बहुमोल बक्षिसें मिळविलीं होतीं.

क्रीडांगणावर आपल्या यशस्वी बॅटीच्या बळावर द्वारकानाथ पितळे यांनीं असंख्य लहानथोर प्रेक्षकांकडून टाळ्या मिळवाव्या. सर्वांकडून वाहवा मिळविणें व सर्वांच्या कौतुकाचा विषय होऊन रहाणें ही जीवनांतील लहानसहान घटना नव्हे. त्यामुळें आपलें आयुष्य हें पराक्रमाच्या गोष्टी करून दाखवून सर्वांच्या कौतुकाचा विषय होऊन रहाण्यासाठीं आहे, असें द्वारकानाथ यांस त्या वयांतही वाटणें स्वाभाविक होतें.

द्वारकानाथ यांस विनायक, खंडेराव, वसंतराव व यशवंतराव हे चार बंधु व अहिल्याबाई व सुंदराबाई ह्या दोन बहिणी होत्या. द्वारकानाथ हे सर्व बंधूंत वयानें लहान असल्यामुळें सर्वांचे लाडके होते. त्यांच्या इच्छेआड सहसा कोणी जात नसे. ते करतील तें करूं द्यावयाचें; यामुळें त्यांचा स्वच्छंदीपणा उत्तरोत्तर वाढत गेला.

सारें लक्ष खेळांकडे; त्यामुळें १८९९ सालीं ते मॅट्रिकच्या परीक्षेस बसले व त्यांत अपयश मिळाल्यानंतर क्रिकेटचें क्रीडांगण गाजवायला सर्वस्वी मोकळे झाले !

याच काळांत त्यांना आणखी एक छंद जडला. जुन्या तरवारी, बंदुका, बर्ची, भाले वगैरे प्राचीन हत्यारांचा एक संग्रह त्यांच्या पहाण्यांत आला व तो दीर्घकाळपर्यंत त्यांच्या कुतूहलाचा विषय होऊन राहिला. शिवकालीन व शिवपूर्वकालीन हत्यारांनीं ज्याप्रमाणें त्यांचें लक्ष वेधून घेतलें त्याचप्रमाणें थोर पुरुषांच्या पराक्रमाचे पोवाडे त्यांच्या वाचण्यांत येऊन मनावर पूर्वी न घडलेले असे नवसंस्कार घडून आले.

या घटनेला तसेंच एक कारण घडलें. श्री. पांडुरंग लिगाडे या नांवाच्या गृहस्थाशीं त्यांची या काळांत मैत्री जडली. त्यांनीं वीरवृत्तीला पोषक अशा या नवीन दालनांत त्यांचा प्रवेश घडवून आणिला. एवढेंच नव्हे तर बंदुकीचा नेम अचूक कसा साधावा, निरनिराळीं हत्यारें कशीं वापरावीं, याचीही त्यांना माहिती करून दिली.

या जगांत बौद्धिक क्षेत्रांत नांव घेण्यासारखें कांहीं घडण्याची आशा नसली तरी पराक्रमाच्या क्षेत्रांत आपल्या हातून कांहींना कांहीं महत्त्वाचें कार्य घडलें पाहिजे, ही भावना या काळांत त्यांच्या अंतःकरणांत कुठें तरी दबा धरून बसली असणें सहाजिक आहे. त्यामुळें नोकरी पत्करण्याची वेळ आली तेव्हां त्यांनीं तत्कालीन सर्वसाधारण जनांचा धोपट मार्ग न स्वीकारतां लष्करी खात्याकडे धांव घेतली!

१९०१ च्या नोव्हेंबरमध्यें कुलाबा येथील गन कॅरेज फॅक्टरींत एक लष्करी नोकर या नात्यानें त्यांनीं प्रवेश केला; यापूर्वीच त्यांनीं नोकरींत प्रवेश करावयाचा; परंतु घरांत वडील अर्धांगानें आजारी होते. त्यांना आक्टोबर १९०१ मध्यें शेवटचा झटका येऊन त्यांतच त्यांचा अंत झाला.

नोकरीवर रुजू झाल्यानंतर थोड्याच दिवसांनीं परदेशीं जाण्याची संधी चालून आली होती; परंतु बंधूंची परवानगी नसल्यामुळें त्या संधीचा त्यांना फायदा घेतां आला नाहीं.

लष्करी खात्यांतील ही नोकरी त्यांच्या वीरवृत्तीस पोषक ठरली. क्रिकेटच्या खेळांत नांव मिळविलेला एक उमदा व धडाडीचा तरुण या नात्यानें त्या खात्यांतील युरोपीयन अंमलदारांशीं परिचित व्हायला त्यांना फारसा कालावधि लागला नाहीं. त्यांच्या सहवासांत शिकारींत व नेमबाजींतही ते पटाईत होऊं लागले. आस्ते आस्ते द्वारकानाथाच्या ठायीं आढळून आलेल्या मर्दानी गुणांमुळें लष्करांतील गोरे अधिकारी त्यांच्याशीं विशेष प्रेमभावानें वागूं लागले.

लष्करी जीवनक्रम द्वारकानाथच्या पथ्यावर पडला हें खरें असलें, तरी त्यामुळें त्यांच्यावर मोठमोठाले दुर्धर प्रसंग ओढवूं लागले! त्यांचा स्वभाव जबरदस्त धाडसी व बेफिकीर! त्यामुळें त्यांच्यावर प्राणघातक असे किती तरी प्रसंग ओढवले.

१९०४ च्या डिसेंबर महिन्यांतील एक प्रसंग! ज्या लष्करी तुकडींत द्वारकानाथ होते त्या तुकडीचा तळ माळवा प्रांतांत होता. त्या प्रांतांतील एका जंगलांत ते

शिकारीसाठीं गेले असतां बरोबरीच्या शिकारी मित्रानें उडविलेला बंदुकीचा बार त्यांना चाटून गेला ! कांहीं छरे लागले व छातीवर त्यांच्या जन्मखुणा झालेल्या होत्या. तदनंतर याच प्रांतांत घोड्यावरून दौड घेत असतां उज्जैन गेटजवळ त्यांच्या घोड्याला अपघात झाला. त्या वेळीं समयसूचकता संभाळून द्वारकानाथजींनीं घोड्यावरून उडी मारली व त्यामुळें ते बचावले; परंतु घोड्याचा पाय घसरून तो कायमचा पंगू झाला.

१९०५ सालीं तर अपघातांनीं कहर केला. त्या वर्षाच्या आरंभीं त्यांच्या लष्करी तुकडीचा तळ मद्रास प्रांतांत पडलेला होता. टिमलगिरी येथील जंगलांत ते शिकारीसाठीं गेले असतां एका रात्रींत त्यांच्यावर दोन प्रसंग ओढवले व त्या दोन्ही प्रसंगांतून ते बचावले. दरोडेखोरांच्या हल्ल्यांतून ते आपली सुटका करून घेतात न घेतात तोंच त्यांना रानटी जनावरांच्या हल्ल्यांस तोंड द्यावें लागलें. त्यांतूनही आपल्या सहकाऱ्यांसह ते सहीसलामत बाहेर पडले.

अशा रीतीनें अद्दल घडली असतां द्वारकानाथजींनीं त्या जंगलांत पुन्हां पाऊल टाकण्याची कांहीं जरुरी होती का ? परंतु नाहीं; संकटांची फिकीर करायची कोणी ? जे भ्याड असतील त्यांनीं ! २।३ दिवस लोटतांच पुन्हां त्याच निबिड व भयाण जंगलांत ही स्वारी शिकारीसाठीं प्रवेश करती झाली. परिणाम काय झाला ? जंगलांत वाट चुकून एक दिवस व एकरात्र ते सारखे भटकत होते. शिकारीप्रमाणें द्वारकानाथजींना पोहोण्याची भारी हौस. याच दौऱ्यांतील गोष्ट ! एका नदींत ते पोहोण्यासाठीं उतरले असतां भोंवऱ्यांत सांपडले व शेवटीं त्या चक्रव्यूहांतून मोठ्या शिकस्तीच्या प्रयत्नांनीं बाहेर आले.

धाडसी व बेफिकीर वृत्तीमुळें त्यांच्यावर ओढवलेल्या अशा या दुर्धर व प्राणघातक प्रसंगांचें वर्णन कुठवर करावें ? आलेल्या अनुभवांनीं शहाणे होऊन पुन्हां त्या बाजूला वळावयाचें नाहीं, असा पोक्तपणाचा विचार त्यांना कधीं शिवला नाहीं ! संकटांपासून दूर पळणें हें आपलें ब्रीद नव्हे, तर संकटांस सामोरें जाणें व संकटांशीं झुंज खेळणें यांतच पुरुषार्थ आहे अशी द्वारकानाथजींची अनन्यसाधारण विचारसरणी होती आणि त्यामुळेंच तर गोऱ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचा त्यांच्यावर विशेष लोभ जडला होता.

ही खोड म्हणा वा हा गुण म्हणा, त्यांच्या 'पडत्या' काळांत त्यांना सांवरून धरण्याच्या दृष्टीनें अत्यंत सहाय्यकारी झाला.

द्वारकानाथांपाशीं काय नव्हतें? वरिष्ठ गोऱ्या अधिकाऱ्यांची मर्जी संभाळण्यासाठीं त्यांना 'जी साब' किंवा 'हांजी हांजी' करण्याची जरुरी नव्हती. ज्या मर्दानी व खेळकर वृत्तीची गोऱ्या अधिकाऱ्यांना अत्यंत आवड, ते सारे गुण त्यांच्याठायीं होते. जसजसा एकेका गुणाचा प्रकाश पडूं लागला, तसतसे ते गोऱ्या अधिकाऱ्यांच्या अधिकाधिक निकट येऊं लागले.

नोकरीवर रुजू झाल्यापासून अवघ्या १।२ वर्षांच्या कालावधींत द्वारकानाथ यांनीं सर्वांवर आपली छाप बसविली. नोकरींत प्रवेश केल्यानंतर अनेकांच्या बाबतींत बढती व्हावी म्हणून नाना प्रकारच्या धडपडी व लटपटी करणें क्रमप्राप्त असतें; परंतु द्वारकानाथांच्या बाबतींत तो हातचा मळ होऊन राहिला होता. सारे बडे अधिकारी त्यांच्यावर नेहमीं प्रसन्न असावयाचे! नोकरी पेशांतील स्वर्ग म्हणतात तो सुदैवानें त्यांच्या वांट्यास आला होता! अल्पावधींतील आपल्या कर्तबगारीनें त्यांनीं तो जवळ आणिला होता.

द्वारकानाथजींच्या जीवनांत आतां आनंदाची फुलबाग फुलूं लागली होती. आधींच खेळकर, उल्हासी व उमदा स्वभाव; त्यांतच चारी बाजूंनीं वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून होणारा कृपादृष्टीचा वर्षाव! कोणाला नाहीं आनंद होणार?

द्वारकानाथजींच्या ह्या दैनंदिन जीवनानंदांत महत्त्वाची भर घालणारी आणखी एक घटना कारण झालेली होती. त्यांच्या वयास आतां तेवीस वर्षे होत आलीं होतीं. ऐन तारुण्यांत त्यांचें पदार्पण होत होतें. यापूर्वीच मुंबईत असतां त्यांचा एका तरुणीशीं प्रेमविवाह ठरलेला होता.

प्रेमविवाह ठरलेला असला तरी त्या विवाहाची तिथी निश्चित झाली व तो दिवस जवळ येऊं लागला म्हणजे मन आनंदातिशयानें कसें फुलून जातें, नाहीं? खरोखर त्याची प्रचीति प्रत्यक्ष त्या अवस्थेंतून गेलेल्यांनाच येईल! कितीही सुमधुर भाषाप्रयोग केले तरी त्या आनंदी अवस्थेची बरोबर कल्पना पटवून देणें अशक्य आहे.

द्वारकानाथजींची लग्नतिथी अवघ्या १५।२० दिवसांवर येऊन ठेपली होती. ज्या पलटणींत ते होते तिचा तळ त्या वेळीं पुण्यापासून जवळच खडकी येथें पडलेला

होता. आपल्या लग्नसमारंभानिमित्त त्यांनीं वरिष्ठांकडे दोन आठवड्यांची रजा मागितली व ती मंजूरही झाली.

द्वारकानाथसारख्या मर्जीतल्या माणसाचें लग्न! त्या बातमीमुळें सारे अंमलदार आपापल्या परीनें आनंदांत होते! जणू काय आपल्याच घरीं लग्न आहे असें प्रत्येकास वाटत होतें! दुसऱ्या दिवशीं निघायचें म्हणून सर्वांचा प्रेमळ निरोप घेण्यासाठीं द्वारकानाथ आपल्या निवासाबाहेर पडले तेव्हां सारी दुनिया आपल्या स्वागतासाठीं सुसज्ज होऊन राहिली असल्याचें त्यांना आढळून आलें.

आणि अशा या आनंदाच्या कोलाहलांत एक क्रांतिकारक घटना घडून आली!

पलटणींतील एका वरिष्ठ साहेबाचा निरोप घेण्यासाठीं द्वारकानाथ गेले असतां त्या साहेबानेंही शिकारीस जाण्यासाठीं चार दिवसांची रजा काढली असल्याचें आढळून आलें. हे साहेबमहाशय शिकारीस निघाले म्हणजे द्वारकानाथ त्यांच्याबरोबर नेहमीं असायचेच.

द्वारकानाथ मुंबईस जायला निघाल्याचें समजतांच साहेब म्हणाले, "शिकार सोडून मुंबईस कुठं चाललास. तुझं लग्न अजून दूर आहे. इतक्या लौकर जाऊन काय करणार? चल माझ्याबरोबर सिंहगडावर शिकार खेळायला. दोन दिवस मजा करूं आणि परत येऊं. आहे काय त्यांत?"

द्वारकानाथजीपुढें मोठाच पेचप्रसंग उभा राहिला. मुंबई गांठण्यासाठीं ते अत्यंत आतुर झालेले होते. भावी विवाहाच्या विचारांनीं ते भारावले गेलेले होते; तरीही साहेबांचा शब्द त्यांच्यानें मोडवेना. "बरं तर! जशी आपली मर्जी!" साहेबाचा आग्रह मोडणें अशक्य होऊन द्वारकानाथ एवढेंच म्हणाले.

साहेबाच्या मर्जीखातर शिकारीसाठीं सिंहगडावर आरोहण करण्याचें द्वारकानाथजींनीं ठरविलें खरें, परंतु त्यांना त्या गडावर खेंचून नेण्यांत विधिसंकेत कांहीं वेगळाच होता.

---

प्रकरण दुसरें

# सिंहगडावरील शिकार !

**सिंहगडावर** शिकारीसाठीं जाण्याचा बेत ठरल्याप्रमाणें द्वारकानाथजी हे आपल्या साहेब मित्रासह सिंहगडावर गेले. त्यांच्याबरोबर आणखीही कांहीं हौशी मंडळी होती. गडावर आल्यानंतर लोकमान्य टिळक यांच्या बंगल्यांत त्यांचा मुक्काम होता. बरोबर नोकर चाकर होतेच. तेथें गेल्यानंतर एक वाघ आसपासच्या भागांत रहाणाऱ्या लोकांस मधूनमधून फार त्रास देत असल्याचें समजलें.

१९०५ सालचा तो मे महिना होता. दुपारीं जेवणखाण आटोपल्यानंतर द्वारकानाथ स्वस्थ विश्रांति घेत पडले होते. तिकडे शिकारीसाठीं जरूर ती तयारी व उठावणी करण्यांत नोकरमंडळी व स्थानिक गडकरी गुंतले होते. सायंकाळ होत आली. शिकारीसाठीं निघण्याची तयारी करण्याबद्दल द्वारकानाथजींना वर्दी आली; परंतु कां कुणास ठाऊक ! शिकारीच्या विचारानें नेहमीं प्रफुल्लित होणारें त्यांचें मन बाहेर पाय काढण्यास तयार होईना !

पहिल्या निरोप्याला बिछान्यावर आळसांत पडलेल्या स्थितींतच त्यांनीं "जा रे या वेळीं." म्हणून घालवून दिला. तिकडे साहेबाची तयारी पूर्ण होत आली होती. पुन्हां दुसरा निरोप्या आला. "चला, लौकर चला ! साहेब तयार झाले ! त्यांनीं आत्तांच्या आत्तां बोलावलें आहे !" म्हणून तो ओरडून सांगूं लागला.

आतां मात्र निरुपाय झाला ! साहेबाबरोबर आपण शिकारीसाठीं आलों आहोंत तेव्हां आतां बाहेर पडलेंच पाहिजे असा विचार करून त्यांनीं शिकारीचा पोषाख चढविला, बंदुक घेतली, खिशांत काडतुसें कोंबलीं आणि ते बंगल्याबाहेर पडले !

साहेब दुसऱ्या बंगल्यांत द्वारकानाथाची वाट पहात सज्ज होऊन राहिले होते. द्वारकानाथजींना पहातांच त्यांना आनंद झाला. शिकारी व कुत्रे वाघाच्या डरकाळ्या मधून मधून येत असत त्या भागांत रान उधळण्यासाठीं पुढें गेलेले होते.

हातांत भरलेल्या बंदुका घेऊन साहेब व द्वारकानाथजी त्यांच्या मागोमाग निघाले. तिन्हीसांजची वेळ झालेली होती. गडावर किंचित् किंचित् धुकें पडूं लागलें होतें.

हवेंतील गारठा जाणवूं लागला होता. अशा वेळीं तानाजीच्या समाधीच्या उत्तर बाजूस ज्या ठिकाणीं खोल कडा असल्यामुळें बुरूज बांधलेला नाहीं अशा त्या अवघड ठिकाणाकडे हे दोघेही वीर शिकारी चालले होते. कांहीं वेळानें दोघांनीं आपापल्या माऱ्याच्या जागा पकडल्या व आपापल्या ठिकाणीं ते शिकारीसाठीं सुसज्ज होऊन राहत होते; इतक्यांत बाजूस जंगलझुडपांनीं व्यापलेल्या दरींतून वाघाच्या डरकाळ्या ऐकूं येऊं लागल्या. !

डरकाळ्या कानीं पडतांच द्वारकानाथजींच्या रक्तांतील शिकारी खडबडून जागा झाला ! आतां बार उडविण्याची वेळ नजीक येऊन ठेपली होती. ज्या झुडपांच्या बाजूनें डरकाळ्यांचा आवाज ऐकूं येत होता, त्याच्या जवळपास जाऊन बंदुकीचा बार उडवितांच वाघ बाहेर पडेल असें वाटून धुक्यानें व अंधकारानें व्यापलेल्या त्या भागांतून एक एक पाऊल आस्ते कदम टाकीत द्वारकानाथ आपली बंदूक सांवरून बार उडविण्यासाठीं पुढें सरसावणार, तोंच पाय घसरून सुमारें ऐशीं फूट उंच कड्यावरून ते धाडकन् खालीं कोसळले !

ते जे कड्याच्या दगडी भिंताडाला आदळत आपटत घसरत घसरत पडले ते नेमके तानाजीच्या समाधीपाशीं ! वाघाची शिकार राहिली बाजूला ! शिकाऱ्याचीच शिकार होण्याचा समय प्राप्त झाला ! द्वारकानाथजी कड्याखालीं कोसळून पडल्याचें वृत्त सर्वांना हां हां म्हणतां समजलें. धांवाधांव करून कांहीं गडकरी गडाखालीं गेले. साहेबही तेथें आले. द्वारकानाथ शुद्धीवर होते; परंतु कंबरेखालील भाग लुळा पडलेला होता. तो भाग सोलून काढल्यासारखा दिसत होता. आदळ आपट फार झाल्यामुळें शरीर रक्तबंबाळ झालें होतें. कंबरडें मोडून गेलें होतें.

अशा स्थितींत द्वारकानाथजींना डोळींत घालून गडकऱ्यांनीं गडावर आणिलें. शक्य ते प्रथमोपचार करण्यांत आले. कंबरेखालील शरीर साफ लुलें पडलें होतें. गडावरून त्यांना औषधोपचारासाठीं पुणें येथील सासून इस्पितळांत आणून ठेवण्यांत आलें. त्यांच्या पायांतील रक्ताभिसरण बंद पडलें होतें तें सुरू होऊन त्यांना हालचाल करतां यावी यासाठीं या इस्पितळांत नानाप्रकारचे इलाज करण्यांत आले; परंतु त्या उपायांचा इष्ट परिणाम घडून येण्याची कांहींच आशा दिसेना.

परंतु मनुष्य आशेवर जगत असतो. त्या स्थितींत कण्हतकुंथत द्वारकानाथजींनीं इस्पितळांत अकरा महिने काढले. त्यांचे नातलग व मित्र भेटायला यावयाचे तेवढ्या

वेळांत दुःखाचा विसर पडावयाचा. मनांत योजलें होतें काय आणि घडलें काय, हा विचार द्वारकानाथजींच्या मनांत एकसारखा यावयाचा. भराऱ्या मारणारें मन कुठें तरी गुंतविलें पाहिजे; परंतु तें गुंतवायचें कुठें आणि कसें? इस्पितळांत नानाप्रकारचे ग्रंथ होते. ते मिळवून त्यांच्या वाचनांत द्वारकानाथ आपला वेळ घालविण्याचा प्रयत्न करूं लागले. या प्रसंगामुळें वाचनाची गोडी लागली. ग्रंथवाचन व इस्पितळांतील सभोंवारच्या परिस्थितीचें व तेथें चालू असलेल्या हालचालींचें निरीक्षण! या पलीकडे त्या काळांत त्यांना दुसरें जग नव्हतें!

याच कठीण अवस्थेंत असतां इस्पितळांतील व्यवस्थेसंबंधानें आपण कांहीं तरी लिहावें असें त्यांना वाटूं लागलें. बिछान्यावर पडल्या पडल्या त्यांनीं ५।६ इंग्रजी लेख लिहिले. त्यांपैकीं बहुतेक लेख त्या काळीं पुणें येथें प्रसिद्ध होणाऱ्या 'डेक्कन हेराल्ड' या वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाले आहेत.

कंबरेंत जोर यावा व पायांत रक्त भरून त्यांनीं पूर्ववत् चालूं लागावें यासाठीं सासून इस्पितळांतील डॉक्टरांनीं नाना इलाज केले; परंतु त्यांचा कांहीं उपयोग न होतां शेवटीं त्यांच्या बंधूंनीं त्यांना मुंबईंत आणिलें.

सुमारें अकरा महिन्यांपूर्वी दोन आठवड्यांची रजा घेऊन आपल्या विवाहानिमित्त द्वारकानाथजी मुंबईंत यायचे होते; आणि आतां ते मुंबईंत आले ते किती विपरीत स्थितींत? भावी वैवाहिक जीवनाच्या कल्पनेनें त्या वेळीं ते खुलून गेले होते? आणि आतां? विवाहासंबंधींच्याच काय, परंतु त्यांच्या साऱ्या मनोरथांचा चक्काचूर झालेला होता!

कंबर खचली खरी; परंतु मन खचलें नव्हतें. मनाचे सारे व्यापार पूर्ववत् चालू होते. आतां येथून नव्या आयुष्याला आरंभ व्हायचा होता. दुर्धर अशा अपघातांतून आपण बचावलों खरे; परंतु आतां यापुढील जीवन कसें घालवायचें? हे विचार द्वारकानाथजींना एकसारखे सतावूं लागले.

आतांपर्यंत त्यांचें जीवन स्वच्छंदी होतें. त्यांच्या मानी स्वभावाचा स्वावलंबनाकडे फार ओढा होता. दुसऱ्यांना भारभूत होऊन रहाण्याची कल्पना त्यांना सहन होण्यासारखी नव्हती; परंतु आतां त्यांच्या वाट्याला नेमकें नको तेंच आलें होतें.

द्वारकानाथजींचे भाऊ व निकटवर्ती नातलग सुस्थितींत होते. त्यांच्यापैकीं कोणीही त्यांना कमी पडूं दिलें नसतें; परंतु त्यांना मात्र परावलंबी जिण्याचा मनापासून तिटकारा होता.

त्यांना मुंबईंत आणण्यांत आल्यानंतर मुंबईंतील डॉक्टर, वैद्य, मालिशवाले, यांच्या उपाययोजना सुरू झाल्या. त्यांनीं पूर्वस्थितीप्रत यावें यासाठीं जें जें कांहीं करतां येण्यासारखें होतें तें करण्यांत त्यांच्या आप्तसंबंधीयांनीं कोणत्याही प्रकारची कसूर केली नाहीं.

कंबरेखालील शरीर दुबळें झालें असलें तरी कंबरेवरील शरीराचा भाग चांगला शाबूत होता. मनाचा खंबीरपणा व कणखरपणा वृद्धिंगत होऊं लागला होता. एवढेंच नव्हे तर निरुद्योगी मनांत नानातऱ्हेचे विचार घोळूं लागले होते; परंतु तशा स्थितींतही द्वारकानाथजींनीं आपल्या मनास सैतानाचा कारखाना होऊं दिलें नाहीं. ईश्वरचिंतन व सद्विचार यांच्या सहाय्यानें मनोमालिन्य घालविण्याचा ते सतत प्रयत्न करीत होते. मनाचें सामर्थ्य त्यांनीं ओळखलें होतें. मनोविश्लेषण, मानसशास्त्र व मनोव्यापारांसंबंधीं मिळवितां येतील ते ग्रंथ मिळवून त्यांचा त्यांनीं व्यासंग चालू केला.

कांहीं झालें तरी पंगूपणा आला म्हणून भागूबाईप्रमाणें रडत न बसतां किंवा दुसऱ्यांस भारभूत होऊन न रहातां जेणेंकरून मानानें जगतां येईल असा जीवन-मार्ग आखवायाचा हेच विचार मुंबईंत आल्यानंतर त्यांच्या मनांत प्रामुख्यानें वावरूं लागले.

---

## प्रकरण तिसरें

# साहित्यसेवेचा ओनामा

ज्या दिवशीं द्वारकानाथजी हे सिंहगडाच्या कड्यावरून कोसळले त्याच दिवशीं त्यांचें पुर्वायुष्य संपून ते नव्या जन्मानें जगांत वावरूं लागले असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांच्या जीवनांत, विचारांत व रहाणींत क्रांतिकारक थोरपालट घडून आला. नव्या दृष्टीनें ते अपघातामुळें जर्जर झालेल्या आपल्या जीवनाकडे पाहूं लागले. त्यांनीं 'नाथमाधव' हें नांव केव्हां धारण केलें हें ओघानें येईलच. परंतु यापुढें बदललेल्या परिस्थितींत आपण त्यांना नाथमाधव या नांवानें ओळखूं या.

मनुष्य कितीही स्वयंभू वा प्रयत्नवादी असला तरी मार्गदर्शन करणारा गुरु भेटावा लागतो. गुरुशिवाय खरी ज्ञानप्राप्ति होत नाहीं. तो गुरु मात्र जातिवंत हवा. नामधारी असून उपयोगाचा नाहीं. जातिवंत गुरूचा लाभ होणें ही एक पूर्वपुण्याईच म्हटली पाहिजे.

नाथमाधव प्राप्त परिस्थितीशीं निकरानें झगडत होते. पंगु स्थितींत पडल्या पडल्या वेळ घालविण्यासाठीं म्हणा वा मनोरंजनासाठीं म्हणा, त्यांना आपला बहुतेक वेळ निरनिराळ्या विषयांवरील ग्रंथ व मासिकें वाचण्यांत दवडावा लागत होता. कुठें जातां येत नव्हतें किंवा वेळेचा सदुपयोग एकाद्या व्यवसायाकडेही करतां येत नव्हता. रात्रंदिवस वाचन आणि वाचन ! पुढें पुढें जें कांहीं वाचावयाचें त्यावर लक्ष केंद्रीभूत करून विचारांस चालना देण्याचा नाथमाधव प्रयत्न करूं लागले. विचार करतां करतां ते कल्पनासृष्टींत वावरूं लागले; आणि त्यांत त्यांना आनंद वाटूं लागला.

आपण जें कांहीं वाचलें व पचविलें तें कागदावर उतरवितां आल्यास पहावें असें वाटून नाथमाधव मधून मधून लिहूं लागले. आरंभीं लहान लहान चुटके व छोट्या कथा ते लिहीत असत व त्याचीं बाडें बांधून ठेवीत असत. लिहिण्याचा सराव झाला, आपल्याकडून पुष्कळसें लेखन झालें, म्हणजे आपणास लिहितां येईल, असें त्यांच्या मनानें घेतलें होतें.

नाथमाधवांच्या घराण्यांत लेखनकला होती. त्यांचे वडीलबंधु विनायकराव लेखक होते; परंतु आपल्यावर 'लेखक' बनण्याची पाळी कधींकाळीं येईल असें नाथमाधवांच्या स्वप्नांतही कधीं आलें नसेल. परंतु मानवी आयुष्यांत कल्पनातीत गोष्टी कधींकधीं घडून येत असतात. दैवाचा कांटा कोणत्या बाजूला वळेल व कोणत्या व्यवसायाची कांस धरावी लागेल हें अनेकांच्या बाबतींत अनिश्चित असतें.

नाथमाधवांच्या आयुष्याला वळण लागत होतें. त्यांच्यांत धडाडी, हूडपणा बालपणापासूनच भरपूर प्रमाणांत होता. 'लाथ मारीन तेथें पाणी काढीन' अशा तडफदार प्रवृत्तीचे नाथमाधव होते; परंतु ज्या पायांवर उभे राहून कर्तबगारी गाजवावयाची व जगाशीं टक्कर द्यावयाची, त्या पायांनींच दगा दिल्यामुळें ते हतबल झाले होते.

पनवेल येथें औषधोपचारासाठीं नाथमाधवांचें वास्तव्य दीर्घकाळ झालें. अपघातामुळें असहाय्य स्थिति वाट्यास आल्यापासून वाचन हाच जरी त्यांचा एकमेव व नित्याचा मित्र होऊन राहिला असला तरी त्यांचा पद्धतशीर लेखनारंभ पनवेलींत झाला. श्री. ओटवणे शेटजींच्या ज्या बंगल्यांत कै. अण्णासाहेब किर्लोस्कर यांनीं रामराज्यवियोगादि नाटकें लिहिलीं, त्याच बंगल्यांत व त्या बंगल्याच्या बगीच्यांत नाथमाधवांस लेखनाची स्फूर्ति झाली.

लेखन ही इतर नानाप्रकारच्या कलांप्रमाणें एक कला आहे. या कलेंत पारंगत होण्यासाठींही मार्गदर्शकाची व गुरुकृपेची आवश्यकता असते.

आपण लेखनव्यवसायाकडे वळावयाचें असें नाथमाधवांनीं दीर्घ विचारांतीं ठरविलें; कारण त्याशिवाय दुसरा कोणताच सन्माननीय मार्ग त्यांना आचरतां येण्याची शक्यता नव्हती.

कोणत्या मार्गानें जावयाचें हें ठरल्यानंतर नाथमाधव त्या मार्गाला लागले. त्यासाठीं आपल्या परीनें शक्य ती साधना त्यांनीं सुरू केली. आपलें सारें लक्ष त्या साधनेवर ते केंद्रीभूत करूं लागले. परंतु त्यांच्या मनाचें कांहीं समाधान होत नव्हतें. जो आपुलकीनें आपल्या चुका दाखवील व आपणास योग्य मार्गावर आणून सोडील अशा मार्गदर्शकाची नाथमाधव मोठ्या आतुरतेनें मार्गप्रतीक्षा करीत होते. त्यांना गुरुकृपेच्या सांवलीची तहान लागलेली होती.

इच्छा तसें फळ. कोणत्याही गोष्टीची मनाला तळमळ लागून राहिली म्हणजे इच्छापूर्तीचा काळ समीप येत असतो. नाथमाधवांचें तसेंच झालें.

सुप्रसिद्ध केरळकोकिळकर्ते व महाराष्ट्रभाषाचित्रमयूर श्री. कृष्णाजी नारायण ऊर्फ दादा आठल्ये यांचें कर्मधर्मसंयोगानें याच सुमारास पनवेलीस वास्तव्य होण्याचा योग जुळून आला. त्यांचें मराठी भाषेवर दांडगें प्रभुत्व. केरळकोकिळ मासिकाचे अंक ज्यांनीं वाचले असतील त्यांनाच त्याची कल्पना होईल.

श्री. दादा आठल्ये यांचा नाथमाधवांच्या पितळे घराण्याशीं दाट परिचय होता. त्यामुळें नाथमाधवांच्या असहाय्य स्थितीबद्दल त्यांना सहाजिकच अनुकंपा वाटत असे. फार कशाला? नाथमाधव यांच्या संबंधीं लिहितांना श्री. दादा आठल्ये एके ठिकाणीं म्हणतात, "नाथमाधवांच्या घराण्याशीं विशेषेंरून त्यांचे वडील बंधु

रसिक व गुणग्राही रा. रा. विनायकराव यांचा व माझा फार पुरातनचा प्रेमसंबंध आहे. नंतर नाथमाधव व आम्हीं तर काय, कित्येक वर्षांपासून एकजीवच आहोंत. त्यांची पंगु स्थिति पाहून आम्हांस अत्यंत खेद वाटतो. तथापि त्यांनीं दीर्घोद्योगानें व मनमिळाऊपणानें मलाच नव्हे, तर अखिल महाराष्ट्राला आपलेंसें करून टाकिलें आहे. ”

दादांच्याठायीं नाथमाधवांबद्दल आपपरभाव नव्हता. त्यांनीं आपलें दुःख विसरावें व परावलंबीपणांतही स्वावलंबी बनावें असें त्यांना मनापासून वाटत असे. त्यामुळें लेखनकलेकडे नाथमाधवांचें लक्ष लागूं लागलें आहे हें पाहून त्यांना समाधान वाटलें व त्या बाबतींत त्यांना शक्य तेवढें उत्तेजन देण्याचें व वेळोवेळीं त्यांचें मार्गदर्शन करण्याचें त्यांनीं मनावर घेतलें.

गुरुकृपा उगाच होत नाहीं. शिष्यही निष्ठावान् असावा लागतो; आणि जेव्हां असा मणिकांचन योग जुळून येतो तेव्हांच तेजाचे किरण फांकत असलेले दिसूं लागतात.

नाथमाधवांनीं लेखनासाठीं हातीं लेखणी घेतली तो काळ आजच्यासारखा सुलभ प्रसिद्धीचा व वाटेल तें लिहावें आणि तें छापून यावें अशा प्रकारचा नव्हता. केरळकोकिळ, मनोरंजन, विविधज्ञानविस्तार, करमणूक, नवयुग, यांसारखीं निवडक व उच्च दर्जाचीं मासिकें चालविणारे संपादक प्रत्येक लेख योग्य ती छाननी करून तो कसोटीस उतरला तरच छापीत असत. नवीन लेखकास तेथें सहजासहजीं प्रवेश मिळत नसे. हातीं येईल तें छापावयाचें व आपल्या मासिकाचीं पानें एकदां कशींबशीं भरून काढावयाचीं ही प्रथा त्या काळीं रूढ झालेली नव्हती.

आजकाल पूर्वींच्या मानानें लेखक किंवा साहित्यिक होणें बरेंच सुलभ झालेलें आहे. लेखकाला लेखनतपश्चर्येची किंवा गुरूच्या मार्गदर्शनाची जरूरीच भासत नाहीं! आजच्या जमान्यांत वाटेल त्यानें वाटेल तें लिहावें व लेखक म्हणून खुशाल मिरवावें!

लेखनकलेशीं कोणत्याही प्रकारें संबंध नसतां श्री. दादा आठल्ये यांच्या मार्गदर्शनामुळें नाथमाधव सरस्वतीदेवीच्या मंदिरांत प्रवेश मिळावा म्हणून एकाद्या निष्ठावान् भक्ताप्रमाणें तिची आराधना करूं लागले. मराठी वाङ्मयाचा अभ्यास

पद्धतशीर रीतीनें कसा करावा, काय वाचावें, काय अभ्यासावें, याची माहिती दादा त्यांना अत्यंत आस्थापूर्वक देऊं लागले.

परिस्थितीमुळें नाथमाधवांचें लेखनाकडे लक्ष वळूं लागलें होतें; परंतु ठाम निर्णय घेतां येत नव्हता. दादा आठल्ये यांनीं एकंदर परिस्थितीचा विचार करून त्यांना निर्णय घ्यायला लाविलें; त्यांना धीर दिला व जरूर असलेला दिलासाही दिला. हा दिलासा केवळ शाब्दिक व वरकरणी नव्हता. आपल्या नजरेखालीं दादांनीं नाथमाधवांचा वाङ्मयाभ्यास सुरू केला व विविध विषय सुचवून त्यांना लेखनकलेचे धडे द्यायला आरंभ केला !

नाथमाधवांच्या लेखनतपश्चर्येच्या आरंभकाळांत एकदां मोठी गंमत घडून आली. त्यावरून हा गुरुशिष्यसंबंध कोणत्या प्रकारचा होता याची वाचकांस कल्पना होईल. 'चणे खावे लोखंडाचे तेव्हां ब्रह्मपदीं नाचे,' असें म्हणतात तें खोटें नाहीं.

श्री. दादा आठल्ये यांनीं एकदां नाथमाधवांस लेख लिहायला सांगितलें. विषयाची निवड त्यांच्यावरच सोंपविली.

गुरुजींची आज्ञा प्रमाण मानून व त्यांना वंदन करून नाथमाधव लेख लिहायला बसले. लेख पूर्ण होतांच त्यांनीं तो गुरुजीपुढें सादर केला.

डोळ्यांवर चष्मा चढवून व हातांत पेन्सिल घेऊन गुरुजी लेख वाचायला बसले. प्रथम तो लेख त्यांनीं १०।१२ मिनिटांतच वाचून संपविला. परंतु नंतर त्यांत जरूर त्या दुरुस्त्या करायला त्यांनीं चांगले तीन साडेतीन तास घेतले. रेघोट्या ओढलेल्या व दर ओळीओळीगणीक सुधारणा सुचविलेल्या स्वरूपांत नाथमाधवांपुढें तो लेख आला तेव्हां त्यांच्या छातींत धस्स झालें !

श्री. दादा आठल्ये यांनीं किती कठोरपणानें तो लेख छिन्नविच्छिन्न करून टाकिला होता !

परंतु नाहीं; कठोरपणाची ती जात वेगळी होती. आपल्या बाळाच्या शाश्वत कल्याणासाठीं कधीं कधीं आई नाहीं का कठोरपणाचा आव आणीत? त्या प्रकारांत मोडणारा दादांचा तो मायाळू कठोरपणा होता. नाथमाधवांच्या चेहऱ्यावरील चलबिचल त्यांनीं तात्काळ ओळखिली. नाथमाधवांच्या जवळ जाऊन दादा त्यांना वात्सल्यानें म्हणाले, "निराश होऊं नका. तुम्हांला नामोहरम करण्या-

साठीं हें कठोरकृत्य मी केलें नाहीं. तुम्हीं सुधरावें, जगांत थोर लेखक म्हणून नांव काढावें, तुमच्या लेखनांत वैगुण्य राहूं नये, तसेंच तुमचें लेखन निर्दोष, चौफेर व सकस व्हावें, याच हेतूनें तुमच्या या लेखाची मी ही एवढी मनसोक्त चीरफाड केली.

वाक्यें कशीं लिहावीं, शब्दयोजना कशी करावी, परिच्छेद कुठें व कां पाडावे, लेखाचें आदि–मध्य–अवसान हीं एकसूत्री, मिळतीं जुळतीं कशीं ठेवावीं; या सर्व गोष्टींकडे लेखकानें अव्वलपासून अखेरपर्यंत अवधान कसें व कां द्यावें, हें सर्व सप्रमाण समजावून देण्यासाठीं नाथमाधवांच्या गुरुजींनीं त्यांच्या त्या लेखाची कठोरपणें चीरफाड केलेली होती.

नाथमाधव क्षणकाल निराश झाले खरे, परंतु लौकरच निराशेची जागा नव्या उमेदीनें भरून काढिली. त्या दिवशीं आपला नवा जन्म झाला व सभोंवार पसरलेल्या वैराण वाळवंटांत नवआशांकुर जन्माला आला असें नाथमाधवांस त्या क्षणीं वाटलें. अपघातामुळें जरी त्यांची कंबर मोडून चक्काचूर होऊन गेली होती तरी ती मोडली नसून तिच्यांत नवचैतन्य निर्माण होत असल्याचा त्यांना क्षणकाल कां होईना, भास होऊं लागला.

श्री. दादा आठल्ये यांचा शब्द प्रमाण मानून नाथमाधव त्याबरहुकूम वागूं लागले. दादांच्या ठायीं त्यांची अनन्य निष्ठा होती. दादांनींही आडपडदा न ठेवतां आपल्यापाशीं सांगण्यासारखें व देण्यासारखें जें जें म्हणून कांहीं होतें तें तें सैल हातानें व निःसंकोचपणें त्यांना देऊन टाकिलें.

नाथमाधवांच्या लेखनांत डौलदारपणा व इतर अनेक आवश्यक गुण आढळून येतात याचें कारण त्यांना शिकण्याची व नामवंत लेखक होण्याची इच्छा व हौसही होती. त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांना योग्य वेळीं मार्गदर्शक मिळाला व त्यांनीं दाखविलेला मार्ग नाथमाधवांनीं निष्ठापूर्वक चोखाळला.

नंतर पुढें कांहीं वर्षांनीं या गुरुशिष्यजोडीनें "केरळकोकिळ व नवें मन्वंतर" या जोड नांवाचें एक उत्कृष्ट मासिक सुमारें दोन अडीच वर्षें चालविलें. गुरूला आपल्या या शिष्यवरास बरोबरीचें स्थान द्यायला जरासुद्धां दिक्कत वाटली नाहीं. एका दिव्यानें दुसरा दिवा चेतविला म्हणजे दोन्ही दिवे प्रकाश सारखाच देतात. आधीं कोणचा व नंतर कोणचा दिवा प्रकाश देता झाला, हा प्रश्नच उरत नाहीं. तसाच प्रकार या गुरुशिष्यांच्या बाबतींत घडून आलेला होता.

या लेखनतपश्चर्येच्या आरंभकाळांत नाथमाधवांनीं जसें वाचन विपुल केलें त्याचप्रमाणें लेखनही विपुल केलें. 'गातां गळा आणि शिंपितां मळा' असें म्हणतात. त्याचप्रमाणें लेखन करतां करतां त्यांतील खांचखळगे आपणास समजत जातील या भावनेनें लिहावयाचें आणि बांधून ठेवावयाचें, हा त्यांचा क्रम कित्येक दिवस अव्याहत चालू होता.

त्यांच्या भेटीस येणारे त्यांचे मित्र सहाजिकपणें त्यांच्या लेखनावरून नजर फिरवीत असत; व कोणत्या ना कोणत्या मासिकाकडे तें लेखन पाठवून देण्याचा त्यांना सल्ला देत असत. आपलें लेखन प्रसिद्ध व्हावें असें कोणाला वाटत नाहीं ? नाथमाधवांच्या ठायींही ती भावना होती. त्यांनीं या आरंभकाळांत द्वारकानाथ माधवराव पितळे या नांवानें कांहीं ठिकाणीं आपलें लेखन, विशेषतः लघुकथा पाठविल्या, परंतु त्या साभार परत आल्या. तेवढ्यानें नाथमाधव निराश झाले नाहींत. आपल्या लेखनांत प्रभावीपणा आला म्हणजे आपलें लेखन प्रकाशांत आल्याशिवाय निःसंशय रहाणार नाहीं अशी त्यांची खात्री होती. अशा वेळीं त्यांनीं आपली लेखनतपस्या दुप्पट जोमानें सुरू करावी.

त्याचबरोबर पितळे हें आपलें जातिबोधक नांव तर प्रसिद्धीआड येत नसेल ना ? अशी शंका त्यांना त्यांच्या कांहीं मित्रांच्या सूचनेमुळें येऊं लागली होती. नाथमाधव एकदां विचार करीत बसले असतां आपलें जें लांबलचक नांव आहे त्याचा संकोच करून 'नाथमाधव' हें टोपण नांव धारण करावें व त्याच नांवानें जगापुढें येतां आल्यास पहावें असें त्यांनीं ठरविलें.

ही १९०७ सालची गोष्ट. 'नाथमाधव' हें नवें नांव धारण केल्यानंतर त्या नांवानें त्यांनीं एक लघुकथा उमरावती येथें प्रसिद्ध होणाऱ्या 'महाराष्ट्र वाग्विलास' या मासिकाकडे पाठविली. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर व श्री. बाळकृष्ण संतुराम गडकरी हे या मासिकाचे संपादक होते. त्या काळीं या मासिकांत श्री. विद्याधर वामन भिडे, कवि गोविंदाग्रज, श्री. यशवंतराव गुप्ते, श्री. ज. स. कुडाळकर, श्री. ह. आ. तालचेरकर, श्री. कृ. म. चिपळूणकर वगैरे लेखकांचें लेखन प्रसिद्ध होत होतें.

या मासिकाच्या सप्टेंबर १९०७ च्या अंकांत नाथमाधवांची 'चोराची शिफारस' ही लघुकथा प्रसिद्ध झाली, व तीच प्रसिद्धीस आलेली त्यांची पहिली लघुकथा होय.

नंतर त्या मासिकाच्या नोव्हेंबर १९०७ च्या अंकीं त्यांची 'बिनवशिल्याची नोकरी' ही दुसरी लघुकथा प्रसिद्ध झाली.

अशा रीतीनें 'महाराष्ट्र-वाग्विलास' या मासिकानें नाथमाधवांस प्रसिद्धीचा मार्ग मोकळा करून दिल्यानंतर तत्कालीन निरनिराळ्या मासिकांतून त्यांचें लेखन प्रसिद्ध होऊं लागलें. यानंतर हिंद एजन्सी एक आणा मालेंतून त्यांच्या छोट्या मोठ्या कथा सतत प्रसिद्ध होऊं लागल्यामुळें नाथमाधवांची लोकप्रियता उत्तरोत्तर वाढत गेली. 'रायक्लब अथवा सोनेरी टोळी' यासारख्या त्यांच्या प्रदीर्घ कथेनें तर तत्कालीन वाचकांच्या मनांची चांगलीच पकड घेतली व नाथमाधव हें नांव सर्वतोमुखीं झालें.

स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेली नाथमाधवांची पहिलीवहिली कादंबरी 'प्रेमवेडा' ही होय. ती १९०८ सालीं प्रसिद्ध झाली. ही ग्रंथरूपानें प्रसिद्ध होणारी आपली पहिली वाङ्मयकृती त्यांनीं आपले परमपूज्य वडील कै. माधवराव मोरोबा पितळे यांस आदरपूर्वक अर्पण केली असून अर्पणपत्रिकेंत नाथमाधव म्हणतात, "माझ्या हातून महाराष्ट्र भाषेची सेवा अधिकाधिक घडावी असा त्यांचा (वडिलांचा) पुण्याशीर्वाद मी मागत आहें."

या कादंबरीच्या प्रस्तावनेंत नाथमाधवांनीं, अविचारानें प्रेमपाशांत सांपडून शेवटीं आपल्या आयुष्याचें मातेरें करून घेणाऱ्या तरुणतरुणींनीं भावनेच्या आहारीं न जातां संयमपूर्वक वागणें कसें जरूर आहे व जे भावनेच्या आहारीं जातात त्यांची जीवनांत फसगत कशी होते याचें विवेचन केलें आहे. मासिक मनोरंजनांत प्रसिद्ध झालेलें पुढील काव्यही आपल्या प्रस्तावनेंत त्यांनीं उद्धृत केलें आहेः—

**"प्रीति मजवरी तुझी जडाया रूपचि कारण जरि होई**
**प्रीति करूं नको एक दिनीं हें सुरूप विलया जाई**
**मूर्तिमती चारुता करितसे वास जयाच्या ठायीं**
**प्रलयकालही नष्ट कराया जीतें शक्त न होई**
**उदयें ज्याच्या रक्तपंकजें हर्षें प्रफुल्ल होती**
**पृथ्वीतलिंच्या चराचरांचें जीवन ज्याच्या हातीं**
**ऐशा सुंदर रविवरती**
**असूं दे अमुप तुझी प्रीती"**

नाथमाधवांच्या या पहिल्या वाङ्मयअपत्याला तत्कालीन नामांकित चित्रकार श्री. एस्. पी. आगासकर यांनीं प्रसंगोचित व सुंदर कलाकृतींनीं सजविलें आहे.

१९२१ सालापासून नाथमाधवांच्या स्वराज्यावरील ऐतिहासिक कादंबऱ्या प्रसिद्ध होऊं लागल्या; परंतु तत्पूर्वी १९०८ ते १९२० या एका तपाच्या काळांत त्यांच्या सुमारें वीस सामाजिक कादंबऱ्यांचें प्रकाशन झालें. त्यांत वीरधवल, विहंगवृंद, देशमुखवाडी, श्रीनिवासराव, डॉक्टर कादंबरी, विमलेची ग्रहदशा, दैवाचे खेळ, वगैरे कादंबऱ्यांनीं नाथमाधवांस कादंबरीक्षेत्रांत बहुमानाचें स्थान मिळवून दिलें. सांवळ्या तांडेल ही आरमारविषयक अजोड कादंबरी त्यांनीं याच काळांत लिहिली. नाथमाधवांच्या या कादंबऱ्यांनीं वाचकांस इतकी कांही गोडी लाविली होती कीं, वाचक त्यांच्या प्रत्येक नवीन कादंबरीसाठीं टपून राहिलेला असे. ३०।३५ वर्षांचा काळ लोटला तरी अजूनही त्यांच्या कादंबऱ्या आवडीनें वाचल्या जात आहेत. नाथमाधवांनीं हें जें यश मिळविलें त्याचीं कारणें काय होतीं व असे कोणते विशिष्ट गुण त्यांच्या लेखनांत होते याची मीमांसा एकाद्या अधिकारी समीक्षकाकडून होणें अत्यंत जरूर आहे, असें आम्हांला वाटतें.

---

प्रकरण चौथें

## ऐतिहासिक कादंबऱ्यांची पार्श्वभूमि

**प्रत्येक** मनुष्यानें आपल्या समाजाच्या व आपल्या राष्ट्राच्या उपयोगी आपणास कसें पडतां येईल हें पाहून त्याप्रमाणें आपल्या जीवनक्रमाची आंखणी केली पाहिजे; तरच जन्मा आलियाचें सार्थक; त्याचप्रमाणें केवळ आपलें व आपल्या कुटुंबियांचें पोट भरण्यासाठीं ईश्वरानें हा मनुष्यजन्म दिलेला नाहीं असें नाथमाधवांस निश्चितपणें वाटत असे. लहानपणापासून पराक्रमाचीं कृत्यें करण्याकडे त्यांचें लक्ष असे. लष्करांत पराक्रमाचीं कृत्यें करून दाखवायला सवड असते. लष्करी नोकरींत प्रवेश केल्यानंतर आपणास कधीं ना कधीं पराक्रम गाजविण्याची संधी मिळेल अशी आशा बाळगणें चुकीचें ठरलें नसतें; परंतु तशी संधी मिळण्यापूर्वीच त्यांच्या या आशेचा चक्काचूर करून टाकणारा व पराक्रमाला पोषक असें जें कंबरडें तेंच मोडून टाकणारा दुर्धर असा अपघात त्यांच्या वांट्यास आला. त्या नामोहरम स्थितींत त्यांना कांहीं काळ किंकर्तव्यमूढ स्थितींत दवडावा लागला.

जे हात तरवार गाजविण्यासाठीं आतुर झालेले होते, त्या हातांत लेखणी घ्यावी लागली! तरवार आणि लेखणी! यांत श्रेष्ठ कोण? दोन्ही आपापल्या परीनें श्रेष्ठ आहेत; परंतु सध्यांच्या अनत्याचारी वातावरणांत तरी तरवारीच्या धारेपेक्षां लेखणीची धार अधिक तिखट व प्रभावी असते असें म्हणण्याचा मोह आवरतां येत नाहीं.

प्राप्त परिस्थितींत कांहींना कांहीं उद्योग केलाच पाहिजे, या भावनेनें नाथमाधवांनीं लेखणी हातीं घेतली. ज्या गोष्टींत मन घालावयाचें तिचा पिच्छा पुरवावयाचा; त्यांत जास्तींत जास्त प्रावीण्य संपादन करावयाचें व सर्वांकडून शाबासकी मिळवावयाची, ही त्यांची जन्मजात खोड होती! पराक्रमी पायांनीं दगा दिला तरी ती खोड कायमच होती. आपली लेखणी बलदायिनी व सर्वांना डोलवायला लावणारी डौलदार कशी होईल, यासाठीं त्यांनीं झटून प्रयत्न केले व आपल्या लेखणीला त्यांनीं प्रयत्नें करून प्रभावी बनविलें. जनमनाचें मनोरंजन करणाऱ्या व एकाहून एक सरस अशा कादंबऱ्या त्यांची लेखणी प्रसवूं लागली. त्यांच्या कादंबऱ्या मोठ्या आतुरतेनें वाचल्या जाऊं लागल्या.

या कादंबरीलेखनावर त्यांना पैसेही मिळूं लागले; परंतु नाथमाधव तेवढ्यावर राजी नव्हते. कुठेंतरी आपलें चुकतें आहे असें त्यांना वाटत असे. आपण कादंबरी-लेखक झालों, आपणास दोन पैसे मिळूं लागले, आतां आपणास काय करायचें आहे? असें त्यांना कधीं वाटलें नाहीं. दुसरे लोक काय म्हणतात, दुसऱ्यांकडून आपणास काय शिकतां येईल, व अंगीकृत कार्यांत आपली अधिकाधिक प्रगति कशी होईल, याकडे त्यांचें नेहमीं लक्ष असे.

नाथमाधव एकदां पुण्यास गेले असतां ज्ञानमहर्षि गुरुवर्य रामकृष्णपंत भांडारकर यांच्या भेटीस जाण्याची इच्छा त्यांना झाली. त्या वेळीं नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या आपल्या १।२ प्रेमविषयक कादंबऱ्याही ते भेटीदाखल बरोबर घेऊन गेले.

गुरुवर्य भांडारकर यांच्या भेटीचा हा प्रसंग १९२५ सालीं गोमंतकांतील मडगांव या शहरीं श्री. दत्ता पै यांच्या अध्यक्षतेखालीं दिलेल्या आपल्या भाषणांत त्यांनीं सांगितला होता. ते म्हणाले होते, "माझी कादंबरी हातांत घेऊन व ती चाळून त्या वयोवृद्ध व विद्वान अशा विभूतीनें मला असा प्रश्न केला कीं, तूं हें पुस्तक कोणतें ध्येय पुढें ठेऊन लिहिलें आहेस? त्याबरोबर मी निरुत्तर झालों; व त्या वेळेपासून माझ्या लेखनास नवीन वळण लागलें."

गुरुवर्य भांडारकर यांच्या प्रश्नानें नाथमाधव खडबडून जागे झाले. त्यांचा मूळ स्वभाव शौर्यशाली व पराक्रमी बाण्याचा होता. परिस्थितीच्या चक्रांत सांपडल्यामुळें त्यावर दडपण पडलें होतें. परंतु तें दडपण कायमचें नव्हतें. यानंतर नाथमाधव अंतर्मुख होऊन नवीन मार्गानें आपल्या लेखनसंसाराची आंखणी व मांडणी करूं लागले. याच मनःस्थितींत असतां त्यांनीं यापुढें **"देशा वैभव आणतील असलीं गाईन गाणीं नवीं"** असा निर्धार केला.

देश दीर्घकाळ पारतंत्र्यांत खितपत पडलेला आहे. परकीयांच्या राजवटीमुळें जनता स्वाभिमानशून्य झाली आहे. नाहीं स्वभाषेचा अभिमान, नाहीं आपल्या संस्कृतीचा अभिमान व नाहीं आपल्या पोषाखाचा किंवा धर्माचा अभिमान ! हीं का जिवंतपणाचीं लक्षणें ! जनता स्वाभिमानी व पुरुषार्थी बनली पाहिजे. जनतेंत नवचैतन्य उत्पन्न झालें पाहिजे. आपण पूर्वीं होतों कोण व आज आपण आहोंत कोणत्या स्थितींत, याची कोणाला जाणीव किंवा खंत तरी वाटत आहे का ?

ती जाणीव आणून देणें व जनतेला स्वातंत्र्याची आस लावणें ही कामगिरी फार महत्त्वाची आहे. आपल्या हातीं लेखणी आली आहे तिचा उपयोग या कार्या-साठीं करावयाचा तर, आहे या परिस्थितींत आपणास आपल्या वैभवशाली अशा गतेतिहासाकडे वळलें पाहिजे याची खूणगांठ नाथमाधवांनीं स्वतःच्या मनाशीं बांधली व ते उद्योगास लागले. विनायक कवीनें गायिलेल्या **"पूर्वे दिव्य ज्यांचें त्यांना दिव्य भावी काळ"** या कडव्याची महती त्यांना पटूं लागली होती. ज्यांचा भूतकाळ दिव्य, ओजस्वी व पराक्रमाच्या गोष्टींनीं व्यापलेला आहे, त्यांच्या वांट्यास त्या दिव्यत्वाची पेरणी व जोपासना केल्यास तो उज्ज्वल काळ कधीं ना कधीं आल्याशिवाय रहाणार नाहीं, या विचारसरणीवर त्यांची श्रद्धा होती.

त्या भूतकालीन दिव्यत्वाची जाणीव करून देऊन राष्ट्रांत नवचैतन्य खेळविण्याच्या उदात्त कामगिरीकडे यापुढें आपण आपलें सारें लक्ष वळवावयाचें, असा निर्धार करून नाथमाधवांनीं आपला नवा दीर्घोद्योग मोठ्या जोमानें सुरू केला. त्यांना मराठी वाङ्मयाकडे व जनताजनार्दनाकडे पहाण्याची नवदृष्टि प्राप्त झाली होती.

नाथमाधवांना तीनशें वर्षांपूर्वीच्या काळांतील शिवशाहीचा उज्ज्वल इतिहास महाराष्ट्रीय जनतेपुढें परिणामकारक रीतीनें उभा करावयाचा होता. त्याद्वारें त्यांना जनतेला स्वकर्तव्याचे व पराक्रमाचे धडे द्यावयाचे होते. ही गोष्ट वरकरणीं वाटते

तेवढी सहजसुलभ नव्हती. त्यासाठीं दीर्घकालीन तपस्येची जरुरी होती. 'पी हळद आणि हो गोरी' असा तडकाफडकी कारभार त्यांना करावयाचा नव्हता.

नाथमाधवांनीं मनाशीं ठरविलें कीं, कितीही वर्षांचा कालावधि लागो. मराठ्यांच्या इतिहासाचा सांगोपांग रीतीनें अभ्यास करावयाचा. त्यांत कसूर म्हणून बिलकूल करावयाची नाहीं. शिवकालीन इतिहासावर नवा प्रकाश पाडणारीं साधनें विपुल प्रमाणांत उपलब्ध होऊं लागलीं होतीं, तीं सर्व साधनें त्यांनीं महत् प्रयासांनीं जवळ केलीं. इतिहाससंशोधक राजवाडे, खरे व विशेषतः रियासतकार रा. सा. गोविंदराव सरदेसाई यांच्यासारख्यांशीं निकट संबंध जोडले व या विषयाशीं ते तद्रूप झाले.

सुमारें तीनशें वर्षांपूर्वीच्या काळांत अत्यंत बिकट परिस्थितींत श्रीशिवछत्रपतींनीं स्वराज्यस्थापनेची मुहूर्तमेढ कशी रोविली, लोकसंग्रह करून विपरीत व धोकेबाज परिस्थितींत त्यांनीं स्वराज्यस्थापना कशी केली, त्या काळांतील शत्रूंशीं युक्ती-प्रयुक्तीनें त्यांनीं टक्कर कशी दिली, या साऱ्या गोष्टींशीं एकरूप होऊन त्या नाथ-माधवांस वाचकांपुढें परिणामकारक पद्धतीनें ठेवावयाच्या होत्या. अशा या मार्गाचा अवलंब करून त्यांना कांहींतरी महत्त्वाचें उद्दिष्ट साधावयाचें होतें.

हें महत् कार्य परिणामकारक रीतीनें पार पाडावयाचें तर गेल्या तीनशें वर्षां-पूर्वीच्या काळांत प्रवेश करून त्या काळांतील रूढी व समजुती, त्या काळांतील स्त्री-पुरुषांचे स्वभावविशेष, चालीरीती, वगैरे सर्व गोष्टींचा यथासांग अभ्यास करणें जरूर होतें. आपली जबाबदारी नाथमाधव बरोबर ओळखून होते. श्रीशिवछत्र-पतींनीं व त्यांच्या सहकाऱ्यांनीं ज्या ज्या भागांत नाना कारस्थानें केलीं, लढाया मारल्या व ज्या ज्या प्रदेशांशीं त्यांचा संबंध आला, ते विभाग, तीं स्थळें, ते डोंगरपठार, तीं मंदिरें, ते कोट-किल्ले वगैरे सर्व प्रत्यक्ष पहाण्याची जरुरीही नाथ-माधव ओळखून होते. आपण पायांनीं पंगू; मग हीं स्थळें प्रत्यक्ष पहावयाचीं कशीं? याचा विचार करीत ते निराश होऊन स्वस्थ बसले नाहींत. पुणें, मावळ-प्रांत, सातारा, सांगली, कोल्हापूर, हैद्राबाद, गोमंतक वगैरे सर्व विभागांचें व त्या विभागांतील सर्व ऐतिहासिक स्थळांचें त्यांनीं कधीं मेण्यांतून तर कधीं एकाद्या सहकाऱ्याच्या सहाय्यानें प्रत्यक्ष निरीक्षण केलें.

प्रत्येक प्रसंगाशीं व स्थळाशीं ते तदाकार झाले आणि म्हणूनच नाथमाधवांच्या स्वराज्यावरील कादंबऱ्यांतील विविध प्रसंग वाचीत असतां वाचक तल्लीन होऊन जातात.

प्रत्येक कादंबरींतून मनाची पकड घेणाऱ्या व वाचकांची उत्कंठा वाढविणाऱ्या विविध प्रसंगांची पखरण घातलेली दिसून येते. स्वामिभक्तीनें प्रेरित होऊन शत्रूच्या गोटांतून गुप्त वेषानें फिरणारे शिवाजी महाराजांचे गुप्त हेर, पुरुष वेषांत जीव मुठींत घेऊन देशाच्या स्वातंत्र्यासाठीं रानावनांतून फिरणाऱ्या शूर तरुण स्त्रिया, त्यांच्यावर ओढवलेले प्रसंग, स्वातंत्र्यासाठीं प्राणांची पर्वा न करणारे स्वामिभक्त इमानी सेवक व त्यांची उज्वल देशभक्ति वगैरे स्फूर्तिदायक प्रसंग वाचीत असतां त्या त्या प्रसंगाशीं वाचक क्षणार्धांत तल्लीन होऊन जातो व त्याच शूर वीर पूर्वजांचे आम्ही वंशज आहोंत काय ? असा प्रश्न तो सहाजिकपणें स्वतःस विचारूं लागतो.

वाचकांपुढें अशा प्रकारचें प्रश्नचिन्ह उभें करून, त्यांच्या अंतरंगांत खळबळ उडवून व त्यांना अंतर्मुख बनवून राष्ट्रजागृतीचें कार्य नाथमाधवांस पारतंत्र्याच्या काळांत पार पाडावयाचें होतें.

स्वराज्यावरील कादंबऱ्या लिहून आपल्या देशबांधवांत स्वातंत्र्यप्रेम, त्यासंबंधींची तळमळ व तें प्राप्त करून घेण्यासाठीं लागणारे जरूर ते आत्मविश्वास, त्याग आदि गुण उत्पन्न करण्याची अभिलाषा नाथमाधवांनीं बाळगिली होती. 'स्वराज्याचा श्रीगणेशा' ही त्यांची शिवकालीन इतिहासावरील पहिली कादंबरी १९२१ सालीं प्रसिद्ध झाली. त्या कादंबरीची प्रस्तावना मोठी सूचक आहे. प्रकाशकांचे आभार मानतांना शेवटीं नाथमाधव म्हणतात, 'आपल्या पूर्वजांच्या **मार्गदर्शक** व **स्फूर्तिदायक** इतिहासाची ही कादंबरीरूप अल्पस्वल्प सेवा माझ्या हातून घडवून आणल्याबद्दल मी प्रकाशकांचा आभारी आहें."

ज्या पारतंत्र्याच्या काळांत स्वराज्यावरील कादंबऱ्यांचें प्रकाशन झालें त्या काळांत यापेक्षां अधिक सूचक आत्मकथन हानिकारक ठरलें असतें.

नाथमाधवांच्या या कादंबऱ्यांचें महत्त्व ओळखून तें उघडपणें कथन करणारे वाचक आजच्या स्वातंत्र्यकाळांत घरोघर भेटतील; परंतु त्या काळांतील मर्मज्ञही हें महत्त्व ओळखून होते.

१९२८ सालीं नाथमाधवांचें निधन झालें. त्या निधनानिमित्त दुःख प्रदर्शित करण्यासाठीं पुणें येथें काळकर्ते प्रो. शिवराम महादेव परांजपे यांच्या अध्यक्षतेखालीं एक सभा भरविण्यांत आली होती. त्या प्रसंगीं भाषण करतांना प्रो. शिवरामपंत म्हणाले होते कीं, "नाथमाधवांच्या कादंबऱ्यांचा विशेष हा कीं, त्यांच्या कादंबऱ्यांतून

आमचा ओजस्वी इतिहास सांठविलेला आहे. केवळ प्रेम सांठविलेलें नाहीं. मनोरंजनापेक्षां किंवा प्रेमापेक्षां देशाचें स्वातंत्र्य या राष्ट्राला आवश्यक आहे; आणि त्या स्वातंत्र्याची जाणीव करून देणारा लेखक नाहींसा व्हावा ही अत्यंत खेदाची गोष्ट होय. ते स्वतः जरी पंगू होते तरी आपल्या देशबांधवांना पंगू करून ठेवण्याची त्यांची इच्छा नव्हती. आपण जरी दुर्दैवानें पंगू झालों तरी आपल्या देशबांधवांनीं स्वतःच्या पायांवर उभे रहावें व पराक्रमी व्हावें याच सदिच्छेनें नाथमाधवांनीं कादंबऱ्या लिहिल्या. ते सिंहगडावर शिकार करीत असतां खालीं कोसळले असतील; परंतु त्यांची इच्छा अशी नव्हती कीं, माझ्या सर्व देशबांधवांनीं सिंहगडावरून खालीं कोसळावें! त्यांनीं **सिंहगड चढावा** अशाच उदात्त भावनेनें त्यांनीं कादंबरीलेखन केलें. त्यांची इच्छा ग्रंथकार होण्यापेक्षां लष्करांत शिरून पराक्रम गाजवावा अशी होती व म्हणून तर त्यांनीं सिंहगडावर दौड केली; परंतु नशिबानें त्यांना दगा दिला व ते पंगू झाले. **अशा रीतीनें पंगू झालेला मनुष्य पंगू नाहीं, तर ज्याचें मन पंगू तोच पंगू, ही अगदीं सत्य गोष्ट नाथमाधवांनीं आपल्या चारित्र्यानें महाराष्ट्रालाच नव्हे तर सर्व हिंदुस्थानाला व जगाला दाखवून दिली आहे.** नाथमाधवांना दैवानें पंगू केलें असलें तरी आपल्या देशबांधवांच्या पंगुत्वाच्या निराकरणार्थ ते झटून प्रयत्न करीत होते. त्या हेतूनें देशभक्तियुक्त अशाच कादंबऱ्या त्यांनीं लिहिल्या."

सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी प्रो. शिवरामपंत परांजपे यांनीं नाथमाधवांसंबंधानें बोलतांना काढलेल्या वरील उद्गारांतील उपरोध व खोंच कोणालाही सहज समजण्यासारखी आहे.

आपल्या ऐतिहासिक कादंबरीलेखनांत जरूर असलेली कांहीं माहिती मिळविण्यासाठीं नाथमाधव हे १९२५ सालीं गोमंतकांत गेले होते. ते मडगांव येथें असतां गोमंतकाच्या स्वातंत्र्यासाठीं झटणारे व झगडणारे, व त्यापायीं परागंदा झालेले 'हिंदु' पत्राचे संपादक श्री. दत्ता पै यांच्या अध्यक्षतेखालीं त्यांचें एक भाषण झालें. त्या वेळीं नाथमाधवांच्या कार्याचा परिचय करून देतांना त्या काळांत श्री. दत्ता पै यांनीं काढलेल्या उद्गारांचा येथें उल्लेख करण्याचा मोह आम्हांला अनावर होत आहे. श्री. दत्ता पै म्हणाले होते, "फ्रान्स देशांत रुसो, वाल्टेयर, वगैरे लोकांनीं फ्रेंच राज्यक्रांतीपूर्वी आपल्या लेखनकौशल्यानें आपल्या देशाची जी परिस्थिति घडवून आणिली व सर्व प्रजेंत जो जोम उत्पन्न केला, तीच परिस्थिति

व तोच जोम श्री. नाथमाधव हे आपल्या स्वराज्यावरील कादंबऱ्यांनीं घडवून आणीत आहेत. जें ध्येय पुढें ठेवून ते स्वराज्यावरील कादंबऱ्या लिहीत आहेत तें उच्च असून सध्यांच्या स्वराज्याच्या चळवळीस अत्यंत पोषक असेंच आहे; कारण वर्तमानपत्रें, मासिकें व इतर पुस्तकें यांच्याद्वारें जरी स्वराज्याचा उहापोह होत असला, तरी त्यांचा प्रसार कादंबऱ्यांसारखा समाजाच्या खालच्या थरापर्यंत होत नाहीं. यावरून कादंबरीकार या नात्यानें नाथमाधवांचा दर्जा किती श्रेष्ठ प्रतीचा आहे हें समजून येईल."

गोमंतकाच्या स्वातंत्र्यासाठीं ज्यांचा आत्मा अखेरपर्यंत तळमळत होता व त्याच ध्यासांत ज्यांनीं अखेर आपला देह ठेविला अशा कै. दत्ता पै यांच्या वरील उद्गारांत नाथमाधवांचें स्वराज्यविषयक कादंबऱ्या लिहिण्यामागील उद्दिष्ट स्पष्ट होत आहे; त्याचबरोबर श्री. दत्ता पै यांची मर्मज्ञताही व्यक्त होत आहे.

आपल्या हातून पंगू स्थितींतही कांहींतरी भरीव स्वरूपाची व उपयुक्त अशी राष्ट्र-सेवा घडावी व अशा रीतीनें जन्मा आलियाचें सार्थक घडावें, याच टोंचणीनें त्यांनीं स्वराज्यावरील कादंबऱ्या लिहिण्यासाठीं आपल्या जिवाचें रान केलें. ज्या दिवशीं त्यांना ही जाणीव झाली त्या वेळेपासून त्यांनीं त्या कार्याच्या उभारणीसाठीं व जरूर असलेली साधनसामुग्री हरप्रयत्नांनीं जमविण्यासाठीं आपली खचलेली कंबर कसली ! कारण त्यांना जनतेंत स्वातंत्र्याची तीव्र तळमळ व त्याच्या प्राप्तीसाठीं लागणारी त्यागवृत्ती निर्माण करावयाची होती.

स्वराज्यावरील कादंबऱ्यांच्या रूपानें आपण जें बीं पेरीत आहोंत, तें आज ना उद्यां सत्कारणीं लागल्याशिवाय रहाणार नाहीं अशी त्यांची पक्की खात्री होती. त्या बीजाचीं फळें कदाचित् आपणास नाहीं चाखायला मिळणार; परंतु आपल्या नंतरच्या पिढीला तरी स्वातंत्र्याचीं गोड फळें चाखायला मिळतीलच मिळतील, असे स्पष्ट उद्गार त्यांनीं 'कर्मयोगी' या आपल्या निबंधांत काढले आहेत.

एक वर्षापूर्वी (जून १९५२) मुंबईंत नाथमाधव स्मारक समितीतर्फे त्यांच्या पुण्यस्मरणार्थ मुंबई सरकारचे अन्नमंत्री ना. यशवंतराव चव्हाण बी. ए. एल्एल्. बी. यांच्या अध्यक्षतेखालीं एक जाहीर सभा भरविण्यांत आली होती. त्या प्रसंगीं ना. यशवंतराव चव्हाण यांनीं केलेलें भाषण या दृष्टीनें अत्यंत सूचक व अर्थबोधक होतें. ते म्हणाले होते कीं, "मी स्वातंत्र्याच्या चळवळींत भाग

घेऊन जो कांहीं यथाशक्ति त्याग करण्यास तयार झालों, त्याच्यामागें माझी विशिष्ट मनोभूमिका होती. ही भूमिका नाथमाधवांच्या कादंबऱ्यांनीं तयार केली. मला स्वराज्याच्या चळवळींत भाग घेण्याची स्फूर्ति नाथमाधवांच्या स्वराज्यावरील कादंबऱ्यांमुळें झाली. त्यामुळें त्यांच्या कादंबऱ्यांचें महत्त्व मला भारी वाटतें. त्या दृष्टीनें मी त्यांचा एक ऋणाईत आहें; व तें ऋण फेडण्यासाठीं मी येथें आलों आहें."

नाथमाधवांच्या स्वराज्यावरील कादंबऱ्यांनीं कोणतें कार्य घडवून आणिलें? या प्रश्नास यापेक्षां दुसरें समर्पक उत्तर कोणतें असणार?

आपल्या लेखणीचा उपयोग राष्ट्रकल्याणासाठीं शक्य त्या प्रमाणांत झाला पाहिजे ही जाणीव झाल्यापासून नाथमाधवांनीं अहर्निश तोच ध्यास घेतला होता. त्यांनीं मराठी वाङ्मयाचा त्याचप्रमाणें ऐतिहासिक साधनांचा अत्यंत काळजीपूर्वक व सखोल अभ्यास केला. 'मराठी वाङ्मय' या विषयावर त्यांनीं लिहिलेला निबंध वाचला असतां याची सत्यता बरोबर पटते. त्या निबंधांत एके ठिकाणीं ते म्हणतात, "राष्ट्राच्या हिताच्या आणि त्याच्या भावी उत्कर्षाच्या दृष्टीनें वाङ्मय कसें असलें पाहिजे, आजपर्यंतच्या वाङ्मयांत गुणदोष कोणते आहेत, त्यांत समाजामध्यें तेज व जीवन उत्पन्न करण्यासारखें सामर्थ्य आहे किंवा नाहीं, याचा विचार करून आमचें वाङ्मय कसें वाढेल हें आपण पाहिलें पाहिजे."

यावरून व त्यांनीं आपल्या हयातींत अत्यंत विपरीत परिस्थितींत जें कार्य पार पाडिलें, त्यावरून लेखक या दृष्टीनें नाथमाधवांस स्वकर्तव्याची जाणीव व तत्संबंधीं तळमळ किती तीव्रतेनें होती हें दिसून येतें.

स्वराज्यावरील ऐतिहासिक कादंबऱ्या ही नाथमाधवांची चिरस्मरणीय कामगिरी होय. या कार्याची त्यांनीं जी भव्य व टोलेजंग आंखणी केली होती, तसेंच त्यासाठीं स्वतःच्या पंगू स्थितींतही त्यांनीं आत्यंतिक कष्ट घेऊन जी पूर्वतयारी केली होती, ती पाहिली म्हणजे मन थक्क होऊन जातें व राष्ट्राला उपकारक होऊन रहाणाऱ्या या भव्य कामगिरीचा जेमतेम चौथा हिस्साच त्यांच्या हातून पार पडूं शकला, व या कामगिरीवर असतां त्यांचें आयुष्य मध्येंच खुंटलें, याबद्दल मनाला विषण्णता आल्याशिवाय रहात नाहीं.

स्वराज्यमालेंत स्वराज्याच्या श्रीगणेशापासून तों स्वराज्याच्या समाप्तीपर्यंत एकंदर तीस कादंबऱ्या लिहिण्याचा त्यांचा मानस होता; परंतु नंतर त्यांनीं सव्वीस

हा आंकडा कायम केला. त्या कादंबऱ्यांची एकंदर आंखणीही त्यांनीं करून ठेविली होती. पेशवाईचा अस्त १८१८ मध्यें झाला. तेथपर्यंतच्या काळाची व हालचालींची आंखणी त्यांनीं केली होती.

या कादंबरीमालेंत स्वराज्याच्या श्रीगणेशापासून स्वराज्याच्या दुफळीपर्यंत म्हणजे राजाराम महाराजांच्या अखेरपर्यंतचा कादंबरीरूप इतिहास त्यांनीं पुढीलप्रमाणें सात पुष्पें गुंफून महाराष्ट्रास सादर केलाः—( १ ) स्वराज्याचा श्रीगणेशा, ( २ ) स्वराज्याची घटना, ( ३ ) स्वराज्याची स्थापना, ( ४ ) स्वराज्याचा कारभार. ( ५ ) स्वराज्यावरील संकट, ( ६ ) स्वराज्याचें परिवर्तन, ( ७ ) स्वराज्यांतील दुफळी.

नाथमाधवांच्या हातून या नियोजित कार्याची पूर्तता झाली नसली तरी त्याकडे सर्वस्वीं दुर्लक्ष करून चालणार नाहीं. त्यांनीं आपल्या सर्व कादंबऱ्यांचीं नांवें व प्रत्येक कादंबरीसाठीं जरूर तीं मार्गदर्शक टांचणेंही महत् प्रयासपूर्वक करून ठेविलीं होतीं. त्यांच्या नियोजित कादंबऱ्यांचीं नांवें पुढीलप्रमाणें होतीं—( ८ ) स्वराज्याचें संरक्षण, ( ९ ) स्वराज्याचें संवर्धन, ( १० ) स्वराज्याचें एकीकरण, ( ११ ) स्वराज्याची मीमांसा, ( १२ ) स्वराज्याचा दरारा, ( १३ ) स्वराज्याचें सौंदर्य, ( १४ ) स्वराज्याची प्रतिष्ठा, ( १५ ) स्वराज्याची समृद्धी, ( १६ ) स्वराज्याचा विस्तार, ( १७ ) स्वराज्यांतील गंडांतरें, ( १८ ) स्वराज्याचा घात, ( १९ ) स्वराज्याची दुर्दशा, ( २० ) स्वराज्यांतील मालिन्य, ( २१ ) स्वराज्यांतील यादवी, ( २२ ) स्वराज्यांतील फाटाफूट, ( २३ ) स्वराज्यावरील विपत्ति, ( २४ ) स्वराज्यावरील आघात, ( २५ ) स्वराज्याचा विध्वंस व ( २६ ) स्वराज्याची समाप्ति. ही कादंबरीमाला नाथमाधवांच्या हातून पूर्णत्वास आली असती तर काय बहार झाली असती ! परंतु मनोवांच्छित साऱ्याच योजना पूर्णत्वास आणण्याचें भाग्य या जगांत किती जणांच्या वांट्यास येत असतें ?

जनतेंत जागृति घडवून आणण्याचें नाटक हें एक प्रभावी साधन आहे हें जाणून त्यांनीं 'मराठ्यांचा आत्मयज्ञ,' 'जातिवंत मराठा वीर,' 'लोकसंग्रह' यासारखीं स्वराज्यकाळावरील स्फूर्तिदायक नाटकें लिहून त्या मार्गानेंही त्यांनीं जनतेंत जागृति घडवून आणण्याचे प्रयत्न केले; परंतु त्यांचीं नाटकें कादंबऱ्यांप्रमाणें लोकप्रिय झालीं नाहींत.

---

## प्रकरण पांचवें

# नाथमाधवांचा कर्मयोग

**ना**थमाधव हे एकनिष्ठ व खरखुरे कर्मयोगी होते. सतत विपरीत परिस्थितीशीं झगडत व आलेल्या संकटांशीं हंसतमुखानें तोंड देत त्यांनीं निष्कामवृत्तीनें कर्माचरण केलें. त्यांनीं संकटांकडे केव्हांही पाठ फिरविली नाहीं अथवा विपन्नावस्था वांट्यास आली म्हणून ते कधीं मुळूमुळू रडतही बसले नाहींत.

लोकमान्य टिळकांचें **'गीतारहस्य'** हा त्यांचा अत्यंत आवडता ग्रंथ होता. त्या ग्रंथाचीं अनेक पारायणें करून त्यांतील कर्मयोगाचें तत्त्वज्ञान पचविण्याचा व तदनुरूप आचरण करण्याचा त्यांनीं अहर्निश प्रयत्न केला. गीतारहस्याचें मानवी जीवनांत फार मोल आहे हें त्यांनीं ओळखिलें; परंतु एवढा मोठा ग्रंथ वाचून काढणें व पचविणें सर्वसाधारण स्थितींतील माणसांस अशक्य आहे हें जाणून गीतारहस्याचें रहस्य साररूपानें गोड व साध्या भाषेंत कथन करणारें व अवघ्या चार आण्यांत उपलब्ध होणारें **'गीतारहस्याचें रहस्य'** त्यांनीं लिहून काढलें होतें. त्यावरून गीतारहस्यावर व त्यांतील कर्मयोगी तत्त्वज्ञानावर त्यांची किती अढळ श्रद्धा होती हें स्पष्ट होत आहे.

आपल्या वांट्यास आलेलीं नित्यनैमित्तिक कामें, फलाशा न बाळगितां उत्तम प्रकारें पार पाडणें व इतरेजनांसाठीं नेहमीं कांहींना कांहीं त्याग करणें, यांतच मनुष्यजन्माचें सार्थक आहे याची जाणीव नेहमीं बाळगून ते वागत असत. 'कर्मयोगी' या आपल्या एका निबंधांत नाथमाधव म्हणतात, "खरें सौख्य मिळूं लागण्याला विचाराच्या भराऱ्या सोडून कर्तबगारी करून दाखविली पाहिजे. निष्कर्म होऊन जगांत कसें रहावें, संसार करून त्याच्यांत कसें गुंतूं नये, हें कर्मयोग्याशिवाय इतरांस समजणार नाहीं." कर्मयोग्याचें हें तत्त्वज्ञान नाथमाधवांनीं प्रत्यक्षपणें आपल्या आचरणांत आणून दाखविलें.

खरें पहातां, त्यांच्या वांट्यास असहाय्य अशी पंगू स्थिति आलेली ! दुसऱ्यास भारभूत होऊन रहाणारी अशीच ती स्थिति होती; परंतु आयुष्याच्या अखेरीपर्यंत त्यांनीं स्वतःचा भार कोणावरही न टाकतां इतरांचे भार मात्र आपण शिरोधार्य करून ते आपल्या पंगू जीवनाशीं अखेरपर्यंत हंसतखेळत राहिले !

विवाहासाठीं निघण्याच्या तयारींत असतांच त्यांना सिंहगडावर आरोहण करून वाघाच्या शिकारींत सामील व्हावें लागलें व त्यांत शेवटीं त्यांचीच शिकार झाली ! अशा रीतीनें वैवाहिक किंवा सुखी संसारी जीवनाला ते आंचवले. त्यांचा संसार म्हणजे त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें झाल्यास 'संन्याशाचा संसार' होता. त्यांना आपल्या बंधूच्या संसाराची सर्व जबाबदारी शिरावर घेऊन ती पार पाडावी लागली, आणि त्यांनीं ती अत्यंत कसोशीनें व उत्तम प्रकारें पार पाडिली. एकाद्या संसारी व कुटुंबधारी माणसाला ज्या चिंता बाळगाव्या लागतात व व्याप हाताळावे लागतात ते सर्व त्यांनीं हंसतखेळत संभाळले व हाताळले; एवढेंच नव्हे तर इतर अनेकांचे संसार सुखासमाधानाचे व आनंदाचे व्हावे म्हणून त्यांनीं कोणत्याही प्रकारें कुरकुर न करतां आयुष्यभर नाना प्रकारें झीजही सोसली.

आजच्या सुधारलेल्या व वाचनाभिरुची वाढलेल्या काळांतही एकाद्या लेखकानें लेखनव्यवसायावर मला जगावयाचें आहे म्हटल्यास त्याचें तें म्हणणें हास्यास्पद ठरेल; मग ३०–४० वर्षापूर्वीच्या काळांत केवळ लेखनव्यवसायावर मानमरातबानें जगणें नाथमाधवांस किती कठीण गेलें असेल याची कल्पना आपण करूं शकतों. परंतु या ठिकाणीं एक गोष्ट स्पष्ट करणें जरूर आहे. कादंबरीकार या नात्यानें त्यांनीं एवढी लोकप्रियता संपादन केली होती कीं, त्यांना एकाच वेळीं एका रकमेनें हजार दोन हजार रुपये मोजणारे प्रकाशक सुदैवानें लाभत असत. कधीं कधीं आर्थिकदृष्ट्या त्यांना त्रासही सोसावा लागत असे; परंतु त्यांनीं त्याबद्दल कधीं खंत बाळगली नाहीं; याचें मुख्य कारण म्हणजे त्यांनीं आपल्या अंतरींचा ज्ञानदिवा सतत पेटता व दैदीप्यमान करून ठेविला होता. त्या दिव्य प्रकाशांत वावरणाऱ्याला संकटांची किंवा चिंतेची बाधा कोठून होणार ?

आपल्या वांट्यास विपरीत परिस्थिति आलेली आहे. ती आनंदानें सोसणें व त्यांतून विचारेंकरून पार जाणें हें आपलें एकमेव कर्तव्य आहे, याची खूणगांठ बांधून त्यांनीं आपलें लक्ष कर्मयोगाचरणावर केंद्रीभूत केलें. तसेंच सांगोपांग रीतीनें त्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास करून तें आचरणांत आणिलें.

मानसशास्त्र, ज्योतिषशास्त्र, स्वप्नरंजनशास्त्र, मंत्रतंत्रशास्त्र वगैरे सर्व शास्त्रांचा त्यांनीं अभ्यास केला. इतरांच्या समाधानासाठीं व कल्याणासाठीं त्या शास्त्रांचा त्यांनीं प्रसंगोपात स्वतः झीज सोसून उपयोगही केला. परंतु आपल्या ध्येयावर त्यांनीं

अढळ निष्ठा ठेविली. एक कर्मयोगी या नात्यानें त्यांनीं जें आपलें जीवनकार्य म्हणून एकदां ठरविलें, त्याला ते अखेरपर्यंत चिकटून राहिले.

रियासतकार रा. सा. गो. स. सरदेसाई यांचे कर्तबगार चिरंजीव निधन पावल्यानंतर त्यांच्या समाधानासाठीं नाथमाधव त्यांच्या घरीं गेले. या प्रसंगास अनुलक्षून रियासतकार आपल्या आठवणींत म्हणतात, "दोन तासपर्यंत इहलोकच्या कष्टमय संसारयात्रेवर त्यांचें व आम्हां उभयतां नवराबायकोंचें जें प्रेमळ व हृदयस्पर्शी संभाषण झालें, तेणेंकरून आमच्या मनास फार हलकें वाटलें आणि नाथमाधवांचा मधुर उपदेश आम्हांस उपयोगी पडला. त्या प्रसंगावरून त्यांच्या **तपस्वी वृत्तीची योग्यता** मला विशेष कळून आली; आणि प्रत्येक प्राणी कांहीं तरी विशिष्ट कामगिरीकरितां जन्मास येतो, ती कामगिरी करण्यांतच त्यानें आपला देह झिजवावा, यापलीकडे जास्त फलाची आकांक्षा मनांत धारण करूं नये, आणि अखेरचें पाचारण येतांच संतुष्ट अंतःकरणानें प्रयाणास सदैव तयार असावें, अशा प्रकारचा अल्प प्रबोध नाथमाधवांच्या भेटीपासून मला मिळाला, तोच मी अद्यापही पाळीत आहें."

किती बहुमोलाचे शब्द आहेत हे! यावरून नाथमाधवांच्या जीवनरहस्याचा उलगडा होईल. जन्मभर कर्तव्यपालन करीत व संधी मिळेल तेव्हां लोकोपकार करीत नाथमाधवांनीं आपल्या आयुष्याचा सत्कारणीं व्यय केला. ज्याच्यावर आयुष्याच्या ऐन उमेदीच्या काळांत कंबरडें मोडून पांगळा होण्याचा दुर्धर प्रसंग ओढवला, त्या माणसाची केवढी ही कर्तबगारी! रियासतकार सरदेसाई यांनीं त्यांच्यापासून जो सुबोध संपादिला व जो आपल्या जीवनांत ते इमानेंइतबारें आजही अक्षरशः अंमलांत आणीत आहेत, त्यापासून आम्हांलाही कांहीं शिकतां येणार नाहीं काय?

लेखन, वाचन व संशोधन हा तर नाथमाधवांचा निदिध्यास होता; परंतु त्याविरहित कितीतरी व विविध प्रकारच्या छंदांशीं ते संलग्न झालेले होते. स्वप्नें पडताळून पहाणें, त्यांचीं टिपणें करून ठेवणें व त्यांचें संशोधन करणें हा एक दीर्घकाळपर्यंत त्यांना जडलेला छंद होता. ज्योतिषशास्त्राचा व मंत्रतंत्रादि उपचारांचा त्यांनीं सांगोपांग अभ्यास केलेला होता. स्वतःला आर्थिकदृष्ट्या फायदा व्हावा यासाठीं त्यांनीं हीं शास्त्रें अभ्यासिलीं नाहींत व तसा त्यांनीं कधीं त्यांचा उपयोगही

करून घेतला नाहीं; परंतु इतरेजनांस त्यांपासून समाधान लाभतें ना ? तें आपण त्यांस सुकरतेनें मिळवून द्यावें हीच त्यांची दृष्टी होती. ज्योतिष व हस्तसामुद्रिक यांचा व्यासंग करीत असतां लहानापासून थोरांपर्यंत हजारों स्त्रीपुरुषांच्या कुंडल्या मिळवून त्यांचा त्यांनीं अभ्यास केला व त्यांच्या आधारें ज्योतिषशास्त्रासंबंधीं कांहीं ठोकताळे त्यांनीं बसविले होते.

या त्यांच्या व्यासंगामुळें त्यांच्याकडे सल्लामसलतीसाठीं रोज निरनिराळ्या पेशाचे कितीतरी लोक येत असत व त्यांचा बहुमोल वेळ घेत असत; परंतु त्यामुळें ते कधीं त्रासले नाहींत. "माझ्याकडे आल्यानें त्यांना समाधान मिळतें, मग तें देण्यास मीं कां कचरावें ? तें आनंदानें देऊन त्यांचें जीवन सुखी करणें हेंच माझें जीवनकार्य" असें ते म्हणत असत.

त्यामुळें दिवसभरांत त्यांना आपला लेखनव्यवसाय करण्यास सवड मिळत नसे. मग काय करावयाचें ? रात्रौ अकरा वाजतां ते लिहायला बसत असत व पहांटेपर्यंत जेवढें होईल तेवढें लेखन उरकीत असत.

जडजवाहिराच्या परीक्षेंत व अश्वपरीक्षेंतही ते वाकबगार होते. संगीत व नाट्य या कलांचे ते भोक्ते होते; व या कलांचा आस्वाद घेण्याची आलेली संधी ते सहसा दवडीत नसत. कै. अच्युतराव कोल्हटकर यांच्या 'नारिंगी निशाण' या ऐतिहासिक नाटकांत त्यांनीं बसकी व महत्त्वाची भूमिकाही केली होती.

नाना प्रकारच्या दुर्धर प्रसंगांतून त्यांना जावें लागलें, परंतु मनाचा समतोलपणा त्यांनीं कधीं गमावला नाहीं. त्यांच्या चिर आनंदी स्वभावाचें वर्णन कुठवर करावें? ते शरीरानें दुबळे असले तरी मनानें पूर्ण खंबीर होते. मनाचें अचाट सामर्थ्य त्यांनीं ओळखलें होतें. मनाच्या खंबीरतेमुळें त्यांनीं अखंड अशा जीवनसंग्रामांत यश संपादन केलें. त्यांनीं आपल्या मनाला सैतानाचा कारखाना बनूं दिलें नाहीं. त्याला पूर्णपणें ताब्यांत ठेवून आपला जीवनोद्देश साध्य करण्यासाठीं व लोककल्याणासाठीं त्याचा जितका म्हणून उपयोग करून घेतां येईल तितका त्यांनीं करून घेतला.

दुसऱ्यांच्या उपयोगी पडणें, दुसऱ्यांचा दुःखभार शक्य तेवढा हलका करणें व स्वतः कळ सोसून व वेळप्रसंगीं पैशांचा व बहुमोल वेळेचा त्याग करूनही दुसऱ्यांच्या भल्यासाठीं झटणें हें ध्येय त्यांनीं आपल्या दृष्टीसमोर सतत ठेविलें होतें. तोच त्यांचा जीवनानंद होता. आपला संन्याशाचा संसार चालविण्यासाठीं त्यांना

लेखनव्यवसाय करणें प्राप्त होतें; त्यासाठीं दिवसभरांत कधीं सवड मिळाली नाहीं तरी न दगदगतां त्यांनीं रात्रीचा दिवस करावा, परंतु कधींही कोणाला दुखवूं नये.

दुर्दैवानें वांव्यास पंगूपणा आल्यामुळें त्यांचें जिणें परावलंबी व असहाय्य झालें; परंतु त्यावरही त्यांनीं मात केली. स्वतः स्वावलंबी बनून त्यांनीं अनेकांस स्वावलंबनाचा मार्ग दाखविला. त्यांच्याकडे शिकण्याच्या दृष्टीनें कोणी आल्यास त्याची त्यांनीं कधीं निराशा केली नाहीं. आपणास जें कांहीं अवगत असेल तें त्याला सांगून त्याचा मार्ग ते सुकर करून देत असत.

परिस्थिति कितीही बिकट असेना कां, तिच्यापुढें आपण न वांकतां तिच्यावर स्वार होऊन कामास लागावयाचें व आपलें इच्छित ध्येय गांठावयाचें, हा धडा नाथमाधवांच्या जीवनापासून प्रत्येकानें शिकण्यासारखा आहे.

जीवन म्हणजे एक संग्राम आहे असें म्हणतात; आणि तें खरेंही आहे; परंतु या जीवनसंग्रामांत अखेरपर्यंत टिकाव धरून त्यांत यश मिळविणारे लोक फारच थोडे आढळून येतात. नाथमाधवांच्या वांव्यास सर्वसाधारण माणसांचें जीवन आलें नाहीं. ऐन तारुण्यांत त्यांच्या देहाचा कडेलोट झाला. कंबरेखालीं देह निर्जीव व निःसत्त्व झाला. जीवनाचा पाया डळमळीत झाला, मग त्यावरील इमारत कशी शाबूत रहावी? परंतु तरीही न डगमगतां त्यांनीं मन खंबीर बनवून देहाचा डोलारा सांवरून धरला व त्याच्याकरवीं अशी आश्चर्यकारक करामत घडवून आणिली कीं, कोणींही ती कर्तबगारी पाहून आश्चर्यानें तोंडांत बोटें घालावीं! साध्या-सुध्या नव्हे, तर विपरीत जीवनसंग्रामांत टिकाव धरून व स्वतःसाठीं एक नवीन कार्यक्षेत्र निर्माण करून ते यशस्वी कर्मवीर ठरले!

त्यांनीं स्वतःसाठीं जें कार्यक्षेत्र निर्माण केलें तें सर्वस्वी अभिनव स्वरूपाचें होतें. आपलें कंबरडें मोडलें! आतां आपल्या हातून काय होणार? अशा निराशजनक विचाराच्या पकडींत न सांपडतां त्यांतूनच आपल्या खडकाळ जीवनांत नंदनवन फुलविण्याचा त्यांनीं निर्धार केला व तें फुलवून दाखविलें! कोणत्याही रूपानें असेना कां; आपला देह सत्कारणीं लागावा, आपल्याकडून स्वदेश, स्वभाषा व स्वसंस्कृती यांची सेवा घडावी, ही ईर्षा त्यांनीं बाळगिली व तिच्या पूर्ततेसाठीं त्यांनीं आपल्या जिवाचें रान केलें. त्यासाठीं त्यांनीं सरस्वतीची उपासना निष्ठापूर्वक केली व ती फळास आल्यानंतर तिचा शक्य तेवढा सदुपयोग त्यांनीं लोकजागृतीसाठीं केला.

या त्यांच्या उपासनेसंबंधान कै. अच्युतराव कोल्हटकर एके ठिकाणीं म्हणतात, "जेथें सरस्वतीची सेवा हें कुलव्रतच होतें, तेथें एकादा वंशज सरस्वतीच्या विशेष कृपेंतला निघाला तर त्यांत कांहीं नवल नाहीं; पण कै. नाथमाधव यांचा आणि सरस्वतीचा असा कोणताही पिढीजात संबंध नव्हता. त्यांची ओळख नवीन होती—त्यांचा परिचय याच आयुष्यांतील होता; आणि तोही स्वतःच्या स्फूर्तीनें नव्हे तर आवश्यकतेमुळें! ज्याप्रमाणें एकादा प्रवासी वाट चालतां चालतां संध्याकाळ झाली म्हणजे जेथें निवारा मिळेल तेथें वस्ती करतो, त्याप्रमाणें शरीरास भयंकर अपघात होऊन ज्या वेळीं नाथमाधवांच्या आयुष्यावर एकाएकीं संध्याकाळचा अंधार दिसायला लागला त्या वेळीं त्यांनीं निवाऱ्यासाठीं सरस्वतीचा प्रांत धुंडाळला! नाथमाधव व सरस्वती देवी यांची गांठ ह्याप्रमाणें आकस्मिकपणें पडली—नाइलाज म्हणून पडली! पण त्याच सरस्वतीचे ते इतके प्यारे बनले कीं तिनें आपल्या मधुमधुर स्तन्यांचा अपूर्व अमृतप्रसाद ह्या आपल्या नवबालकासाठीं सहस्रधारांनीं अर्पण केला."

नाथमाधवांच्या वाङ्मयाचें परीक्षण वा समालोचन करतांना त्यांच्या वाङ्मय-सेवेची ही पार्श्वभूमि नेहमीं लक्षांत वाळगणें जरूर आहे असें आम्हांला वाटतें. त्या दृष्टीनें त्यांच्या वाङ्मयाचें समालोचन व्हावें व या वीर कादंबरीकाराच्या वाङ्मयसेवेचें योग्य तें मूल्यमापन व्हावें हीच आमची आकांक्षा आहे. आमची तेवढी योग्यता नाहीं याची पूर्ण जाणीव असल्यामुळें त्यासाठीं जी कांहीं थोडीबहुत साधनसामुग्री जमवितां येईल ती जमवून आम्हीं वाचकांपुढें ठेवीत आहोंत. वाचकांनीं ही आमची अल्पशी व तुटपुंजी सेवा गोड करून घ्यावी एवढी नम्रभावें विनंती आहे.

नाथमाधव आपली अत्यंत आवडती अशी ऐतिहासिक कादंबरीमाला गुंफण्याच्या उद्योगांत असतां न्यूमोनियानें आजारी पडून ता. २१ जून १९२८ रोजीं कालवश झाले; परंतु विपरीत परिस्थितीशीं झगडून त्यांनीं राष्ट्रोद्धाराला पोषक अशी जी वाङ्मयनिर्मिती केली तिचा विसर कोणाही मराठ्याला सहसा पडणार नाहीं.

---



डावीकडून :—श्री. मोरोपंत जोग, महाराष्ट्रभाषाचित्रमयूर श्री. कृ. ना. ऊर्फ दादा आठल्ये, हिंद एजन्सीचे मालक श्री. ना. न. केतकर व श्री. नाथमाधव.

# नाथमाधव यांच्या आठवणी

## नाथमाधवांच्या स्वभावांतील विविध पैलू

[ १ ] ( लेखकः—श्री. **ना. वि. कुळकर्णी** )

### नाथमाधव यांची जांभळी शाई

नाथमाधव लेखनाकरितां नेहमीं जांभळी शाई वापरीत असत. टांकाचें 'ओ'चें नऊ किंवा दहा नंबरचें टोंक हें बहुधा त्यांचें ठरलेलें असे. त्यांना त्याविषयीं कुतूहलानें मीं विचारलें असतां, त्यांनीं आपल्या वतीनें खुलासा केला.—

"धांवत्या हातांनीं लिहावयाला सर्व टोंकांत 'ओ'चें नऊ नंबरचें-दहा नंबरचें टोंक फार उपयुक्त आहे असें मला तरी वाटतें. जांभळी शाई ही माझी आवडती शाई आहे. ती आवडती असावयाला कारणेंही आहेत.

"जांभळी शाई लिहितां लिहितांच वाळते. तिला टिपकागदाची आवश्यकता जवळजवळ लागतच नाहीं. दुसरें, दुसऱ्या कोणत्याही शाईपेक्षां डोळ्यांना जांभळी शाई अधिक आकर्षक, मनोल्हादक असून आपण लिहीत असलेला मजकूर, शब्द-सौष्ठव, वाक्यांची मजेदार रचना व मजकुराची अर्थपूर्ण जुळणी लिहीत असतां जसजशी सुचत जाते, तसतसा त्यामुळें जसा मनाला उल्हास वाटतो, त्याखालोखाल जांभळी शाई आपण लिहितांना आपल्या मनाची प्रसन्नता वाढवीत असते.

"ज्याला पुष्कळसें व कंटाळा न येऊं देतां लिहावयाचें असतें, त्यानें असल्या क्षुल्लक वाटणाऱ्या गोष्टींकडे लक्ष पुरविणें यांत एक प्रकारचा अर्थ आहे. तुम्ही जांभळ्या शाईचा आणि नऊ-दहा नंबरच्या 'ओ' टोंकाचा आपल्या लेखनाकरितां प्रयोग करून पहा, म्हणजे तुम्हांला माझें म्हणणें पटेल. सबंध बंद जांभळ्या शाईनें तुम्ही लिहून काढा, व त्याकडे टक लावून पाहा; खात्रीनें तुमचा तुम्हांलाच आनंद होईल. पुढील पानावर मजकूर लिहिण्यास हुरूप येईल."

नाथमाधव यांच्या वरील विवेचनाचें मला कौतुक वाटलें. त्यांत तथ्यांशही आहे, असें अनुभवानें पटलें. मी लेखनाकरितां जांभळी शाई व 'ओ'चें नऊ–दहा नंबरचें टोंक वापरूं लागलों. ( आतां तें मी नेहमींच वापरतों. ) जांभळी शाई व सदर टोंक वापरतांना मला आनंद होतो, म्हणून तर मी वापरतोंच; पण नाथमाधवांची आठवण कायम करणाऱ्या या दोन वस्तु म्हणून त्या वापरतांना मला जास्तच आनंद वाटत असतो.

## नाथमाधव यांचा बोधशत–रत्नहार

नाथमाधवांची सर्वांत मोठी पुतणी गिरजाबाई इच्या लग्नाच्या वेळची ही बोधशत–रत्नहारासंबंधींची आठवण आहे. गिरजाबाईचें लग्न ठरलें, त्या वेळीं मी मुंबईस नाथमाधवांकडे उतरलों होतों. लग्नास या म्हणून त्यांनीं मला अत्याग्रहानें सांगितलें व त्याच वेळीं अहेरादाखल 'तुम्ही कविता करा' म्हणजे झालें, असें सांगितलें.

मी लग्नाला जाऊं शकलों नाहीं. परंतु त्यांच्या आज्ञेप्रमाणें उपदेशपर एकशेंएक कविता करून त्यांच्याकडे पाठविल्या. शंभर साक्या व अकरा आर्या केल्या. त्या कविता नाथमाधवांनींच रचल्या आहेत, अशा धर्तीनें मीं तयार केल्या. त्याप्रमाणें त्यांनीं आपल्या नांवावरच "बोधशत-रत्नहार" नांव देऊन त्या पुस्तकरूपानें छापल्या. त्या पुस्तकास त्यांना गुरुस्थानीं असणारे महाराष्ट्रभाषाचित्रमयूर कै. कृष्णाजी नारायण आठल्ये, यांजकडून छोटेखानी प्रस्तावना लिहविली. ( नाथमाधव कविता रचण्याच्या भानगडींत कधीं पडत नसत. ) कै. आठल्ये यांनीं त्या कवितांना सुंदर प्रस्तावना लिहिली.

गिरजाबाईंच्या लग्नानंतर नाथमाधवांनीं त्या पुस्तकाची एक प्रत व त्याबरोबर स्वदस्तुरचें एक पत्र मजकडे पाठवून दिलें. तें पत्र व तें पुस्तक मीं अजून जपून ठेवलेलें आहे. त्या पत्रांत त्यांनीं माझ्या कवितांची तर स्तुति केली होतीच; पण त्याबरोबर प्रस्तावनेंतील आठल्ये यांच्या स्तुतीकडे अंगुलिनिर्देश करून म्हटलें होतें, 'आठल्ये यांनीं तुमच्या कवितांची ही स्तुति केली आहे पाहा. पण हें स्तुतीचें श्रेय केवळ तुमच्या कवितेलाच आहे, असें समजूं नका. त्या कविता तुमच्या आहेत हें आठल्ये यांना माहीत नाहीं. त्या कविता माझ्या आहेत व माझ्या

णावलेल्या नांवानें आठल्ये यांना भारलें, म्हणून त्यांनीं जास्त स्तुति केली आहे. अप्रसिद्ध (त्या वेळीं खराच बराच अप्रसिद्धही होतों) व सुप्रसिद्ध लेखक यांच्या लिखाणाकडे पाहण्याची आठल्ये यांच्यासारख्यांची सुद्धां दृष्टि अशी असते. तर मग सामान्य जनतेसंबंधीं बोलावयालाच नको! म्हणून लक्षांत ठेवा, चांगली प्रसिद्धी मिळेपर्यंत तुमच्या चांगल्या लेखनालाही जनतेनें चांगलें म्हटलें नाहीं, तर त्याबद्दल विषाद मानूं नका. सतत कार्य करीत राहा, म्हणजे तुम्हांला दीर्घ तपश्चर्येनंतर प्रसिद्धीही मिळेल व तुमच्या चांगल्या लिखाणावर पसंतीचा छापही पडेल.' नाथमाधवांचे त्या वेळचे बोल उशीरां कां होईना, माझ्या प्रत्ययाला आले, ही गोष्ट अगदीं खरी आहे.

## ब्रह्मद्वेष्टे नाथमाधव?

नाथमाधव ब्रह्मद्वेष्टे म्हणून त्यांना त्यांच्या हयातींत पुष्कळ लोक समजत. माझ्या अनुभवानें त्यांत सत्याचा लवलेशही नव्हता. शाहुनगरवासी नाटक मंडळीनें नाथमाधव यांचें "जातिवंत मराठा वीर" या नांवाचें नाटक बसविलें होतें. त्यांत ब्राह्मण पात्र घालून त्यावर बरेच ताशेरे झाडले आहेत, म्हणून कै. गणपतराव जोशी यांनीं तें नाटक करण्याचें सोडून दिलें, असा त्या वेळीं गवगवा झाला होता.

त्यासंबंधीं मीं नाथमाधवांना एकदां मुद्दाम विचारलें. त्या वेळीं त्यांनीं मजजवळ त्याबद्दल खुलासा केला. ते मला म्हणाले, "वास्तविक तसा प्रकार मुळींच नाहीं. ब्राह्मणांची निंदानालस्ती करण्याचें मला कारण नाहीं व तशी माझी बुद्धीही नाहीं. ब्राह्मणाच्या जन्माला आलेले सर्वच ब्राह्मण जसे वाईट नसतात, तसे चांगलेही नसतात, हें तुम्हीच कबूल कराल. एकादा सच्छील, सत्प्रवृत्त, लौकिकवान्, सन्मान्य आदर्श ब्राह्मण वेठीला धरून त्यावर निंदेचे, उपहासाचे, कठोर तडाखे मारले आहेत काय? हें मला माझ्या कुठल्याही लिखाणांत दाखवून द्या. मला नेहमीं ब्राह्मणांनीं ब्राह्मणासारखें वागावें, त्यांनीं आपला धर्म, नीतिनियम पाळावेत असेंच वाटत असतें.

"नाटक कंपनींतील एक ब्राह्मण जातींतील गृहस्थ (त्यांनीं त्या गृहस्थाचें नांवही मला सांगितलें) मजकडे पाहुणा म्हणून राहावयास आला. जेवणाची वेळ झाली, तेव्हां शेजारच्या एका ब्राह्मणाच्या खाणावळींत त्याची जेवणाचीही व्यवस्था मीं केली. जेवावयास जातांना तिकडे जा, म्हणून मीं त्याला सुचविलें. तेव्हां त्यानें

खाणावळींत कशाला ? मी आपल्याच येथें निःशंक जेवतों; त्याला काय हरकत आहे ?' असें उत्तर दिलें. अर्थात् माझ्याकडेच त्याला नाइलाजानें मला जेवावयाला घालावें लागलें. पण त्याच्याबद्दल माझा आदर तर राहिला नाहींच, पण उलट मला चीड आली. ब्राह्मणांनाच आपलें ब्राह्मण्य नकोसें झालें आहे, तर त्याच्याबद्दल आम्हीं नाक मुरडलेलेंही लोकांना खपूं नये याचें मला आश्चर्य वाटतें."

असें सांगून ते पुढेंही म्हणाले, "असें असलें तरीही मीं माझ्या लेखनांत ब्राह्मण-वर्गावर शस्त्र उगारलेलें नाहीं. जीं ब्राह्मण पात्रें माझ्या लेखनांत आलीं असतील, व प्रसंगविशेषीं त्याबद्दल प्रतिकूल दिसेल असें लिहिलें असेल, त्याकडे पाहाल, तर त्यासारखीच तुम्हांला ब्राह्मण लेखकांनींही आपल्या लेखनांत माझ्याहीपेक्षां वरचढ केलेली आढळून येईल. श्री. न. चिं. केळकर यांच्या 'तोतयाच्या बंडां'तील बर्गंभट, श्री. कृ. प्र. खाडिलकर यांच्या 'भाऊबंदकीं'तील चमकशास्त्री-नमकशास्त्री, 'सत्त्वपरीक्षें'तील चित्रगुप्त, त्याची बायको, मुलगा गंपू, श्री. श्री. कृ. कोल्हटकर यांच्या 'मतिविकारां'तील हरिहरशास्त्री, श्री. हरीभाऊ आपटे यांच्या 'यशवंतराव खरे' मधील रावबहादूर-रावबहादुरीणबाई यांच्या घरचा होयबा भटजी हीं पात्रें रेखाटलेलीं आहेत. तीं ब्राह्मण लेखकांनींच रेखाटलेलीं आहेत ना ? त्यावरून त्या ब्राह्मण लेखकांना तुम्ही ब्रह्मद्वेष्टे म्हणूं शकाल काय ? ह्यांना जर म्हणणार नाहीं, तर तो आरोप मजवरच काय म्हणून ? गणपतराव जोशी यांना तसें वाटलें असतें, तर त्यांनीं माझें 'जातिवंत मराठा वीर' नाटक बसविलेंच नसतें." नाथमाधवांचें म्हणणें मला साधार वाटलें, पटलें. माझ्याशीं वागण्यांत तर मला त्यांची वृत्ति नेहमींच समजून येत असे.

## नाथमाधवांचा भिडस्तपणा नं. १

नाथमाधव मनाचे फार भिडस्त होते. त्यांचा मित्रपरिवार फार दांडगा होता. सदैव त्यांच्याकडे अनेक लोकांची रहदारी असावयाचीच. त्यांचें मुख्य जीवन लेखनावर असल्यामुळें जितका दिवसांतला जास्त वेळ वाचनलेखनाकडे देतां येईल, तेवढा देणें भागच होतें. आपल्या व्यवसायांत अडथळा येऊं नये म्हणून, "कामाशिवाय येथें कोणीं बसूं नये" अशी त्यांनीं आपल्या खोलींत ठळक अक्षरांची पाटीही लावली होती, परंतु तिचा फारसा उपयोग त्यांना होत नसे.

कित्येक लोक खोलींत पाऊल टाकतांच जेठा मारून बसण्यापूर्वी हंसत हंसत ती पाटी उलटी करून ठेवीत. नाथमाधवही हंसून म्हणत, "बसा हो. ती पाटी तुमच्याकरितां नाहींच." मंडळी असतां ते लिहिणें-वाचणें बाजूला ठेवीत. मंडळीशीं बोलण्यांतच वेळ व्यतीत करीत. येणाऱ्या मंडळींना नाखूष करणें त्यांच्या जिवावर येई. त्रास झाला, तरी भिडस्तपणानें तो स्वतःच सहन करीत. दिवसा त्यांचें वाचन-लेखन होतच नसे. मग रात्रीच्या रात्री जागून त्यांचें लेखन-वाचन चाले.

## भिडस्तपणा नं. २

कोणाला त्यांनीं एक पुस्तक लिहून दिलें. त्याचा मोबदला म्हणून त्यांच्या हातीं दीड हजारांचा एक चेक आला. त्या वेळीं मी तेथेंच होतों. दीड हजार रुपये आपल्या लेखनावर एकदम मिळाल्यामुळें त्यांना फार आनंद झाला. त्यांनीं मोठ्या अभिमानानें मला म्हटलें, "नारायणराव, तुम्हां नाटककारांना नाटक मंडळीकडून तरी एका रकमेनें अशी रक्कम मिळणें शक्य आहे कधीं? मला मिळाली कीं नाहीं, पाहा."

दुसऱ्या दिवशीं त्यांचा खिस्ती या नांवाचा फारा दिवसांचा स्नेही त्यांच्याकडे आला. त्याच्यावर त्यांचा फार विश्वास. नाथमाधवांनीं तो चेक त्याच्याजवळ बँकेंतून वटवून आणण्यास दिला. त्यानें तो आणला. पण त्याच्या तोंडाला पाणी सुटलें. त्यानें नाथमाधवांच्या जवळ त्यांतील पांचशें रुपये संध्याकाळपर्यंत हातउसने मागितले, नव्हे, ते जवळजवळ उचलूनच घेतले. नाथमाधवांना नाहीं म्हणण्याची छातीच झाली नाहीं! बरें, संध्याकाळपर्यंतचीच मागणी. त्या दिवशीं शनिवार–मुंबईची महालक्ष्मीची रेस. ते पांचशें रुपये घोड्यावर लावण्यांत येणार हें नाथमाधवांना माहीत. परत येण्याची शाश्वती काय, हें ते जाणत होते. पण भीड तोडवेना. त्या गृहस्थानें ते पांचशें रुपये नेले आणि ते घोड्यावर गमावले. रात्रीं वाईट तोंड करून तो परत आला. नाथमाधवांनीं तें ओळखलें, पण करणार काय? आपण तुमचे रुपये हरतऱ्हेनें फेडूं असें तो सांगू लागला. नाथमाधवांच्यानें त्याला उलट बोलवलें तर नाहींच, पण "जाऊं दे, माझ्या पुस्तकावर मीं एक हजारच रुपये मिळविले, १५०० मिळालेच नाहींत, असें समजतों, म्हणजे झालें. मींच रेसमध्यें पांचशें रुपये गमावले असते तर काय झालें असतें? मग तुम्हीं हरवले काय आणि मीं हरवले काय?" पहिल्याइतक्याच प्रफुल्लपणानें ते म्हणाले व त्या गृहस्थाचेंच उलट समाधान करूं लागले.

(त्या गृहस्थानें ते रुपये परत केले कीं नाहीं हें मात्र मला माहीत नाहीं.) भिडस्तपणाचें प्रायश्चित्त तुम्हांला मिळालें आहे, असें मी अनेकदां त्यांना म्हणें. ते नुसते हंसत असत.

## भिडस्तपणा नं. ३

नाथमाधवांच्याकडे एक प्रकाशक आला व प्रकाशनाकरितां त्यांच्याजवळ कादंबरी मागूं लागला. त्यांना इतर लेखनामुळें वेळ नव्हता. प्रकाशकाला होय म्हणवेना, नाहीं म्हणवेना. प्रकाशक त्यांना त्यांच्या प्रसिद्धीमुळें भरपूर मोबदला द्यावयाला तयार होता. त्या वेळीं नाथमाधवांचे एक लेखक स्नेही कै. कृ. ना. अस्नोडकर त्यांच्याकडे बसत असत. त्यांना पैशांची अत्यंत जरूरी होती. त्यांनीं नाथमाधवांना आपण तुमच्या नांवावर कादंबरी लिहितों, तुम्ही प्रकाशकाला होय म्हणा, त्याचें काम होईल, माझेंही होईल. माझ्या नांवावर तुमच्याइतका मोबदला मिळणार नाहीं; तुमच्या नांवाची प्रकाशकाला गरज आहे. लेखनाचीच आहे असें नाहीं, असें सांगितलें. नाथमाधवांनीं तें मित्राच्या भल्याकरितां कबूल केलें. प्रकाशकालाही तसें अगोदर स्पष्ट सांगितलें. मी त्या कादंबरीवरून सफाईचा हात फिरवीन असेंही सांगितलें. प्रकाशकानें तें कबूल केलें.

अस्नोडकरांनीं "नटसम्राट" ही कादंबरी नाथमाधवांच्या नांवावर लिहिली. ती प्रसिद्ध झाली. नाथमाधवांना—म्हणजे अस्नोडकरांनाच त्या कादंबरीचा भरपूर मोबदला मिळाला. प्रकाशकाचा कार्यभाग झाला. अस्नोडकरांची गरज भागली. परंतु नाथमाधवांचें नांव मात्र त्या कादंबरीनें उगाचच बद्दू केलें. अनेकांनीं नाथमाधवांना त्याबद्दल दोष दिला.

दोष देणाऱ्यांपैकींच मी एक होतों. नाथमाधवांनीं त्यावर मला सांगितलें, "झालें आहे खरें हें असें, पण काय करणार? मित्राच्या चांगल्याकरितां मला मीड मोडवली नाहीं. त्याबद्दल आतां जें कोणी काय म्हणेल तें मला निमूटपणें ऐकून घेतलेंच पाहिजे."

यावर मी किंवा आणखी दुसरा कोणी झाला तरी काय म्हणणार!

## प्रोत्साहक नाथमाधव

कै. महाराष्ट्रभाषाचित्रमयूर कृष्णाजी नारायण आठल्ये हे आपले लेखनगुरु म्हणून नाथमाधव सांगत. लेखनाचा ओनामा त्यांनीं घालून दिला. एक गोष्ट

लिहावयाला सांगितली. आपण कशीबशी ती लिहिली. ती आठल्ये यांनीं वाचून, शब्द, वाक्य, प्यारे, हेतु या सर्वांचे यथास्थित वाभाडे काढून तिचा पुरा सत्यानाश करून दाखवून, ती चुकली आहे कशी, पाहिजे होती कशी, हें निर्दयपणानें सांगितलें. पण लिहिण्यास प्रोत्साहन दिलें. आणि तोच कित्ता आपण नवीन, हौशी, होतकरू लेखकांच्या बाबतींत गिरवीत असतों, असें ते सांगत. ते आठल्ये यांना लेखनगुरु म्हणण्यांत भूषण मानीत, पण आपणांस कोणी गुरु म्हणावें असें इच्छीत नसत. त्यांच्याकडे येऊन अनेक नवथर लेखकांनीं लेखनाचे पहिले धडे गिरविले व पुढें ते लेखक चांगले नांवारूपाला आले. त्यांच्याबद्दल नाथमाधवांना फार अभिमान वाटे. त्यांच्या प्रोत्साहनाचा उपयोग (अंगीं गुण असूनही) करून घेतला नाहीं असे मुंबईचे एक श्री. धोंडो रघुनाथ तेंडुलकर या नांवाचे गृहस्थ मला माहीत आहेत.

ज्यांना त्यांच्या प्रोत्साहनाचा चांगलाच उपयोग झाला, ज्यांना नाथमाधवांनीं लेखनाचा श्रीगणेशा घालून दिला व ज्यांनीं पुढील आयुष्यांत त्याचा चांगलाच उपयोग करून दाखविला, ते म्हणजे आजचे सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. विठ्ठल वामन हडप हे होत. त्यांच्याविषयीं बोलणें निघालें, म्हणजे त्यांच्या कल्पकतेचा, हौशीचा, चिकाटीचा व लेखनाचा गौरवानें उल्लेख केल्याशिवाय नाथमाधव राहत नसत. कोणाही लेखकाला उत्तेजन देणें, त्याच्याशीं चर्चा करणें, विषयाची सर्वांगीण तयारी कशी करावी, वाचन, लेखन, मनन, निरीक्षण, प्रवास कां व कसा करावा, पुष्कळ तयारी करून थोडें लिहावें म्हणजे त्यांत भरीवपणा कसा येतो, तें लेखन लोकादरास कसें पात्र होतें, हें ते मोठ्या कळकळीनें व हौसेनें सांगत असत. मलाही त्याचा थोडाफार पण चांगलाच अनुभव आहे.

## ज्योतिषी नाथमाधव

कुंडल्या पाहणें, भविष्य सांगणें, वगैरेंचा नाथमाधवांना चांगलाच नाद होता. गरीब, अडाणी, बायका, मुलें नेहमीं त्यांच्याकडे येत. भविष्य विचारीत, तोडगे मागत. नाथमाधवही सर्वांची मनीषा त्यांची भावभक्ति, अंतःकरणाची स्थिति पाहून पुरी करीत. भविष्य विचारण्यास येणारांना ते चांगलें असेल तेवढेंच सांगत.

बायकामुलें, गोरगरीब त्यांजकडे नेहमीं येत व ते त्यांना मंत्रतंत्र वगैरे सांगत; म्हणून कित्येक मंडळी नाथमाधवांना ढोंगी म्हणून त्यांची कुचेष्टाही करीत. पण ते त्याकडे दुर्लक्ष करीत. 'होरा' ज्योतिषावर तुमचा विश्वास खरोखरच

आहे काय ? म्हणून मीं त्यांना विचारलें असतां ते म्हणाले, "माझा त्यावर विश्वास नाहीं. शास्त्र म्हणून तें कदाचित् खरेंही असेल; पण माझा तसा त्या शास्त्राचा दांडगा अभ्यासही नाहीं. मला त्याचा नाद आहे. त्याचे ठोकताळे कांहीं ठरलेले असतात व त्यावर अनुमानानें आंवतीभंवतीची परिस्थिति जाणून घेऊन व्यवहार्यबुद्धीनें त्यासंबंधानें कांहीं विधानें केल्यास त्याचा पडताळाही पटण्यास फारसा प्रत्यवाय नसतो. शिवाय मजकडे विचारण्यास येणारी मंडळी अन्य कारणानें मजवर विशेष भक्तीनें–मी कोणी तरी एक भला माणूस आहें अशा भावनेनें येतात; मीं त्यांच्याबद्दल बरें होईल असें सांगितलें म्हणजे त्यावर त्यांचा विश्वासही बसतो; म्हणून मी चांगलें होईल – होणार आहे, असेंच शक्य तों सांगत असतों. भविष्य थोडेंच, पण सद्बुद्धीनें एकाद्याचें चांगलें व्हावें म्हणून अंतःकरणपूर्वक सांगितल्यास त्याला अदृश्य ईश्वरी शक्तीचा पाठिंबा–वाचासिद्धि म्हणून मिळावयाला हरकत काय ? अशी माझी समजूत आहे. सद्भावनायुक्त कोणाचेंही चांगलें व्हावें, असें चिंतीत गेल्यास, म्हणत गेल्यास, सांगत गेल्यास, त्याचा प्रभाव अल्पांशानें दिसल्याशिवाय राहात नाहीं, असा पुष्कळ वेळां मला अनुभव आहे. भक्तिभावानें विचारणारास भक्तिभावानेंच पण दूरदर्शीपणाचा पोंच ठेवून सांगण्यानें चांगलें झालें नाहीं, तरी वाईटही कांहीं होत नाहीं; मग तसें सांगावयास कोणती हरकत नाहीं. भविष्य ठाम म्हणून कोणीं सांगूंही नये, व सांगितल्यास सर्वस्वी त्यावर अवलंबूनही राहूं नये."

भविष्यकथनाविषयीं चर्चा निघाली असतां माझ्यासारख्यानें आपली कुंडली त्यांच्यापुढें टाकली असतां ते म्हणत, "अहो, कुंडली कसली विचारतां ? तुमची कुंडली तुमच्या हातांत आहे. नशिबाच्या रेषेपेक्षां हातावर, कर्तबगारीवर, मनगटाच्या शक्तीवर विश्वास ठेवा; कार्याला लागा; म्हणजे ज्योतिष्यांनीं तयार केलेल्या कुंडल्या तुम्ही स्वपराक्रमानें ल्टक्या करून टाकाल. ज्योतिष पाहणें हें निरुद्योग्यांचें, आळशांचें, कामचुकारांचें काम आहे."

यावरून नाथमाधवांचीं होराज्योतिषाबद्दलचीं मतें कळण्यासारखीं आहेत. तरी पण त्यांना नाद होता. अज्ञानी मंडळीच्या समाधानासाठीं ते ज्योतिष पाहात व चांगलें तेवढें धीर व उत्साह देण्याच्या बुद्धीनें सांगत असत.

# नाथमाधव व स्वप्नसृष्टि

पुण्यास एक दिवस नाथमाधवांकडून मला दहा रुपयांची मनीऑर्डर व त्याबरोबरच एक पत्र अचानक आलें. पत्रांत त्यांनीं लिहिलें होतें, "मला परवां एक स्वप्न पडलें, त्यांत दिसलें कीं, तुम्ही पैशांच्या अत्यंत अडचणींत असून अगतिक झालां आहांत. तुमच्या मनाच्या वेदना मला कळल्या. तुमचें बऱ्याच दिवसांत पत्रही नाहीं. मी जागा झालों, बेचैन झालों, म्हणून मीं तुम्हांस दहा रुपये आज पाठविले आहेत. तुमच्याकडील खरी वस्तुस्थिति कळवाल तर मला त्याचा माझ्या अभ्यासाच्या दृष्टीनें फार उपयोग होईल. स्वप्नांत तुमची अडचण मला कळली. तुम्हीं मजकडे स्वप्नांत पैशांची मागणी केली. यापैकीं खरें काय आहे?"

वस्तुस्थिति त्या पत्रांतल्याप्रमाणें खरीच खरी होती. मी आजारी होतों. पैशांची टंचाई होती. नाथमाधवांच्याकडे एका नाटकवाल्याकडून मजकरितां कांहीं पैसे जमा झालेले होते. त्यांच्याकडे मागणी करावी काय, अशा विचारांत होतों; पण मागणी केलीं नव्हती. माझ्या अडचणींचा दादपत्ता मीं त्यांस मुळींच कळविला नव्हता. तेव्हां त्यांच्या स्वप्नांत हें खरें 'सत्य' कसें आलें, याबद्दल अचंबाही वाटला. मीं पत्रानें त्यांना वस्तुस्थिति कळविलीच, पण त्यानंतर मुंबईस त्यांच्याकडे गेलों असतां त्यांना स्वप्नाची आठवण दिली व त्याचा तुम्हांला जास्त काय उपयोग झाला, म्हणून चौकशी केली. तेव्हां त्यांनीं मला सांगितलें—

"स्वप्नसृष्टि हा काय चमत्कार आहे? स्वप्नें कां पडतात? कशीं पडतात? सत्यसृष्टि व स्वप्नसृष्टि यांच्यांत कांहीं निकटचा संबंध असेल काय? अपचनानें, अजीर्णानें, अति त्रासानें, अति शोकानें, अति आनंदानें स्वप्नें पडतात म्हणतात, 'मनीं वसे, तें स्वप्नीं दिसे' असेंही म्हणतात. त्यांत कांहीं तथ्यांश आहे, कीं त्याखेरीज स्वप्नसृष्टीला स्वतंत्र अस्तित्व–अर्थ आहे? त्याचा प्रभाव कांहीं आहे कीं काय? स्वप्नांची संगति कांहीं लागेल काय? स्वप्नसृष्टीला आपल्या सत्यसृष्टीप्रमाणें एकसूत्रता, बंधनें, कांहीं असेल काय? असल्यास कां, कशीं, हें पाहण्याचा मला अलीकडे नाद लागला आहे. मला जीं अनेक वेळां, अनेक प्रकारचीं सुष्टदुष्ट स्वप्नें पडतात, कधीं न ऐकलेलीं, न पाहिलेलीं स्थळें, व्यक्ति, प्रसंग, परिस्थिति, घटना, विघटना दिसतात, त्यांत सूचकत्व कांहीं खरोखर असतें काय, हें पाहण्याकरितां गेले कित्येक दिवस मीं माझीं स्वप्नें टिपून ठेवण्याचा क्रम ठेविला आहे. अशीं

स्वप्नें जवळजवळ दोनअडीच हजार मीं आतांपर्यंत टिपून ठेवलीं आहेत. स्वप्नें टिपून ठेवतांना, मला झोंप केव्हां लागली, झोंपतांना कोणत्या दिशेला डोकें होतें, हात, पाय, यांची पोझिशन काय होती, पालथा, उताणा कुशीवर होतों कीं काय, स्वप्नांतून जागा झालों त्या वेळीं कोणत्या परिस्थितींत होतों, किती वेळ झोंपेंत होतों, स्वप्नसृष्टींत किती काळ वावरत होतों, या सर्वांसह पडलेलें स्वप्न टिपावयाचें, असा क्रम मीं ठेविला आहे. (अशीं अनेक स्वप्नें टिपलेले कागद त्यांनीं मला दाखविले) त्याच स्वप्नांच्या सांखळींत तुमच्याविषयीं पडलेलें स्वप्न गोंवलें गेलें आहे. असें एकाद-दुसरें स्वप्न सत्यसृष्टीशीं संगनमत करतें, असें मला दिसून आलें; परंतु त्यापेक्षां स्वप्नसृष्टीचा सत्यसृष्टीशीं विशेषसा ताळमेळ बसत नाहीं. संगति लागत नाहीं. सूचकपणा पटत नाहीं. असेंच मला इतक्या दिवसांच्या अनुभवानें वाटूं लागलें आहे. असा संगतीचा चमत्कारपूर्ण दुवा मला जर अनेक पुराव्यांनिशीं मिळता, तर त्यावर मला एकाद्या जंगी सुंदर कादंबरी-मंदिराची उभारणी करतां आली असती. त्यासाठीं हा उद्योग करून पाहिला; पण तसें हातीं कांहींच लागलें नाहीं."

त्यानंतर नाथमाधवांनीं स्वप्नांच्या चिंध्या चांचपणें सोडून दिलें.

## नाथमाधवांची विनोदबुद्धि

नाथमाधवांच्या नेहमींच्या बोलण्यांत अनेकदां सुंदर विनोद असे. परंतु त्या मानानें त्यांच्या लेखनांत मात्र विनोद बराच कमी असे. श्री. कृ. कोल्हटकर, अच्युतराव कोल्हटकर, वगैरेंचा विनोद त्यांना जसा आवडे, त्याप्रमाणेंच तात्यासाहेब केळकर यांच्या विनोदाविषयींही त्यांना अत्यंत आनंद होई. वरेरकरांच्या 'हाच मुलाचा बाप' मधील विनोदाची जात नाथमाधवांना जास्त आवडे व त्याचा ते वारंवार उल्लेख करीत. प्रसंगनिष्ठ विनोद ते श्रेष्ठ प्रतीचा समजत. केवळ शाब्दिक कोट्यांचा विनोद कनिष्ठ प्रतीचा मानीत. आपल्याला जसें कवितेचें अंग नाहीं, तसाच प्रकार विनोदनिर्मितीच्या बाबतींतही आपला आहे, असें ते स्पष्ट सांगत.

नित्याच्या व्यवहारांत ते विनोदाचा भरपूर उपयोग करीत असत. विनोद आणि थट्टा यांत ते फरक करीत असत. थट्टेनें दुसऱ्याचें अंतःकरण दुखावलें जातें. विनोदानें अंतःकरणाला आनंदाच्या गुदगुल्या पडतात ('गुदगुल्या पडतात' हा नाथमाधवांचाच आवडता वाक्यप्रयोग असे) असें ते म्हणतात. आणि असाच विनोद करण्याकडे त्यांची प्रवृत्ति असे.

त्याचें एक लहानसें उदाहरण माझ्या आठवणींत आहे. तें असें कीं, एकदां माझे वडील बंधु श्री. गोविंदराव ऊर्फ बापू नाथमाधवांकडे मुंबईस गेले. त्या वेळीं नाथमाधव घरीं नव्हते. त्यांची पुतणी गिरजा विचारपूस करण्यासाठीं पुढें आली. नाथ कुठें आहेत, या त्यांच्या प्रश्नाला तिनें 'बाहेर गेले आहेत, तास–दीडतासानें परत येतील' म्हणून उत्तर दिलें. नंतर माझे बंधु बाहेर गेले. नाथमाधव घरीं आल्यावर तिनें त्यांना "नारायणराव कुळकर्णी आले आहेत. येऊन बाहेर गेले आहेत. पण काकाजी, नारायणराव आजारांतून उठले आहेत असें मला वाटलें. ते खूपच खराब झालेले आहेत, आणि त्यांच्या मेंदूवरही परिणाम झाला आहे वाटतं आजाराचा; त्यांनीं मला कांहीं ओळखलें नाहीं."–इत्यादि सांगितलें.

नाथमाधवांना तें ऐकून थोडें चमत्कारिक झालें; ते विचारांत व मजविषयींच्या काळजींतच स्वस्थ राहिले. मी इतका आजारी झालों असतां त्यांना कसें कळविलें नाहीं, याचाच त्यांना अचंबा वाटला! दीड–दोन तासांनीं बापू परत आले. नाथ त्यांना भेटले. पाहतात तों माझ्याऐवजीं माझे बंधु. मी शरीरानें स्थूल, बापू कृश. मी गिरजाबाईस ओळखतों, बापूंची व तिची ओळख नाहीं. बाकी आम्हां दोघां बंधूंत साम्य बरेंच. बापूंना पाहतांच नाथांना सारा उलगडा झाला. त्यांची काळजी दूर झाली. त्यांना हसूं आलें. त्यांनीं बापूंना विचारलें, "नारायणराव आले आहेत ना?" अर्थात् त्यांना नाहीं असेंच उत्तर मिळालें. बापूंनीं कारण विचारतां, 'गिरजाबाईनें तुम्हांलाच नारायणराव समजून तुमचें वर्णन मजजवळ केलें' वगैरे खुलासा केला. गिरजाबाईला हांक मारली व तिला म्हणाले, "हेच ना ग नारायणराव! आजारांतून उठलेले–तुला न ओळखणारे–मेंदू बिघडलेले नारायणराव ते हेच ना?" असें म्हणून ते हसूं लागले. तिला त्यांनीं हंसतच म्हटलें, "हे नारायणराव नव्हेत, त्यांचे बंधु हे–त्यांची प्रकृतीच अशी; नारायणराव खराब झालेले नाहींत, त्यांचा मेंदु बिघडला नाहीं—"

गिरजाबाई काकाजींचीं पुढील वाक्यें ऐकावयाला थांबलीच नाहीं. हंसत हंसत तेथून पळालीच. नाथमाधव हंसले. बापू हंसले. नाथमाधवांनीं बापूंना म्हटलें, "नारायणरावांना सांगा, असे प्रसंग पाहून, निरीक्षण करून, लक्षांत ठेवून, आपल्या नाटकांतून आणीत जा. असेच खरेखुरे प्रसंग विनोदनिर्मितींत जिवंतपणा आणीत असतात."

नाथमाधव निर्भेळ, निर्मळ विनोदाचे फार भोक्ते होते.

## लेखकाला संधि देण्याचा थोर गुण

अनेक लेखकांत जो गुण दिसत नाहीं, असा गुण नाथमाधवांत वास करीत असे. बहुतेक स्वतः पुढें सरकण्याकरितां वेळीं दुसऱ्या लेखकाला भल्या-बुऱ्या रीतीनें बाजूला रेटून आपण पुढें व्हावयाचें, ही प्रवृत्ति सामान्यतः दिसून येते. नाथमाधव त्याला अपवाद होते, असें माझ्या अनुभवाला आलें.

"लोकमान्य नाटक मंडळी"कडे माझ्या "माईसाहेब" नाटकाचे दोन अंक लिहिले जाऊन ते बसतही आले होते. पण तिसरा अंक लिहावयाचा होता. मला अतिशय त्रास झाला होता व तिसरा अंक चार सहा महिने तरी लिहून होईल, असें मला वाटत नव्हतें. त्याच वेळीं नाथमाधवांचें 'लोकसंग्रह' नांवाचें ऐतिहासिक नाटक "लोकमान्य नाटक मंडळी"कडे बसण्याचें घाटत होतें. नानबा गोखले त्यासाठीं नाथमाधवांकडे येऊनही गेले होते. मी तिसरा अंक लिहिला नाहीं, तर मग माझें माईसाहेब नाटक कायमचेंच मागें पडणार हें सत्य होतें व असें झालें तर कोणाही लेखकाला बरेंच वाटलें असतें.

नाथमाधवांनीं तसें केलें नाहीं. मला तांतडीनें बोलावून घेतलें. तीन दिवसांत तुमचा तिसरा अंक माझ्या टेबलावर बसून तुम्हीं लिहिलाच पाहिजे, ही वेळ घालवाल, तर तुम्ही आपल्या हातची संधि घालवाल. माझें लोकसंग्रह नाटक कंपनीकडे बसावयाचें आहे. तुमचें नाटक रंगभूमीवर आल्याशिवाय मी नानबांना माझें लोकसंग्रह नाटक देणार नाहीं, असें म्हणून, मला प्रोत्साहन देऊन माझ्या-कडून तिसरा अंक त्यांनीं खरोखरच लिहविला व लगेच स्वतःच्या खर्चानें 'लोक-मान्य कंपनी' कडे पाठविला. माझी संधि मला नाथमाधव यांनीं मिळवून दिली. पण त्यांची संधि मात्र त्यांनीं कायमची गमाविली !

त्यानंतर नाथमाधवांचें नाटक लोकमान्य मंडळीकडे बसलेंच नाहीं. तसा योग आला नाहीं, हें खरें; पण त्याबद्दल नाथमाधवांना मुळींच वाईट वाटलें नाहीं. आपण एका लेखकाला योग्य ती संधि दिली याचेंच त्यांना समाधान वाटे.

## नाथमाधवांचा 'संन्याशाचा संसार'

ललितकलादर्श मंडळीचें 'संन्याशाचा संसार' नाटक लागलें होतें. मला जाण्याची इच्छा होती. नाथमाधवांच्या आणि माझ्या गप्पागोष्टी रंगांत आल्या होत्या तरी

माझी नाटकाला जाण्याची एकसारखी चुळबूळ चाललीच होती. नाथमाधवांनीं मला विचारलें, "इतकी तुमची चुळबूळ कसली चालू आहे ?" मीं खरी गोष्ट त्यांना सांगितली. "संन्याशाचा संसार मला पहावयाचा आहे."

त्यावर ते मला हंसून म्हणाले, "अहो, त्या कृत्रिम नाटकांत तुम्हांला काय वाटतें ? माझा स्वतःचा संसार म्हणजे संन्याशाचा संसारच नाहीं काय ? तो तुम्ही नेहमींच पाहतां आहांत ना ? या माझ्या खऱ्याखुऱ्या संन्याशाच्या संसारापेक्षां तुम्हांला त्या लटक्या संन्याशाच्या संसारांत अधिक स्वारस्य तें काय वाटतें ? जगांत तसलीं संन्याशाच्या संसारावरचीं नाटकें जवळजवळ कल्पनागम्यच असतात. माझ्या संन्याशाच्या संसारानें तुमच्या हृदयाला चटका लागत नाहीं, तो तें कृत्रिम नाटक काय चटका लावणार ! अशीं खरोखरीचीं नाटकें पाहा, त्यांत रममाण व्हा, त्याचीं शब्दचित्रें चित्रित करा, म्हणजे पुष्कळ झालें."

मी त्या दिवशीं ललितकलेच्या नाटकाला जाऊं शकलों नाहीं. निमूट बसलों !

---

# लेखनविषयाशीं तादात्म्य

—"ग्रंथकारानें किंवा लेखकानें आपल्या कार्यास लागणारी सामग्री मिळविण्यासाठीं कांहीं स्वतंत्र प्रयत्न केला आहे असें सांप्रतच्या प्रसिद्ध झालेल्या पद्य आणि गद्य ग्रंथांवरुन दिसत नाहीं. याशिवाय दुसरें महत्त्वाचें कारण म्हटलें म्हणजे ग्रंथकाराचें किंवा लेखकाचें आपल्या विषयाशीं पाहिजे तसें तादात्म्य झालेलें नसतें. लेखकानें विषयाचें सूक्ष्मावलोकन केलें असेल व त्या विषयाशीं त्याचें तादात्म्य झालें असेल तर त्याचा ग्रंथ केव्हांही कमी दर्जाचा निपजणें शक्य नाहीं, हा माझा स्वतःचा अनुभव आहे."

१९२० —नाथमाधव

---

# यशस्वी कादंबरीकार

[ २ ] ( लेखक :— प्रो. **नारायण केशव बेहरे**, एम्. ए., बी. एस्सी. )

नाथमाधवांचा व माझा निकट परिचय होता व तो शेवटपर्यंत टिकला. नाथमाधवांचें मूळ नांव द्वारकानाथ माधव पितळे असें होतें. परंतु त्या खऱ्या नांवाशीं आपला कधींच संबंध आला नाहीं. नाथमाधव याच नांवानें आपण सर्व त्यांना ओळखतों. त्यांच्या आयुष्याकडे पाहिलें असतां मोठा चमत्कार वाटतो. त्यांचें आयुष्य चमत्कृतिजनक आहे. अत्यंत पंगु स्थितींत ग्रंथवाचनाची पूर्वी आवड नसतांही त्यांनीं वाङ्मयक्षेत्रांत विलक्षण क्रांति करून दाखविली.

१९०६ पासून तों १९१० पर्यंतचा काळ हा त्यांच्या वाङ्मयतपश्चर्येचा काळ होय. या काळांत त्यांचें लिखाण प्रसिद्ध झालें खरें, परंतु तें विद्यार्थ्याचें लिखाण होतें. त्यानंतर मात्र त्यांच्याकडून प्रभावशाली लिखाण बाहेर पडलें. अनेक कादंबऱ्या, नाटकें, स्फुट गोष्टी लिहून वाङ्मयाच्या अनेक दालनांतून ते खेळले व त्यांनीं उत्कृष्ट प्रकारची वाङ्मयसेवा केली असली, तरी कादंबरीक्षेत्रांतील त्यांची कामगिरी अवर्णनीय अशीच आहे. लहानपणापासून वाङ्मयसेवा हेंच ध्येय पुढें ठेवून वाङ्मयक्षेत्रांत यापेक्षां जास्त कामगिरी कोणीं गाजवून दाखविली असेल, असें मला वाटत नाहीं.

## विद्वानांची दृष्टि

मराठी भाषेंत आजपर्यंत कै. हरीभाऊ आपटे यांच्यानंतर यशस्वी कादंबरीकार म्हणून जर कोणाचा नंबर लागत असेल तर तो म्हणजे नाथमाधव यांचाच होय. हें स्थान माझ्या मतें दुसऱ्या कोणासही देतां येणार नाहीं. परंतु खेदाची गोष्ट म्हणजे त्यांच्या या वाङ्मयसेवेचा गौरव विद्वानांकडून झाला नाहीं, असें माझें म्हणणें आहे. समाजाकडून त्यांचा गौरव झाला नाहीं असें म्हणण्यास मात्र मी तयार नाहीं. विद्वानांनीं मात्र त्यांचा योग्य परामर्ष घेतला नाहीं. त्यांचें लिखाण, त्यांच्या कादंबऱ्या, लोक अत्यंत आवडीनें वाचीत असत. 'हिंद एजन्सी'मार्फत त्यांचें लिखाण प्रथम प्रसिद्ध होऊं लागलें व त्या लिखाणाचा समाजानें चांगला

सत्कार केला. 'हिंद एजन्सी'मुळेंच त्यांचा व माझा प्रथम परिचय झाला. त्यांचें 'सांवळ्या तांडेल' व माझें 'सीतावनवास' हीं पुस्तकें 'हिंद एजन्सी'मार्फत प्रारंभीं प्रसिद्ध झालीं.

विद्वानांच्या दृष्टीनें नाथमाधवांच्या लिखाणांत दोष होता; आणि तो हाच कीं, त्यांची भाषा साधी, सरळ व रसाळ होती. त्यांच्या भाषेंत विद्वत्ताप्रचुर जाड्या शब्दांची किंवा कोट्यांची रेलचेल नसे. विद्वानांना नाथमाधवांचा हा कमीपणा वाटत असे. मराठी भाषा ही खास आपल्या घरची. ती साधी, सोपी व सरळ लिहिणें हें विद्वानांच्या मतें कमीपणाचें लक्षण !

कै. हरीभाऊ आपटे यांची भाषाही साधी, सोपी व रसाळ आहे. कोणीं कोटीबाज लेखकांचा कितीही गौरव केला किंवा गाजावाजा केला तरी ज्याची भाषा साधी व सरळ, तोच खरा लेखक होय. भाषा ही कांहीं विद्वान लोकांची मिरास नाहीं. ती सर्वांची जननी आहे. समाजाच्या सर्व थरांपर्यंत आपले विचार जाऊन पोहोंचावे हीच लेखकाची मनीषा असते व यासाठीं साध्या, सोप्या व सरळ भाषेचें सहाय्य घेणें जरूर आहे.

## संस्कृतीबद्दल अभिमान

नाथमाधवांच्या लिखाणांतून आपल्या संस्कृतीबद्दल अभिमान व आदरभाव जागोजाग दिसून येतो. आपल्या समाजाचें पाऊल पुढें पडावें, लोकांत संस्कृति, इतिहास याबद्दल स्वाभिमानाची जागृति व्हावी, या दृष्टीनेंच त्यांनीं स्वराज्यविषयक कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यांच्या सामाजिक कादंबऱ्यांतूनही तीच भावना दिसून येते. त्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांवरून शिवकालीन समाजस्थितीची आपणांस बरोबर जाणीव होते. त्या काळांत महाराष्ट्रीय लोक कसे स्वाभिमानी व कर्तबगार होते, कोणत्या गुणांमुळें शिवाजीमहाराजांस मराठ्यांचें राज्य स्थापन करतां आलें व पुढें मराठ्यांना तें हिंदुस्थानभर पसरवितां आलें, याचें फारच सुंदर वर्णन त्यांच्या कादंबऱ्यांतून वाचावयास मिळतें. पूर्वजांचा उज्ज्वल इतिहास, त्यांच्या उज्ज्वल भावना व धर्माभिमान वगैरे गुणांचें दर्शन त्यांच्या कादंबऱ्यांतून झालें व त्यामुळें जनतेवर त्यांच्या लिखाणाचा फारच पगडा बसला.

# तरुणांचा आदर्श

नाथमाधवांची स्थिति सर्व परीनें प्रतिकूल होती. अशा प्रतिकूल परिस्थितींत त्यांनीं केवढें तरी कर्तृत्व गाजवून दाखविलें ! अनुकूल परिस्थिति असती, तर त्यांनीं केवढा पराक्रम गाजवून दाखविला असता ? त्यांचें चरित्र आदर्श म्हणून प्रत्येकानें –विशेषतः तरुण विद्यार्थ्यांनीं–दृष्टीसमोर ठेवण्यासारखें आहे. हा असा एक पुरुष होऊन गेला, कीं ज्याला पराक्रमी शिपाई व्हावयाचें होतें; खेळाडू म्हणून पुढें यावयाचें होतें, वीर म्हणून जगापुढें यावयाचें होतें; परंतु दैवाचा फांसा उलटा पडला आणि ज्याच्याशीं संबंध नाहीं अशा वाङ्मयक्षेत्रांत त्यानें प्रभुत्व मिळवून दाखविलें.

काळाच्या प्रभावीपणावर माझा फार विश्वास आहे. एकाद्या कंपूनें मोठेपणाचा डांगोरा पिटला नाहीं, तर गुणवानाला पुढें येण्यास वाव मिळणार नाहीं, अशी भीति मला कधीं वाटली नाहीं. भवभूतीच्या काळांत त्याचा अपमान झाला त्या वेळीं त्यानें काढलेले स्वाभिमानाचे उद्गार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत.

"काळ अनंत आहे, व पृथ्वी विशाल आहे. माझ्या अंगीं जर कांहीं गुण असतील तर भवभूतीचें नांव पुढें आल्याशिवाय व त्याचा जयजयकार झाल्याशिवाय राहणार नाहीं."

कोणीं कितीही पाय मागें ओढण्याचे प्रयत्न केले तरी गुण झांकून ठेवतां येत नाहींत.

म्हातारीनें कोंबडा झांकून ठेविला, तरी सूर्योदय झाल्याशिवाय राहात नाहीं.

नाथमाधवांच्या कादंबऱ्यांतून आपली संस्कृति, आपला धर्म व आपला इतिहास याबद्दलच्या उज्वल भावना दिसून येतात व या भावना प्रत्येक पानापानांतून आढळतात. त्यांचें लिखाण तेजस्वी व ओजस्वी आहे. तें लिखाण सहजसुंदर, साधें व सुलभ असून प्रत्येकाच्या हृदयाचा ठाव घेणारें आहे.

---

# कादंबरीरूप इतिहासाचें महत्त्व

[ ३ ] ( लेखकः—रा. सा. **गो. स. सरदेसाई,** बी. ए., रियासतकार )

माझे मित्र नाथमाधव ता. २१ जून १९२८ रोजीं मुंबई येथें दिवंगत झाले. त्यांच्या मित्रांच्या आठवणी प्रसिद्ध करण्याचें सत्कार्य श्री. पु. बा. कुळकर्णी यांनीं योजिलें असून त्यासंबंधानें त्यांनीं मला पत्रद्वारें विनंति केली. त्यावरून पूर्वी जो लेख रा. वीरकर यांच्या मागणीवरून मीं पाठविला होता व जो त्यांनीं चार आणे माला पुस्तक ४३ वें यांत प्रसिद्ध केला, तो पुनः वाचून पाहतां त्यांत जास्त भर घालण्यासारखें कांहीं दिसत नाहीं. तो लेख आतां पुष्कळांच्या स्मरणांतून गेलाही आहे. सबब तसाच तो पुनः मी प्रसिद्ध करूं इच्छितों. त्या लेखांतील माझे विचार अद्यापि कायम आहेत. शेवटीं मात्र मी एकदोन सूचना नवीन करीत आहें, त्यांजकडे वाचकांचें लक्ष जाईल अशी आशा आहे.

## स्वराष्ट्राचा कादंबरीरूप इतिहास

श्रीयुत नाथमाधवांच्या मृत्यूनें मराठी वाङ्मयाची फार मोठी हानि झाली आहे. ही हानि एका विशिष्ट प्रकाराची होय. स्वराष्ट्राचा इतिहास कादंबरीच्या रूपानें समाजांत फैलावणें ही बहुमोल कामगिरी त्यांनीं स्वीकारून जवळजवळ अर्धी मजल गांठली, तोंच ते कालवश झाल्यानें इतिहासाचीच ती हानि होय. इतिहासाच्या अंगभूत अनेक कार्यें आपल्यासारख्या हीन स्थितीच्या राष्ट्रास करावयाचीं असतात. संशोधन, संग्रहण, प्रकाशन, संकलन हीं चार आद्य कार्यें सिद्ध झाल्यानंतर ऐतिहासिक ज्ञानाचा प्रसार आकर्षक रीतीनें सर्व साक्षर समाजास पोंचविणें हें काम फलप्राप्तीच्या दृष्टीनें विशेष महत्त्वाचें म्हटलें पाहिजे. तें अत्यंत व्यवस्थेनें व एकनिष्ठ अंतःकरणानें आज दोन तपें नाथमाधवांनीं चालविलें होतें.

नाथमाधवांचा व माझा परिचय बहुत दिवसांपूर्वी आकस्मिक रीतीनें झाला. शिकारींतील अपघातानें ते आजारी असतांच माझे एक बडोद्याचे स्नेही आयुर्वेद जाणणारे त्यांस औषध देत होते. शरीरास पंगुत्व आल्यामुळें आतां आपणांस लेखनव्यवसायावांचून दुसरा उद्योग नाहीं, असें समजून ऐतिहासिक कादंबऱ्या

लिहिण्याचा उद्देश त्यांनीं त्या समान मित्रामार्फत मला कळविला. त्या वेळीं 'सांवळ्या तांडेल' हें त्यांचें पुस्तक नुकतेंच बाहेर आलें होतें, तें त्यांनीं मला वाचण्यास पाठविलें आणि ऐतिहासिक कादंबरीचें काम आपल्या हातून कसें काय होईल व त्यांत मी त्यांना साह्य करूं शकेन कीं नाहीं अशी पृच्छा त्यांनीं केली. मला पक्कें आठवतें कीं, या वेळीं बडोद्यास माझ्या मातुश्री कोंकणांतून मजकडे आल्या होत्या. त्यांस कांहीं करमणूक करावी अशा उद्देशानें तें 'सांवळ्या तांडेल' पुस्तक मीं त्यांस सवडीप्रमाणें दररोज थोडथोडें वाचून दाखविलें. त्यावरून घरांत आम्हां सर्वांस तें पुस्तक फारच आवडलें आणि अशाच धर्तीवर चित्ताकर्षक गोष्टी लिहितां येतील असे किती तरी सुंदर प्रसंग मराठ्यांच्या इतिहासांत असल्याचें मीं नाथमाधवांस कळविलें.

आरंभाचा हा पत्रव्यवहार त्या वैद्यमित्राच्या मार्फत चालविल्यावर मुंबईस माझें येणें होईल तेव्हां समक्ष गांठ घेण्याचा विचार ठरला आणि तदनुसार पुढें लवकरच त्यांची माझी भेट होऊन मराठ्यांच्या इतिहासावर काय सामुग्री उपलब्ध आहे, त्यांत विशेष घडामोडींचे, उदात्त व राष्ट्रीय दृष्ट्या उपयोगाचे कोणते प्रसंग आहेत, कालस्थलांच्या योग्य मांडणीनें तत्कालीन परिस्थिति वाचकांच्या मनावर कशी ठसवितां येईल, वगैरे अनेक मुद्यांवर त्यांनीं व मीं एकत्र बसून पुष्कळच चर्चा केली. माझीं पुस्तकें तर ते मुख्य आधार म्हणूनच वापरीत; आणि जरूरीच्या प्रसंगीं पत्रानें मला खुलासे विचारीत. आरंभींआरंभीं असा पत्रव्यवहार व विचारविनिमय वारंवार चाले; आणि केव्हांही मी मुंबईस आलों असतां त्यांची एकवार तरी गांठ घेतल्याशिवाय जाऊं नये असा उभयपक्षीं संकेत होता, तो मीं बहुतेक पाळला. अलीकडे चारपांच वर्षांत माझ्या कामाचा व्याप वाढल्यानें त्यांना स्वस्थपणें भेटण्यास मला फुरसत होत नसे; जरूरीच्या प्रसंगीं पत्र लिहून कळवा, म्हणजे मी अवश्य भेटेन असें माझें त्यांना कायमचें सांगणें होतें. पंगुत्वामुळें त्यांनीं माझ्या भेटीस येणें शक्य नसल्यामुळें मुद्दाम मला भेटीस बोलावण्याचा ते अलीकडे बराच संकोच करीत, असें मला आढळून आलें. त्यांची माझी शेवटची भेट १९२८ सालीं मे महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत मी मुंबईस गेलों असतां झाली; त्या प्रसंगीं राजवाड्यांच्या आठव्या खंडांतील पत्र ले. ६१ मध्यें रायभानजी काकाचा उल्लेख असून, त्या पत्रांतील अनुसंधान वादग्रस्त आहे, त्याची आम्हीं चर्चा केली. तो प्रसंग शाहूच्या आगमनाचा असून रायभानजी, रामचंद्र नीलकंठ, परशुरामपंत प्रतिनिधि वगैरे पुरुषांचे उद्योग राष्ट्रापुढें विशेष कुशलतेनें मांडतां येण्याजोगे आहेत.

# ऐतिहासिक चर्चेच्या बैठकी

नाथमाधवांच्या व माझ्या या भेटी म्हणजे केवळ ऐतिहासिक चर्चेच्या बैठकी होत्या. त्यांत इतर विषयांना बिलकूल जागा नव्हती आणि इतर विषय चर्चेत येऊं शकतील इतकी त्यांची माझी घरगुती घसणही नव्हती. मात्र बोलतांबोलतां दोनदोन चारचार तास केव्हां निघून जात तें समजत नसे. मुख्य इतिहासाची हानि न करितां त्या त्या वेळचें विशिष्ट वातावरण व व्यक्तींचे स्वभाव हुबेहुब वठविणें हेंच काम कादंबरींत बिकट असे. नाथमाधवांच्या कादंबऱ्या म्हणजे मुख्य इतिहासाचेंच विस्तृत व चटकदार विवरण होय, हें आतां सर्वांस कळून चुकलेंच आहे. मात्र ही विशिष्ट विचारसरणी त्यांच्या माझ्या चर्चेतून निष्पन्न झाली असें मी समजतों. अश्लीलतेचा मागमूससुद्धां त्यांच्या कृतींत सांपडावयाचा नाहीं. कोणत्याही जातीचा अगर धर्माचा दुराग्रह त्यांच्या लेखनांत नाहीं. त्यांचें डोकें सदैव नवीन नवीन प्रसंग कल्पिण्यांत गढून गेलेलें असे. प्रथम ते आपल्या गोष्टीचा रेखापट थोडक्यांत कागदावर मांडीत. त्यांतलीं पात्रें व प्रसंग यांचें टांचण करीत, आणि केव्हां केव्हां ती त्यांची आंखणी व मांडणी मला समजावून देऊन त्यांत कमीजास्त काय तें मला विचारीत. दऱ्याखोऱ्यांतून हिंडण्याचा त्यांना आरंभीं पुष्कळ नाद असल्यामुळें, नकाशांच्या व वर्णनांच्या साह्यानें ते एकादें स्थळ इतकें हुबेहुब रंगवून देत कीं, प्रत्यक्ष पाहणारांना त्याबद्दल अचंबा वाटे. प्रसंगाची किंवा व्यवहाराची पुनरुक्ति सहसा त्यांच्या ग्रंथांत आढळावयाची नाहीं.

इतकेंही करून त्यांच्या कादंबऱ्या सर्वथा सोंवळ्या, लहानापासून मोठ्यापर्यंत—सुशिक्षितांपासून अशिक्षितांपर्यंत सर्वांना सारख्याच प्रिय वाटत. वाचकांचीं मनें आकर्षून घेण्यासाठीं त्यांना बाह्य हिडीस उपायांची बिलकूल जरूर वाटत नसे. यामुळेंच महाराष्ट्राचा इतिहास प्रत्येक मराठा कुटुंबांत घरोघरीं फैलावून देण्यांत जी त्यांनीं इतिहासाची सेवा केली आहे, ती अत्यंत बहुमोल होय; आणि म्हणूनच व्यावहारिक दृष्टीनें संशोधन, संकलन, प्रकाशन वगैरेपेक्षां प्रसारणाचें जें कार्य त्यांनीं केलें, तेंच जास्त महत्त्वाचें होय असें मला वाटतें. त्यांचीं सर्वच पुस्तकें मीं वाचलेलीं नाहींत. आरंभीं आरंभीं मी तीं नियमानें व उत्कंठेनें वाचीत होतों. परंतु अलीकडे अशीं पुस्तकें वाचण्यास मला सवड फारच थोडी मिळते.

## ताजी पालकर व शुद्धि

१९२७ सालीं मुंबईंत नामदार जयकरांचे अध्यक्षतेखालीं शिवाजीचा त्रिशत-ांवत्सरिक जन्मोत्सव मोठ्या प्रमाणांत साजरा झाला; त्याप्रसंगानें शिवाजी सूव्हनीर' व 'शिवसंस्मृति' हे दोन ग्रंथ-पहिला इंग्रजी व दुसरा मराठी असे छापून सिद्ध केले. त्या ग्रंथांचें संपादनकार्य मीं चार महिने अहोरात्र खपून सिद्धीस नेलें. ांतल्या मराठी ग्रंथांत 'शुद्धिकार्य' या नांवाची एक गोष्ट नाथमाधवांनीं लिहिलेली सिद्ध आहे. गोष्टीचीं पृष्ठें क्राऊन आकाराचीं ४८ असून तींत नेताजी पालकरांचें रित्र फार सुंदर वर्णिलेलें आहे.

नेताजी शिवाजीचा उजवा हात कसा झाला, शिस्तीच्या क्षुल्लक कारणावरून शेवाजीला सोडून तो औरंगजेबास कसा मिळाला, पुढें मुसलमानी धर्म स्वीकारून यानें अफगाणिस्तानांतील बादशहाची सेवा दहा वर्षें कशी बजावली आणि शेवटीं शेवाजीकडे परत येऊन तो पुन्हां प्रायश्चित्तानें स्वधर्मांत कसा आला, हा उत्कृष्ट थाभाग नाथमाधवांनीं सरस रंगविला आहे.

नाथमाधवांच्या समग्र ग्रंथांच्या यादींत या गोष्टीचें निदर्शन नाहीं म्हणून मुद्दाम मी हा प्रकार वाचकांचे नजरेस आणीत आहें. माझ्या विनंतीवरूनच त्यांनीं ोच ही गोष्ट मला अल्पावधींत लिहून दिली.

## एक संस्मरणीय प्रसंग

नाथमाधवांच्या भेटीचा एक प्रसंग माझ्या स्मरणांतून कधींही नाहींसा होणार नाहीं. तो प्रसंग म्हणजे सन १९२५ सालच्या अखेरीस माझ्या मुलाची निधनवार्ता ऐकून ते मुद्दाम मोठ्या कष्टानें आपल्या घरांतून मजकडे माझ्या समाधानासाठीं मुंबईंत माझ्या मुक्कामावर येऊन भेटले, त्या वेळचा होय. त्यांची असहाय्य शरीरस्थिति ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिली असेल, त्यांना या भेटींत नाथमाधवांना किती कष्ट पडले असले पाहिजेत त्याची कल्पना होईल. दोन तासपावेतों इहलोकच्या कष्टमय संसारयात्रेवर त्यांचें व आम्हां उभयतां नवराबायकोचें जें प्रेमळ व हृदयस्पर्शी संभाषण झालें, तेणेंकरून आमच्या मनास फार हलकें वाटलें आणि नाथमाधवांचा मधुर उपदेश आम्हांस फारच उपयोगी पडला. त्या प्रसंगावरून त्यांच्या तपस्वी वृत्तीची योग्यता मला विशेष कळून आली; आणि प्रत्येक प्राणी कांहीं-तरी विशिष्ट कामगिरीकरितां जन्मास येतो, ती कामगिरी करण्यांतच त्यानें आपला देह झिजवावा, यापलीकडे जास्त फलाची आकांक्षा मनांत धारण करूं नये, आणि

अखेरचें पाचारण येतांच संतुष्ट अंतःकरणानें प्रयाणास सदैव तत्पर असावें, अशा प्रकारचा अल्पप्रबोध नाथमाधवांच्या भेटीपासून मला मिळाला, तोच मी अद्यापि पाळीत आहें. मात्र ते माझ्यापूर्वी गेले. वयोमानानें त्यांच्या अगोदर प्रयाण करण्याचा हक्क माझा होता, हें मनांत येऊन काय वाटतें तें कागदावर लिहितां येत नाहीं.

## श्री. ग. म. वीरकर

मला मनापासून सहाय्य करणारे प्रकाशक रा. गणेश महादेव वीरकर यांची पहिली ओळख मला श्री. नाथमाधवांनीं करून दिली. इ. स. १९२० सालीं पुस्तकप्रसिद्धीच्या कामांत मी हैराण झालों असतां, श्री. नाथमाधवांस मीं बडोद्याहून पत्रानें माझ्या अडचणी कळविल्या. त्या ऐकून त्यांनीं लागोलाग गणेश महादेवांचें नांव मला सुचवून उभयतांचा परिचय करून दिला. ज्या कळकळीनें लेखक आपलें काम करितो तीच कळकळ मुद्रक व प्रकाशक नेहमींच बाळगतात असें नाहीं; आणि तशी कळकळ सर्वांची असल्याशिवाय लेखकाचा पाक वाचकांपुढें स्पृहणीय स्वरूपांत दाखल होत नाहीं. अर्थात् त्यामुळें लेखकाची केवढी निराशा होते, हें त्याचा तोच जाणे. परंतु माझ्याप्रमाणेंच समानधर्म असे कष्टाळु प्रकाशक वीरकर मिळाल्यापासून उभयतां समसमां संयोग जाहला अशा या अनुपम संतोषांत आम्ही आपली जीवनयात्रा संपवीत आहों. ती किती फलप्रद होते, हें आम्ही दोघेही पाहात नाहीं. काम करणें आहे, चांगलें आहे, केलें पाहिजे, एवढेंच आम्ही जाणतों. आणि अशीच भावना माझे मित्र नाथमाधव यांचीसुद्धां होती. अर्थात् असा समान भावनेचा एकाच विषयांतला सहकारी हरपल्यामुळें क्षणोक्षणीं मन विचारशून्य होतें. तथापि हाही एक या संसारयात्रेंतलाच अनुभव आहे, असें म्हणून पुढील उद्योगास लागण्याशिवाय गत्यंतर नाहीं.

नाथमाधवांचा उद्योग अपुरा राहिलेला आहे. समग्र मराठशाहीचा इतिहास कादंबरीच्या स्वरूपांत परंतु अधिकृत रीतीनें जनतेस सादर करण्याचा त्यांचा संकल्प होता. तो अद्यापि कोणीं पुढें चालविलेला आढळत नाहीं. या कार्याला सतत अभ्यास व अविश्रांत श्रमांची आवश्यकता आहे. साहित्य विपुल आहे. हें साहित्य लक्षांत घेतल्यास त्यांत कितीतरी नवीन गोष्टी, प्रसंग व व्यक्ति दृग्गोचर होतील. माझी तरुण लेखकांना पुनः अशी विनंति आहे कीं, नाथमाधवांचा अपूर्ण संकल्प कोणींतरी अभ्यासकानें अवश्य पुरा करावा.

---

# नाथमाधवांबद्दल मला काय वाटतें ?

[ ४ ] ( लेखक—म. भा. भू. श्री. **ज. र. आजगांवकर.** )

## निश्चयी स्वभाव

प्रसिद्ध कादंबरीकार कै. नाथमाधव यांचा माझा बराच परिचय होता. कावसजी पाटलाच्या तलावाच्या बाजूस किंवा माधवबागेंत जाण्याचा प्रसंग आला, म्हणजे येतेवेळीं नाथमाधवांच्या बिऱ्हाडीं जाऊन त्यांना भेटल्याशिवाय मी बहुतकरून राहात नसें. नाथ हे चांगले सुसंस्कृत (Cultured) आणि फार गोड स्वभावाचे असल्यामुळें त्यांजबरोबर घटकाभर बोलत बसण्यांत मला मोठा आनंद वाटत असे. नाथमाधव यांचा बाणा लष्करी, पण दुर्दैवानें एका शिकारीच्या वेळीं त्यांना भयंकर अपघात होऊन ते जे पंगु झाले ते कायमचे.

आपलें पंगुत्व नाहींसें करण्यासाठीं त्यांनीं आपल्या शक्तीच्या पलीकडे पैसा खर्च करून अनेक उपाय केले. पण त्यापासून म्हणण्यासारखी फलनिष्पत्ति झाली नाहीं. शेवटीं 'आलिया भोगासी असावें सादर' हें तुकोबांचें वचन डोळ्यांपुढें ठेवून त्यांनीं आपला भावी कार्यक्रम आंखला आणि शेवटच्या घटकेपर्यंत तो अव्याहत चालविला. नाथमाधवांच्या मोठेपणाचें बीज ह्या त्यांच्या निश्चयी स्वभावांत होतें.

त्यांच्या स्थितींतला दुसरा एकादा मनुष्य असता, तर तो सर्वस्वी असहाय्य होऊन आपल्या आप्तेष्टांना भारभूत होऊन राहिला असता. परंतु नाथांची करामत अशी कीं, ते तसल्या स्थितींत, स्वतःच्या कर्तबगारीच्या जोरावर, आपल्या असहाय्य आप्तेष्टांस सहाय्यक झाले !

## कादंबरीलेखनाचा हेतु

नाथमाधव हे जरी फारसे देखणे नव्हते, तरी ते रुबाबदार दिसत व त्यांच्या तोंडावर एक प्रकारचें तेज विलसत असे. त्यांची बसण्याची खोली लहानशीच होती; पण कादंबरीलेखनाला लागणारें सर्व साहित्य तींत अगदीं सज्ज असे.

ऐतिहासिक कादंबऱ्या लिहितांना, किल्ले वगैरे स्थलांची बरोबर कल्पना व्हावी म्हणून निरनिराळ्या प्रकारचे नकाशे त्यांनीं भिंतीस टांगून ठेवले होते. त्यांनीं आपल्या कांहीं कादंबऱ्या इंग्रजी कादंबऱ्यांच्या आधारानें लिहिल्या आहेत. ऐतिहासिक कादंबरी लिहिण्यापूर्वी, इतिहासांतील ज्या प्रसंगावर ती लिहावयाची, त्या प्रसंगाची सगळी उपलब्ध माहिती मिळवून ती मननपूर्वक वाचल्याशिवाय ते रहात नसत.

मुख्य ऐतिहासिक कथाभागाला बिलकुल धक्का न लावतां, त्या कथाभागाच्या अनुषंगानें अनेक काल्पनिक पात्रें निर्माण करून, त्यांच्या वर्तनानें आणि भाषणानें तत्कालीन देशस्थितीचें आणि समाजस्थितीचें वाचकाच्या मनास पटेल असें अगदीं हुबेहुब चित्र रेखाटण्यांत नाथमाधवांचा हातखंडा होता.

कै. हरीभाऊ आपटे यांच्या पश्चात् नाथांच्या तोडीचा ऐतिहासिक कादंबरीकार झाला नाहीं, असें मला वाटतें. त्यांची शुद्ध घरगुती मराठी भाषा वाचतांना मोठा आनंद होतो. हल्लींच्या कादंबऱ्यांतला चवचालपणा त्यांच्या कोणत्याही कादंबरींत प्रायः सांपडणार नाहीं. वाचकांच्या अनिष्ट मनोविकारांचें उद्दीपन न होतां त्यांचें सात्त्विक मनोरंजन व्हावें, हा त्यांच्या कादंबरीलेखनाचा हेतु होता.

## नाटकाचे शोकी

नाथमाधवांची आणि माझी जी शेवटची भेट झाली, त्या वेळीं त्यांनीं आपल्या एका नवीन सामाजिक कादंबरीचीं एक दोन प्रकरणें मला वाचून दाखविलीं होतीं. पुणें शहरांतील तत्कालीन सामाजिक स्थितीचें चित्र या कादंबरींत रेखाटण्याचा त्यांचा उद्देश होता. शेवटीं ही कादंबरी बहुतकरून अपुरीच राहिली असावी, असें वाटतें.

नाथमाधव हे नाटकाचे फार शौकी होते. त्यांनीं कांहीं नाटकें तर लिहिलींच आहेत, पण स्वतः रंगभूमीवर जाऊन प्रत्यक्ष भूमिकाही केली होती! प्रसिद्ध कादंबरीकार हरीभाऊ आपटे हे दिवंगत झाले, त्या वेळीं येथील प्रार्थनासमाजांत त्यांच्या दुखवट्याची जी सभा झाली होती, तिला मुद्दाम हजर राहून नाथमाधव यांनीं हरीभाऊंच्या कादंबऱ्यांविषयीं सुंदर भाषण केलें होतें.

# हेच ते नाथमाधव

[ ९ ] ( लेखकः—श्री. **धोंडो रघुनाथ तेंडुलकर** )

## प्रथम-भेट

रविवारचा दिवस. नाटक कोणतें बसवावें याची वाटाघाट आम्ही करीत होतों. क्लबला नवीन नाटक द्यायला नाटककार साहजिकच नाखूष. प्रसिद्ध ग्रंथकर्त्यांचें जुनें नाटक बसवावें तर परवानगीची पंचाईत. बिनवारशी नाटक बसविल्याशिवाय क्लबला गत्यंतर नव्हतें. इतक्यांत "संभाजी" कर्ते कै. श्री. आत्माराम मोरेश्वर पाठारे आले. त्यांची-आमची ओळख, ठाण्याला "रावबहादुर पर्वत्या" या नाटकाचा प्रयोग भारतवासी नाट्यसमाजानें केला, त्या वेळीं झाली होती. श्री. पाठारे येतांच आमचा विषय तेथेंच थांबला.

"एका नाटकांत फोटो पाहिजे आहेत. क्लबला देण्याची इच्छा आहे का ?" वास्तपुस्त झाल्यावर श्री. पाठाऱ्यांनीं प्रश्न टाकला.

आमच्या विचाराला निराळीच दिशा मिळाली. "हो, हो, आमची तयारी आहे." चारपांच जण एकदम उद्गारले.

झालें. दिवस ठरला. वेळही ठरली. फोटो काढले. त्यांची एक एक प्रत क्लबला मिळाली.

इतकें झाल्यानंतर क्लबच्या तोंडाला जास्तच पाणी सुटलें. आमच्या क्लबनें "गजेंद्रसिंग" नाटकावर हक्कच सांगायला सुरवात केली. श्री. पाठारे यांनीं मध्यस्थी करून सर्व गोष्टी आपलेपणानें जुळवून आणल्या. "गजेंद्रसिंग" नाटकाच्या कर्त्यांना भेटावयास जाण्याचा दिवस मुक्रर झाला.

क्लबची झाडून सर्व मंडळी उल्हासानें चर्नीरोडला बसून दादर स्टेशनवर उतरली. वाटेंत प्रत्येकजण आपापल्यापरीनें ग्रंथकर्त्यासंबंधानें रूपरेखा आंखीत होता. स्टेशनवर श्री. पाठारे हजर होतेच. त्यांनीं आम्हांला त्यांच्या घरीं नेलें.

घरासमोर असलेल्या लहानशा मोकळ्या जागेंतून पायऱ्या चढून व्हरांड्यांत गेलों. दक्षिणेच्या बाजूस एक कोच, एक बांक, व दोनतीन खुर्च्या टाकलेल्या होत्या; त्यावर आम्ही स्थानापन्न झालों. उत्तरेकडच्या बाजूला टोंकावर पूर्वपश्चिम टेबल, त्यावर कांहीं पुस्तकें, लिहिण्याचें साहित्य व विखुरलेले कागद होते. टेबलासमोर पश्चिमाभिमुख खुर्ची होती. तीवर बसलेले गृहस्थ मध्यम पण कसदार बांध्याचे, काळसर वर्णाचे, भुंवयांच्या मध्यभागीं "चंद्रमा" गोंदलेला, केंसांचा बॉबकट, अशा स्वरूपाचे होते. आम्ही आपले तर्क चालवीतच होतों—

"हेच ते नाथमाधव–" श्री. पाठाऱ्यांनीं अंगुलिनिर्देश केला.

## पूर्वऋणानुबंध

आम्ही बराच वेळ बोलत होतों. क्लबचा पूर्वेतिहास सांगितला. तेथें गेलेल्या प्रत्येक व्यक्तीची माहिती त्यांनीं करून घेतली. नाटक करण्याची परवानगी त्यांनीं क्लबला दिली. आमचें काम झालें. आम्ही जायला निघालों. पायऱ्या उतरतां उतरतां त्यांनीं मला हांक मारून जवळ बोलावून घेतलें.

"पुन्हां केव्हां याल ?"

"येईन केव्हां तरी." मी उत्तरलों.

"घाईघाईनें येऊं नका. स्वस्थपणानें बोलण्याकरितां या. रात्रीचे आलांत तरी चालेल."

आम्ही पंधराएक जण होतों. बाकीच्यांना सोडून मलाच त्यांनीं इतक्या आपलेपणानें कां वागवावें याचें आश्चर्य करीत मी बाकीच्यांत येऊन मिसळलों.

## अचूक परीक्षा

दुसऱ्या खेपेस रात्रीच्या वेळीं गेलों. ८॥ पासून ११॥ वाजेपर्यंत आम्ही बोलत होतों. दोन मनांची जुळणी इतकी झाली कीं, वैयक्तिक बाबतीही मोकळेपणानें एकमेकांजवळ आम्हीं बोलून टाकल्या. बोलतांबोलतां त्यांनीं एक डायरी दाखविली. कोणाही माणसाच्या प्रथम भेटीच्या वेळीं ते त्याच्या चारित्र्याचें अनुमान बांधीत आणि जसजसा त्याचा परिचय होत जाई तसतसा त्याचा पडताळा पाहात असत. डायरी पाहिल्याबरोबर माझी जिज्ञासा जागृत झाली. आपल्या स्वतःसंबंधानें दुसऱ्याचें मत कसें आहे हें समजून घेण्याची इच्छा प्रत्येकाला असतेच. डायरी पाहिल्याबरोबर मी श्री. नाथमाधवांना विचारलें:—

"माझ्याबद्दल आपण काय लिहून टेवलें तें दाखवाल का?"

ते थोडेसे कां कूं करूं लागले. बराच आग्रह केल्यावर डायरींतील एक विवक्षित पान काढून त्यांनीं माझ्या हातीं दिलें.

प्रथम भेटीच्या वेळीं मला त्यांनीं इतक्या आपुलकीनें कां वागविलें व आग्रहानें पुन्हां भेटण्यास कां बोलावलें या प्रश्नाचें उत्तर त्या डायरींत मला मिळालें. त्याच दिवशीं "वीरधवल"ची हस्तलिखित प्रत मला त्यांनीं वाचावयास दिली.

## आत्मवृत्त

एकदां बोलतांबोलतां 'मी लंगडा कसा झालों?' याचा वृत्तांत त्यांनीं सांगितला. तो त्यांच्याच शब्दांत होतां होईल तों देण्याचा प्रयत्न करीत आहें—

"माझ्या खात्यांतील एका साहेबानें रजा काढली आणि शिकारीकरितां सिंहगडावर यायला निघाला. मींही कांहीं कारणानें रजा काढली आणि त्याच गाडीनें मुंबईला यायला निघालों. साहेबानें सिंहगडावर कँप दिला. मी बरोबरच होतों. मला शिकारीचा भारी नाद. जेवणखाण झाल्यावर जरा लवंडलों. किंचित् डोळा लागला. इतक्यांत साहेबाकडून मला शिकारीला बोलावणें आलें. त्या वेळीं माझें मन उल्हसित नव्हतें. कारण काय असेल तें असो; जावें असें मनांत येईना. मीं उडवाउडवीचें उत्तर दिलें, आणि निरोप्याला घालवून लावला; आणि लोळत पडलों. जरा वेळानें दुसरा माणूस आला आणि "साहेबानें आत्तांच्या आत्तां बोलावलें आहे" म्हणून सांगूं लागला. जावें, कीं न जावें याचा विचार करीत होतों इतक्यांत तिसरें बोलावणें आलें. मला शिकार खेळण्याची हौस फार. इतकें असूनही मनाला उत्साह वाटेना. पण साहेबाचें मन मोडायचें कसें? उठलों. ब्रीचिस चढविली. ब्रीचिसच्या खिशांत काडतुसें घातलीं; बंदुक घेतली आणि निघालों. वाघ पिसाळला आहे, लोकांना तो फार त्रास देतो, असें शिकाऱ्यानें सांगितलें. साहेबाच्या बंगल्याजवळ गेलों, तों साहेब आपल्या तयारींत होता. शिकारी व कुत्रे रान उधळण्याकरितां त्यानें पाठवून दिले. मला गडावरून जायला सांगितलें व आपण गडाखालून गेला. तिन्हीसांजची वेळ. वाघ दरींत डरकाळ्या फोडीत होता. त्या माझ्या कानीं ऐकूं येत होत्या. त्यानें दरींतून बाहेर यावें म्हणून बंदुकीचा बार काढण्याकरितां एक पाय पुढें टाकला तोंच कड्यावरून खालीं घसरत आलों. त्या वेळीं विशेष लागल्यासारखें वाटलें नाहीं. इतक्यांत शिकारी धांवून

आले; साहेबाला कळलें तसा तोही आला. त्यानें मला उठविलें, उचलून घरीं आणलें. रक्त बरेंच गेलें व वेदनाही बऱ्याच होऊं लागल्या. साहेबाची लेडी जवळ होती. तिच्यानें तें पाहवेना. तिनें एक व्हिस्कीचा डोस दिला. मला झोंप लागली. झोंपतून जागा झाल्यावर मी उठून बसलों, तों धाडकन् मागें पडलों. माझे पाय जागचे हालेनात. रक्ताभिसरण कमरेपासून पायांपर्यंत बंद पडलें. त्या वेळीं त्या बाईला वाईट वाटलें; आणि ती हातांतील सोन्याच्या बांगड्या मला देऊं लागली. मीं घेतल्या नाहींत. शेवटीं ती उद्गारली, "Dwarka I ruined your life !"

## मी लेखक कसा झालों ?

"...पुष्कळ उपाय केले पण पायांत रक्त कांहीं भरेना. झालें. जन्माचा पंगू झालों. बसेन ती जागा, आपण होऊन येतील तीं माणसें, हेंच माझें जग. मनाला करमेना; वेळ जाईना. विविध अंतरंगांनीं नटलेल्या माणसांचा सहवास मिळेना. सत्यसृष्टीशीं पारखा झालों. वेळ घालवायला काम तरी कोठून मिळणार ?–अशा असहाय्य स्थितींत पुस्तकांतील सृष्टी शोधूं लागलों. मन रंगूं लागलें.

"पुस्तकांतील सृष्टीशीं समरस होतां होतां कल्पना जागृत झाली; व आपणाला कल्पनासृष्टींत स्थिर संचार करतां येईल अशी आशा वाटूं लागली. त्या दिशेनें प्रयत्न सुरू झाले. मनाला उमेद वाटली. त्यांत महाराष्ट्रभाषाचित्रमयूर श्री. आठल्ये यांनीं उत्तेजन दिलें. तेच माझे लेखनव्यवसायांतील गुरु......"

## क्षमा करणें म्हणजे चूक करण्यास उत्तेजन

मुंबईंत राहावयास आल्यानंतर आठवड्यांतून एका ठराविक दिवशीं येऊन भेटेन असें त्यांनीं मजकडून कबूल करून घेतलें. एकदां दोनतीन आठवडे त्यांच्याकडे मला जातां आलें नाहीं. त्यांनीं पोष्टांतून पत्र पाठविलें; तरीही मला त्यांना भेटतां आलें नाहीं. तिसरें पत्र आलें. नंतर मला भेटायला जायची लाज वाटूं लागली. म्हणून पत्र पाठवून प्रथम माझ्या चुकीबद्दल क्षमा करा अशी विनंती केली. त्या पत्राच्या उत्तरांत खालील वाक्य होतें; "आपण चूक केली असें मला वाटत नाहीं. केली असें समजून चाललें तरी त्याबद्दल क्षमा करणें म्हणजे तीच चूक पुन्हां करायला उत्तेजन देण्यासारखें आहे."

## तुम्ही कांहीं तरी लिहा

श्री. नाथमाधवांनीं कादंबरी लिहावी आणि ती मला वाचावयास द्यावी, असा साधारणतः प्रघात होता. वाचून झाल्यावर त्यांचा-माझा तिच्यावर विचारविनिमय होत असे. त्यावरून त्यांच्या मनाची अशी समजूत झाली होती कीं, प्रयत्न केल्यास मी लेखक होऊं शकेन. त्यामुळें ते नेहमीं माझ्या पाठीमागें लागत आणि म्हणत, "कांहीं तरी लिहा तुम्ही." पण आपलें तें काम नव्हे, ही माझी ठाम समजूत. कोणत्याही कार्याला किंवा कलेला सर्वस्वी वाहिल्यावांचून सुखासुखी ती हस्तगत होणें अशक्य !

तरी पण त्यांनीं माझा पिच्छा सोडला नाहीं. हिंद एजन्सीची 'आणा माला' भर जोमांत होती. तिच्या संक्रांतीच्या अंकाकरितां गोष्ट लिहावयास त्यांनीं मला सांगितलें. प्लॉट दिला; जुळणी करून दिली. गोष्ट दोन दिवसांत प्रेसमध्यें गेली पाहिजे होती. फक्त मीं लिहायचें. बांधलेली शिदोरी घेऊन, लेखनाचें साहित्य घेऊन, लिहावयास बसलों. एक ओळ लिहिली; खोडून टाकली. वाक्यच नीट जुळेना. प्रयत्न करून करून थकलों. एक दिवस गेला, दोन गेले. आतां मात्र धीर सुटला. रात्रौ खोलीचा दरवाजा बंद करून एकटाच बसलों आणि वेडीवांकडी आली तशी गोष्ट लिहून तर पुरी केली, आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं श्री. नाथमाधवांच्या हवालीं केली. "पसंत असेल तर छापा, नाहीं तर फाडून टाका" असें सांगितलें.

संक्रांतीच्या दिवशीं माझ्या एका मित्रानें 'आणा माले'चा अंक दाखवून मी लेखक झाल्याबद्दल माझें अभिनंदन केलें.

## ज्योतिषशास्त्राचा नाद

पुढें पुढें तर श्री. नाथमाधवांना ज्योतिषशास्त्र, हस्तसामुद्रिक इत्यादि विषयांचा नाद बराच लागला. या निमित्तानें बरीच मंडळी त्यांच्याकडे येत असत. या शास्त्रावर माझा विश्वास मुळींच नव्हता. या बाबतींत आमचा बराच वादविवाद होत असे. एकदां सहजीं माझा हात मीं त्यांना दाखविला. हात पाहून एकच गोष्ट त्यांनीं सांगितली,—

"तीन वर्षांनंतर एक काळ असा येणार आहे कीं केवढाही मोठा पगार तुम्ही मिळवीत असा, एक वर्षपर्यंत तुमच्या हातांत दिडकीही असणार नाहीं."

मीं हसण्यावारी घालविलें. पण खरोखरीच तीन वर्षांनीं अकल्पित रीतीनें तो ाळ आला. सबंध एक वर्ष माझ्या हातांत एक दिडकीही नव्हती.

## मीं माझें कर्तव्य केलें'

श्री. नाथमाधवांना एकदां भेटण्याकरितां गेलों असतां तेथें एक गृहस्थ बसलेले ोते. मी त्या गृहस्थांना पूर्णपणें ओळखीत होतों. श्री. नाथमाधवांनीं चटकन् एक पया काढून त्यांच्या हातीं दिला. मला त्यांचें तें करणें पसंत पडलें नाहीं.

"नाथ, आपण कुपात्रीं दान केलेंत—"

"असं कसं म्हणतां तुम्ही ?"

"तुमच्याकडून घेतलेला हा रुपया कुठें जाणार माहीत आहे तुम्हांला ?"

"खाणावळींत. गृहस्थ दोन दिवस जेवला नाहीं."

"खाणावळींत नव्हे–दारूच्या गुत्त्यांत."

"जाऊं द्यां. माझें कर्तव्य मीं केलें. त्याचें कर्म त्याच्याबरोबर."

## वप्नांचीं टिपणें

नाथमाधवांना स्वप्नांचीं टिपणें ठेवण्याची दांडगी संवय असे. त्या टिपणांच्या हा-सात चोपड्या होत्या. त्यांचे एक बंधु कालवश झाले. त्यांच्याबद्दल एकदां गोष्टी नेघाल्या असतां, त्यांनीं त्यांतील एक चोपडी काढून उघडून मजजवळ दिली. ंधूंच्या मरणापूर्वी नऊ महिने पडलेलें तें स्वप्न इतकें तंतोतंत खरें ठरलेलें पाहून मला आश्चर्य वाटलें.

## 'स्वयंसेवक' कादंबरीचें प्रकाशन

प्रकाशक या नात्यानें माझा संबंध श्री. नाथमाधव यांच्याशीं बराच आला. 'वीरधवल', 'सांवळ्या तांडेल', 'रायक्लब भाग २ रा' हीं त्यांचीं पुस्तकें मीं प्रसिद्ध केलीं. नंतर मजजवळचें भांडवल संपलें. प्रकाशित झालेल्या पुस्तकांच्या विक्रींतून पुढच्या पुस्तकाच्या प्रकाशनाची तरतूद झाल्याविना नवीन पुस्तक हातीं घ्यावयाचें नाहीं, असा मनाशीं निश्चय केला. नंतर मुंबईतील दुसरे एक प्रकाशक मला भेटले.

"श्री. नाथमाधवांच्याकडे कादंबरीकरितां जाणार आहें." ते म्हणाले.

"खुशाल जा. मला सध्यां कांहींही करतां येत नाहीं."

ते प्रकाशक श्री. नाथमाधवांना भेटले. "स्वयंसेवक" या कादंबरीची हस्तलिखित प्रत त्यांच्या स्वाधीन केली. वाचल्यानंतर प्रकाशकांना पसंत पडली. मोबदल्याचें विचारतां नाथमाधवांनीं हजार रुपये मागितले. प्रकाशक साडेसातशें द्यायला तयार झाले. श्री. नाथमाधवांनीं ते नाकारले आणि लगेच मला बोलावणें पाठविलें. गेल्याबरोबर ती हस्तलिखित प्रत माझ्या हातांत टाकली. मीं पुष्कळ आढेवेढे घेतले. माझ्याकडून आपले पैसे वेळेवर मिळणार नाहींत, असेंही निक्षून सांगितलें, तरीही ते ऐकेनात.

"मी ती कादंबरी दुसऱ्या कोणालाही देणार नाहीं—तुम्हांलाच देणार ! तुम्ही तिचें वाटेल तें करा."

भांडवल गुंतल्यामुळें अडचणीची परिस्थिति उत्पन्न झाली; हें मी श्री. नाथमाधवांच्याजवळ बोललों नव्हतों. एके दिवशीं त्यांनीं मला बोलावून घेतलें आणि एका नवीन नाटकाचें लिखाण माझ्या स्वाधीन केलें. त्या वेळीं मी माझी परिस्थिति त्यांच्यापुढें मांडली.

"छपाईची व्यवस्था मी करतों. या पुस्तकाच्या बाबतींत एक पैही तुम्ही खर्च करूं नका. पुस्तकावर प्रकाशक म्हणून तुमचें नांव घालण्याची परवानगी द्या."

## 'काय बोलण्यासारखें होतें ?'

बऱ्याच अडचणींमुळें श्री. नाथमाधवांकडे एक महिनाभर मला जातां आलें नाहीं. एके दिवशीं त्यांच्या-माझ्या ओळखीच्या एका इसमानें त्यांच्या निधनाची बातमी सांगितली. मी स्तंभितच झालों. पंधरा वर्षांचा परिचय असतां शेवटीं भेट झाली नाहीं. दोन शब्द बोलावयास मिळाले नाहींत, याबद्दल बरीच हळहळ वाटली. सबंध दिवस मन अस्वस्थ होतें. रात्रौ झोंपही लागेना. पहांटे चारानंतर जरासा डोळा लागला. माझ्या राहत्या खोलीच्या दरवाजांतून कोणीं डोकावून पाहिलें असा भास झाला; इतक्यांत काठीवर भार देऊन हळूहळू पाय ओढीत श्री. नाथमाधव खुर्चीवर येऊन बसले. त्यांना पाहिल्याबरोबर मला गहिंवर आला !

"दोन शब्दही बोलायला मिळाले नाहींत—"

"काय बोलण्यासारखें होतें ?—"

मी चटकन् जागा झालों.

---

# नाथमाधव आणि माझी वाङ्मयसेवा

[ ६ ] ( लेखकः-श्री. **भार्गवराम विठ्ठल वरेरकर** )

## शिपाईगडी लेखक झाला !

कोणत्याही नवीन लेखकाचें नांव प्रसिद्ध झालेलें दिसलें, कीं त्याच्याबद्दलची जिज्ञासा साहजिकच जागृत होते. 'प्रेमवेडा' या नांवाची एक छोटी कथावजा कादंबरी ज्या वेळीं प्रसिद्ध झाली त्या वेळीं अशीच माझी जिज्ञासा जागृत झाली. ती कथा फारशी आकर्षक होती असें नाहीं; परंतु उदीयमान लेखकाच्या दिव्यत्वाची लहानशी ठिणगी त्या कथेंत दिसून येत होती.

'हिंद एजन्सी एक आणा'माले मधून नाथमाधव यांच्या आणखी कांहीं किरकोळ गोष्टी व 'रायक्लब अथवा सोनेरी टोळी' ही कादंबरी प्रसिद्ध होऊं लागली. 'हिंद एजन्सी'चे एक मालक, नाना केतकर हे माझे लहाणपणापासूनचे स्नेही. त्यांची भेट झाली त्या वेळीं या लेखकाची चवकशी केली.

नोकरीमुळें रजा मिळेल त्याच वेळीं कोंकणच्या बाहेर पडण्याची सवड मला मिळत असे; आणि म्हणूनच इच्छा असूनही पुष्कळ दिवसपर्यंत मला नाथमाधव यांची भेट घेतां आली नाहीं.

केतकर यांनीं जी हकीकत सांगितली, ती मोठी हृदयद्रावक होती. पलटणींत शिरण्याची इच्छा असलेला शिपाईगडी सिंहगडावरून पडल्यामुळें जन्माचा पंगु बनला आणि म्हणूनच लेखक झाला !

## अद्वितीय उदाहरण

बुद्धिपुरस्सर-किंबहुना सक्तीनें, लेखकाचा पेशा नाथमाधव यांना पत्करावा लागला. जन्मतः लेखनाची प्रवृत्ति त्यांना नव्हती. केवळ पंगु झाल्यामुळें उदर-निर्वाहाचें साधन म्हणून त्यांनीं लेखकाचा पेशा पत्करला, या गोष्टीचें मला मोठें कौतुक वाटलें. चालताबोलता, हिंडताफिरता असला तरी लेखक व्यावहारिक

दृष्ट्या 'पंगूच' असतो. प्रकाशकानें प्रकाशन केलें पाहिजे; बुकसेलरनें पुस्तकें विकलीं पाहिजेत; ग्राहकांनीं तीं विकत घेतलीं पाहिजेत; आणि वाचकांनीं तीं वाचलीं पाहिजेत; तेव्हांच लेखकाच्या खिशांत दमडी-दुगाणी येऊन पडणार. लेखणी चालविणारा माणूस अशा रीतीनें पंगू असतो; पण पंगु झाल्यामुळें लेखणी उचलणें भाग पडल्याचें नाथमाधव यांचें उदाहरण भारतीय लेखकवर्गांत तरी अद्वितीय होय.

## झाली भेट एकदांची !

किरकोळ रजा घेऊन एकदोन वेळां मुंबईला आल्यावेळीं त्यांची गांठ घेण्याचा मीं प्रयत्न केला; पण ते त्या वेळीं मुंबईत नसल्यामुळें भेट झाली नाहीं. ते पंगु नसते तर त्यांना मुद्दाम कोंकणांत घेऊन जाण्याची तजवीज करतां आली असती. अशा प्रकारें बरेचसे लेखक कोंकण पाहाण्यासाठीं म्हणून कां होईना, येऊन गेले होते. पण नाथमाधव यांचा पंगूपणा कशा प्रकारचा आहे, आणि आगबोटीचा प्रवास त्यांना होणें शक्य आहे कीं नाहीं याची कल्पना नसल्यामुळें त्यांना कोंकणच्या प्रवासाचें आमंत्रण देणें मला अशक्य होतें.

अशींच कांहीं वर्षें गेलीं. पण एकदां माझे मित्र, श्री. विश्वनाथ गोपाळ शेट्ये यांनीं त्यांची-माझी गांठ घालून दिली.

मी ज्या वेळीं त्यांच्या घरीं गेलों त्या वेळीं ते एकटेच होते. त्यांनीं नमस्कार केला आणि उठून स्वागत करण्यास आपण असमर्थ असल्याबद्दल दिलगिरी व्यक्त केली.

कांहीं वेळपर्यंत मी त्यांच्याकडे पाहात बसलों होतों. ते एका खुर्चीवर बसले होते. साधारणपक्षीं दिसून येणारी लेखकाची मुद्रा त्यांच्या चेहेऱ्यावर नव्हती.

## दुःख व आनंद

मला पटलें. हा माणून शिपाईगडी होण्यासाठींच जन्माला आलेला होता. दृष्टि शिपाईबाण्याची, रुबाब शिपाईबाण्याचा—क्षणभर मनाला जितकें दुःख वाटलें तितकाच आनंद झाला. आजच्या काळांत शिपाई होऊन या गृहस्थानें काय केलें असतें ? कुठल्या तरी पलटणींत जमादार, सुभेदार याच्या पलीकडे मजल गांठण्याची पलटणींतील नोकरांची परिस्थिति नव्हती. तो लढाईपूर्वीचा काळ होता. मला वाटलें, झालें तें बरें झालें. तलवारीपेक्षां देखील तिखट असलेली लेखणी या शिपाईगड्याच्या हातून मराठी वाङ्मयाला भरगच्च स्वरूप आणणार, या अपेक्षेनें मला आनंद झाला.

ऐतिहासिक कथानकें लिहिण्याची कल्पना नाथमाधव यांच्या मनांत त्यावेळीं घोळत होती; ती मूर्त स्वरूपांत आली नव्हती. शिवाजीचें चरित्र आणि मराठ्यांचा इतिहास याजवर एक धारावाहिक कथामाला लिहिण्याचा आपला मनोदय त्याच वेळीं त्यांनीं मला सांगितला. नाटक लिहिण्याचीही त्यांची महत्त्वाकांक्षा होती. आणि तें शिवचरित्रावरच लिहून नाट्यलेखनाला सुरवात करावी, असा त्यांचा मनोदय होता.

## लिहिण्याची पद्धति

दुसऱ्या वेळीं जेव्हां मी त्यांना भेटायला गेलों त्या वेळीं ते लिहीत बसले होते. त्यांची लिहिण्याची पद्धति कशी आहे, हें पाहण्यासाठीं मीं त्यांचें हस्तलिखित मुद्दाम मागून घेतलें. बहुधा ते जांभळ्या शाईनें लिहीत असत. त्यांचें अक्षर अत्यंत सुवाच्य होतें. तें पाहून मला फार आनंद झाला. ते लिहीत असतांना पाहिलें, त्या वेळीं असें दिसून आलें कीं, सुवाच्य अक्षर काढण्यासाठीं त्यांना मुद्दाम परिश्रम करावे लागत नसत. त्यांचा लिहिण्याचा वेग जितका जलदीचा असे तितकेंच त्यांचें अक्षरही सुवाच्य असे. बऱ्याचशा लेखकांचीं अक्षरें बहुतेक सुवाच्य नसतात. कित्येकांना आपलें अक्षर सुवाच्य नाहीं याचाच मोठा अभिमान वाटत असतो. कित्येक फार फराटे ओढतात. कित्येकांना अनुस्वारांची आणि विरामचिन्हांची खिजगणती नसते. पण नाथमाधव आपल्या लेखनांत आणि प्रत्येक गोष्टींत बुद्धिपुरस्सर काळजी घेत असल्याचें दिसून आल्यामुळें मला त्यांच्याबद्दल मोठा अभिमान वाटला.

## लेखकांबद्दल चर्चा

नंतर कांहीं लेखकांबद्दल त्यांचें-माझें बरेंच बोलणें झालें. निरनिराळ्या लेखकांबद्दल त्यांनीं मला मतें विचारलीं. कोणत्याही प्रकारचा संकोच न बाळगतां मी प्रांजलपणें माझीं मतें त्यांच्यासमोर मांडलीं. मतें देतांना मी कठोरपणा करीत होतों हें माझें मला कळत होतें. पण इतक्या खुल्या दिलानें प्रश्न विचारणाऱ्या व्यक्तीसमोर दांभिकपणानें ‘शांतिरस्तु पुष्टिरस्तु’ करून वेळ मारून नेणें बरें वाटलें नाहीं.

त्यामुळें त्यांनाही प्रश्न विचारण्यास उल्हास वाटूं लागला. आज नाथमाधवांच्या नांवाची आठवण क्वचितच केली जाते. त्या वेळचे सर्वसाधारण वाचक नाथमाधवांचे कायमचे गिऱ्हाईक होते. विक्रीच्या दृष्टीनें त्यांच्याइतकीं कुणाचींच जास्त पुस्तकें

खपत नव्हतीं. तरीही त्या वेळचे विद्वान लेखक त्यांना त्यांचें योग्य स्थान द्यायला तयार नव्हते. ही तक्रार आज वाटते आहे; त्या वेळीं नाथमाधवांनासुद्धां या तक्रारीची जाणीव नव्हती. पदवीधर लोकांच्या झळाळीमुळें आम्हीं तात्कालिक लेखक आपली पायरी तुलनेनें खालच्या दर्जाची आहे, असें समजून वागत होतों. एखाद्या मोठ्या लेखकानें आमच्या लेखनाबद्दल चार शिफारशीचे शब्द काढले, कीं आम्हांला मूठभर मास चढल्यासारखें होत असे. नाथमाधव याच परिस्थितींत होते.

## आत्मवंचना

त्या दिवशीं आमचें जें बोलणें झालें तें याच विषयावर झालें. कुणीकुणी आपल्या लेखनाची तारीफ केली; आणि कुणाकुणाचे आशीर्वाद आपल्याला मिळाले, याचाच इतिहास त्या दिवशीं नाथमाधव यांनीं मला सांगितला. ही आमची आत्मवंचना होत आहे ही जाणीव त्या वेळीं मला झालेली नव्हती. जगाच्या बाजारांत स्वतःचा डांगोरा जो मोठ्यानें पिटतो, त्याचेंच नांव लोकांत होत असतें. हें व्यावहारिक तत्त्व त्या वेळीं माझ्याप्रमाणेंच नाथमाधवांनाही कळलेलें नव्हतें. म्हणूनच मनाच्या तुलनेनें नाथमाधवांपेक्षां कमी दर्जाचे असणाऱ्या किंवा तुल्य दर्जाचे असणाऱ्या लेखकांच्या आशीर्वादांवर खूष झाल्याचा वृत्तांत सांगतांना नाथमाधवांना विशिष्ट प्रकारचा आनंद वाटत होता.

## सदोदित गुणांवर नजर

आप्पा टिपणीस यांचें 'चंद्रग्रहण' नाटक त्या वेळीं अतिशय लोकप्रिय झालें असून, त्याचे सारखे प्रयोग होत होते. या प्रयोगांना नाथमाधव बहुतेक सदोदित हजर असत. त्यांच्याइतका सहृदय प्रेक्षक क्वचितच आढळून येईल. दोषैकदृष्टि त्यांच्याठायीं नव्हती. गुणांवर त्यांची सदोदित नजर असे; आणि त्या गुणांच्या तुलनेनें आपल्यांत वैगुण्य कोठें आहे, याचा पडताळा पाहण्याचा मोह त्यांना आवरतां येत नसे. अशा वेळीं मत्सराचें वारें त्यांच्यांत केव्हांही शिरलें नाहीं. 'चंद्रग्रहण' या नाटकानंतर आप्पांचें 'राज्यारोहण' हें नाटक बसत होतें. (हेंच नाटक आतां 'शिक्काकट्यार' या नांवानें संगीत स्वरूपांत रंगभूमीवर आहे.) त्या नाटकाच्या रंगी तालमीला अप्पांनीं नाथमाधवांस मुद्दाम बोलाविलें होतें. ते गाडींत बसून थिएटराच्या दाराशीं आले आणि त्यांना उतरण्यासाठीं मी आणि विश्वनाथपंत शेट्ये यांनीं ज्यावेळीं हात दिला त्या वेळीं त्यांना फारच संकोच वाटला. आम्हीं दोघांनीं उचलून त्यांना थिएटरांत आणून बसविलें. त्या वेळीं ते गहिंवरून आले. आपल्या पंगूपणाबद्दल त्यांना फार वाईट वाटलें!

## संस्मरणीय रंगी तालीम

ती रंगी तालीम आजवर आठवण राहण्याइतकी सुंदर झाली होती. प्रत्येक अंक संपला, कीं नाथमाधव तोंड भरभरून नाटकाची स्तुति करीत होते.

तालीम संपली आणि रंग उतरून अप्पा ज्या वेळीं त्यांना भेटण्यासाठीं आले, त्या वेळीं त्यांनीं अप्पांची स्तुति करण्यांत इतकीं सुंदरसुंदर विशेषणें योजिलीं कीं, त्या वेळीं अप्पांना देखील लाजल्यासारखें वाटलें असावें. ते अंतःकरणापासूनचे उद्गार होते. अप्पांना खूष करण्याची यत्किंचितही वृत्ति त्या उद्गारांत नव्हती. 'राज्यारोहण' नाटकाची झळाळी नाथमाधव यांना त्या वेळीं इतकी वाटली कीं, त्यांनीं लिहिलेल्या 'लोकसंग्रह' नाटकांत त्याची कमीजास्त पडछाया पडलेली दिसून आल्यावांचून राहिली नाहीं.

## नोकरीच्या मगरमिठींतून सुटका

त्यानंतरची जी भेट झाली, त्या वेळीं नोकरी सोडण्याच्या विचारानें मी निघून आलों होतों. ती भेट मुद्दाम घेतली होती. सहजगत्या भेटण्यासाठीं म्हणून गेलों नव्हतों. मला त्यांचा अनुभव विचारावयाचा होता. नोकरी पत्करल्यापासून नोकरी सोडावी आणि स्वतंत्र रीतीनें लेखनव्यवसाय करावा असें वाटत असतांही बढती व पेन्शनच्या लोभाच्या मगरमिठींतून मला सुटतां येत नव्हतें.

प्रामाणिकपणें नोकरी करण्यापायीं अर्धांगवायु झाला असतांही वरिष्ठानें रजा न दिल्यामुळें आणि तशा अपंग स्थितींत नोकरी करावी लागल्यामुळें, मला नोकरीचा तिटकारा आला होता. नाथमाधवांचे दोन्ही पाय लुले झाले होते. माझी डावी बाजू आतां सारीच लुली पडली होती. मदतीशिवाय मला रस्त्यांतून कोठेंच फिरतां येत नव्हतें. नाथमाधवांच्या अपंग परिस्थितीची मला त्या वेळीं खरी जाणीव झाली. मला निदान चालतां तरी येत होतें; पण त्यांना तें देखील शक्य नव्हतें.

## नाथमाधवांचा सल्ला

मी नोकरी सोडूं नये, अशी माझ्या बऱ्याच मित्रांची इच्छा होती. पेन्शन घ्यावें असें कित्येक जण म्हणत होते. त्या परिस्थितींत मला डॉक्टरचें सर्टिफिकेट मिळालें असतें, तर मला पेन्शनही घेतां आलें असतें. पण मनाचा निश्चय मला त्या वेळीं करतां येत नव्हता म्हणूनच मीं नाथमाधवांना असा प्रश्न स्पष्टपणें विचारला. त्या

वेळीं ते म्हणाले, "नाइलाजानें–सक्तीनें मला लेखनव्यवसायांत पडावें लागलें. चरितार्थासाठीं मी लेखक बनलों; पण पहिल्यापासून लेखनाची आवड असलेल्या तुमच्यासारख्या लेखकाला इतके दिवस नोकरींत कसें राहतां आलें याचेंच मला आश्चर्य वाटतें.

"सरस्वतीच्या कृपेनें कोणी कधीं श्रीमंत होत नाहीं. अन्नवस्त्र मिळविण्यापुरती,–साधारणपणें योगक्षेम होण्यापुरती मिळकत लेखनानें होणें मुळींच अशक्य नाहीं. त्यांतून तुम्ही नाटकें लिहितां, आणि लेखनाच्या सर्वसाधारण धंद्यांत इतर लोकांपेक्षा नाटककारांना जास्त पैसा मिळण्याचा अधिक संभव आहे. अशा वेळीं तुम्ही नोकरीचा लोभ जितका लवकर सोडाल तितकें बरें होईल. खरें पाहिलें, तर तुम्ही यापूर्वीच नोकरी सोडून कुठें तरी आपलें बस्तान बसवायला पाहिजे होतें. पण आतां यापेक्षां जर वेळ लावाल, तर लेखनाचा धंदा पुढें सोडून द्यावा लागेल, असें माझ्या अल्प बुद्धीला वाटतें."

विनयानें उल्लेखिलेली ही त्यांची अल्प बुद्धि मला इतर कोणाच्याही प्रगल्भ बुद्धीपेक्षां जास्त महत्त्वाची वाटली.

पेन्शन घेतल्यानें सरकारी नोकरीचा संबंध राहील आणि त्यामुळें पदोपदीं लेखणी म्यान करावी लागेल, म्हणून एकदम नोकरीचा राजीनामा देणें योग्य होईल, असा स्पष्ट सल्ला त्यांनीं मला दिला.

तरीही त्या वेळीं नोकरी सोडण्याची माझी तयारी झाली नाहीं.

## नाथांचें भविष्य खरें ठरलें !

दीड वर्ष मी रजेवर काढलें आणि शेवटीं एकदां मनाचा निश्चय करून ज्या वेळीं राजिनामा दिला त्या वेळीं नाथमाधव यांना मुद्दाम भेटून तसें केल्याचें कळविलें. ते म्हणाले, "आतां तुम्हीं मार्गावर आलां. नोकरी सोडल्यानें तुमचे हाल होतील. उपासमारीचेही प्रसंग येतील. पण लेखनकार्य मनाजोगें होईल."

त्यांचें हें सर्व भविष्य खरें झालें. आज माझ्या हातून जर कांहीं अल्पस्वल्प लेखनकार्य झालें असेल, तर तें नाथमाधवांनीं पाठिंबा देऊन मला नोकरी सोडायला भाग पाडल्यामुळेंच.

नाथमाधवांची ग्रंथसंपत्ति पुष्कळ आहे. मराठी भाषेंतील इतर कोणत्याही लेखका-पेक्षां त्यांनीं जास्त ग्रंथनिर्मिति केलेली आहे. महाराष्ट्र त्यांना विसरला नाहीं, हें कोणीही बुकसेलर सांगूं शकेल. बऱ्याच नामजाद्या लेखकांच्या ग्रंथांचें समालोचन करून स्वतंत्र ग्रंथ निर्माण झाले आहेत; पण नाथमाधवांच्या ग्रंथांचें समालोचन करण्याची बुद्धि पदवीधरांच्या झळाळीनें दिपून गेलेल्या लोकांना होत नाहीं, हें मराठी भाषेचें दुर्दैव होय!

---

## कर्मवीराचें कर्तव्य

आपण आपली दृष्टि राष्ट्रहिताकडे वळविली पाहिजे. त्या धोरणानें कार्य करूं लागल्यावर त्या सगळ्यांचे परिणाम एकदम दिसावयाचे नाहींत हें खरें आहे. पण ती पेरणी आहे. त्या पेरणीचीं बीजें कांहीं लवकर उगवतील तर कांहींना उगवाव-यास उशीर लागेल; परंतु तीं मरावयाचीं मात्र खास नाहींत, हें प्रत्येक कर्मवीरानें लक्षांत ठेविलें पाहिजे. तीं केव्हांही उगवोत आणि त्यांस फळें केव्हांही येवोत, त्याची पर्वा करावयाची नाहीं. तीं बीजें आपल्या जन्मभूमींत रहावयाचीं आहेत; आणि त्याचीं फळें येतील तेव्हां तीं आपल्याच राष्ट्राला मिळावयाचीं आहेत, इतकी गोष्ट मात्र खरी मध्यकालीन कर्मवीरांनीं जीं बीजें पेरून ठेविलीं होतीं, त्यांचीं फळें कालेंकरून आपल्या राष्ट्रास मिळालीं आहेत व हल्लींही मिळत आहेत; त्याच-प्रमाणें आपण आज जें बीं पेरूं त्याचीं फळें आपल्या पश्चात् आपल्या वंशजांस खचीत मिळावयाचीं आहेत, हें दृढतर अंतःकरणांत वागवून **एकसारखा सदुद्योग करीत रहाणें हेंच प्रत्येक कर्मवीराचें मुख्य व आद्य कर्तव्य आहे.**

**—नाथमाधव**

# नाथांचा परिचय

## [७] (लेखकः—रा. रा. यशवंत नारायण टिपणीस)

### एका नाटकाची कहाणी

नाथांचा–माझा परिचय होता. 'अति' नव्हता. 'अतिपरिचयादवज्ञा' म्हणतात पण तसें नाहीं. त्यांचा परिचय होण्यापूर्वीच एका आगंतुक कारणामुळें माझ्याबद्द त्यांचा गैरसमज झाला होता. 'हिंद एजन्सी'चे केतकर यांनीं नाथांचें एक सामाजि नाटक मला वाचायला दिलें. नाटक देतांनाच केतकरांनीं मला सांगितलें कीं, बसविण्यासाठीं देत नाहीं, तर तें पुस्तकरूपानें प्रसिद्ध करावें कीं नाहीं, याबद्द तुमचें मत मला हवें आहे. त्यांनीं मला तेव्हांच हस्तलिखित दिलें व आमच्य कंपनींतील कोल्हटकरांनीं तें, 'मी प्रथम वाचतों' म्हणून तसेंच उचलून नेलें.

त्या वेळीं माझें 'राधामाधव' बसत होतें व त्याच्या तयारीच्या व्यापामुळ नाथांच्या नाटकाचें मला स्मरणच झालें नाहीं. 'राधामाधव' रंगभूमीवर आल्याव केतकरांनीं मला आठवण दिली, तेव्हां मी तें नाटक शोधूं लागलों; पण तें कां सांपडेना. माझा निरुपाय झाला व केतकर यांना मी हस्तलिखित हरवल्या सांगितलें. त्यांनीं तें नाथांना सांगितल्यावर नाथांच्या अंगाचा भडका झाला.

ही हकीकत पुण्याच्या सरदार बाळासाहेब घोरपड्यांच्या कानांवर नाथां घातली. नाथांच्या नुकसानीबद्दल आपण नाथांना कांहीं तरी पैसे द्यावे व हें प्रकर मिटवावें, असा बाळासाहेबांचा व माझा विचार ठरला. नाथमाधव त्या वेळीं पुण्यां असल्यामुळें बाळासाहेबांनीं मला पुण्यास बोलाविलें. मी पुण्यास जाऊन नाथांच भेट घेतली. नाथ एकदम माझ्यावर उसळले. त्यांचें नाटक हरवलें, त्यांना रा येणें साहजिकच होतें. 'तुमच्याजवळ नाटकाची रफ कॉपी असेल' असें म म्हणतांच नाथांनीं 'मी एकदांच लिहितों, कॉपी वगैरे करीत नाहीं' असें सांगितले

मी 'तुमच्या नुकसानीबद्दल पांचशें रुपये देतों' म्हटलें, तेव्हां तर ते फार चिडले! 'मला पैसे नको आहेत, माझें नुकसान पैशांनीं भरून येणार नाहीं. तुम तें नाटक मुद्दाम दडपून ठेवलें आहे. उद्यां त्यांत इकडेतिकडे फरक करून स्वतः

नाटक म्हणून स्टेजवर आणाल ! तुमचा कावा मला कळला !" असे निर्दयतेचे शब्द नाथांच्या मुखांतून आले !

मला अत्यंत राग आला; कारण मी तें नाटक वाचलें देखील नव्हतें. पण माझ्या हातून प्रत हरवल्याचा गुन्हा झाला असल्यामुळें मला मेल्याहून मेल्यासारखें झालें. हा गृहस्थ पैसेही घेत नाहीं आणि उलट माझ्या चारित्र्यावर भयंकर ठिणग्या टाकतो आहे, हें पाहून माझें मतही नाथांबद्दल कलुषित झालें.

## नाटकाचें हस्तलिखित कसें सांपडलें ?

श्री भारत मंडळीचा मुक्काम मुंबईहून पुण्यास गेला. आमच्या पहिल्या खेळा-पूर्वीच आमचा कपडेपट मास्तर दुसऱ्या कंपनींत पळून गेला. तेव्हां दुसऱ्या माणसाकडे कपडेपटाचा चार्ज देणें भाग पडलें. दुसरा कपडेपट मास्तर कपड्यांची तपासणी करीत असतां एका पेटींत त्याला एका नाटकाचें हस्तलिखित सांपडलें. त्यानें तें माझे बंधु माधवराव ऊर्फ भाऊ यांच्याकडे आणून देतांच त्यांनीं तें उघडून पाहिलें. त्यावर 'नाथमाधव' नांव पाहतांच त्यांनीं धांवत येऊन तें मला दिलें. माझा आनंद गगनांत मावेनासा झाला ! मी तडक बाळासाहेब घोरपड्यांकडे गेलों व तें हस्तलिखित त्यांच्या स्वाधीन करून नाथांच्याकडे हमखास पावतें करण्यास सांगितलें.

## नाथांचा आनंद

नाथांच्या हातीं प्रत पडतांच हरवलेलें मूल आईला भेटण्याइतका त्यांना आनंद झाला व त्याबरोबरच माझ्याबद्दल गैरसमज करून घेऊन माझ्यावर केलेल्या आरोपाबद्दल त्यांना वाईट वाटलें ! त्यांनीं मला भेटण्याबद्दल प्रेमाचा निरोप पाठविला व त्याबरोबरच त्यांचा गैरसमज करून देण्याला कोणकोण व्यक्ती कारण झाल्या त्यांचीं नांवेंही त्यांनीं मला कळवलीं. पण पुढें दोनतीन वर्षें त्यांच्या-माझ्या भेटीचा योग आला नाहीं.

## मी 'चंद्रग्रहण' कां लिहिलें ?

मोडकळीस आलेला श्री भारत मंडळीचा डोल्हारा सांवरण्यासाठीं मला कांहीं दिवस संगीताचा आश्रय घ्यावा लागला. पण संगीताचा परावलंबीपणा मला सहन होईना. मुंबईच्या मुक्कामीं माझे नाटककार मित्र प्रो. शेट्ये यांच्याबरोबर मी नाथांच्या भेटीला जाऊं लागलों. पहिल्या भेटीलाच नाथांनीं मला त्यांचें 'जातिवंत

मराठा वीर' नाटक वाचायला दिलें व तें यशस्वी कां झालें नाहीं तेवढें कळावें, अशी इच्छा दर्शविली. मीं तें वाचल्यावर दुसऱ्या वेळीं त्यांच्या समक्ष त्याची छाननी केली. ती त्यांना पटली. तेव्हांपासून त्यांना माझ्याबद्दल सहानुभूति वाटूं लागली व कंपनीच्या बाबतींत शक्य ती मदत करण्याचें त्यानीं कबूल केलें.

त्यांनीं माझ्याकडे 'शाहु नगरवासीं'तील आठवलेबंधूंना ठेवण्यासाठीं पाठवून दिलें. ती मंडळी चारपांच दिवस आमच्याकडे होती. परंतु एक दिवस त्या बंधूंनीं आम्हांला न सांगतां कंपनींतून प्रयाण केलें. ही हकीकत नाथांना कळविल्यावर ते म्हणाले, "आठवले बंधू म्हणतात अप्पांचीं नाटकें पौराणिक आणि सामाजिक; आम्हांला ऐतिहासिक नाटकाशिवाय मजा वाटत नाहीं व अप्पा कांहीं तीं लिहूं शकणार नाहींत." यापुढें ऐतिहासिकच नाटक लिहावयाचें असा माझा निश्चय ठरला व मी 'चंद्रग्रहण' लिहिलें.

## मुंबईवर 'चंद्रग्रहणा'चा मारा

कल्याण येथें 'चंद्रग्रहण' बसवून पुण्यास त्याचा धूमधडाका सुरू होईपर्यंत तीनचार महिन्यांत नाथांची-माझी भेट झाली नव्हती. पुण्यास अच्युतरावांचें 'नारिंगी निशाण' बसत होतें, त्या वेळीं आमची गांठ पडली. पुण्याला चंद्रग्रहणाची एकवीस—नव्हे बावीस तोफांची सलामी दिल्यावर आम्हीं मुंबईवर चंद्रग्रहणाचा मारा सुरू केला.

मुंबईस नाथांनीं चंद्रग्रहण पाहण्याची इच्छा दर्शविली. मी पुढच्या खेळाला तुम्हांला नेण्याची व्यवस्था करीन म्हटलें, पण मला त्याचें विस्मरण झालें. पण नाथ शारीरिक त्रासाला न जुमानतां खेळाला आलेच !

त्याच वेळीं त्यांनीं 'लोकसंग्रह' नाटक लिहिलें. तें त्यांनीं नानबा गोखल्यांस वाचून दाखविलें. दुसऱ्या दिवशीं नानबा आमच्या शेठ्यांजवळ म्हणाले, 'काय अप्पा पाजी आहे हो ! त्यानें नाथांचें नाटक चोरलें.'

शेठ्ये माझे मित्र असल्यामुळें त्यांनीं नानबांना बराच दम दिला. नानबा म्हणाले, 'नाथांनीं स्वतः मला सांगितलें.' शेठ्ये म्हणाले, 'चला नाथांकडे.' दोघेही नाथांकडे गेले.

नाथ म्हणाले, "हा नानबांचा गैरसमज आहे." मी म्हणालों कीं, 'लोक-संग्रहा' त मीं तुरुंगाचा सीन लिहिला होता; पण अप्पांनीं 'चंद्रग्रहणा' त तोच सीन

लिहिल्याकारणानें माझा सीन फुकट गेला. या 'तोच'चा अर्थ 'तसाच' आहे; पण नानबांनीं निराळा अर्थ घेतला व पराचा कावळा करून अर्थाचा अनर्थ केला! मला ही हकीकत कळल्यावर फारच मजा वाटली. पुढें तर चंद्रग्रहणाचें कर्तृत्व तीनचार नाटककारांकडे गेलें! आणि त्याचा उलगडा करण्याकरितां माझे मित्र श्री. पी. आर्. लेले यांना त्या नाटकाची प्रस्तावना लिहिणें भाग पडलें.

## नाथांचें निर्मळ मन

नाथांच्या 'आत्मयज्ञ' नाटकाचे प्रयोग वऱ्हाडांत चालू होते. चंद्रग्रहणाचे प्रयोगावर प्रयोग मुंबईस चालू असतां नाथांच्या एका वऱ्हाडी वकील मित्रानें नाथांना एका पत्रांत लिहिलें कीं, 'आत्मयज्ञ' करणारी कंपनी लवकरच मुंबईस येणार आहे. 'आत्मयज्ञ' नाटकापुढें आपलें तेज पडणार नाहीं; म्हणून चंद्रग्रहणाचे शक्य तितके प्रयोग लावून घेण्याची घिसाडघाई टिपणीसांनीं चालविलेली दिसते. हा मजकूर वाचून नाथांना वाईट वाटलें व मला त्यांनीं तें पत्र दाखविलें. नाथ म्हणाले, "अशा खुशामतीनें मीं चढून जात नाहीं. या लोकांना तुमचा उत्कर्ष सहन होत नाहीं, याबद्दल मात्र मला चीड येते." त्यांनीं ताबडतोब पत्र लिहून आपल्या मित्राची चांगलीच चंपी केली! नाथांचें निर्मळ मन आणि त्यांचा प्रेमळ-पणा यांचें वर्णन करावें तेवढें थोडेंच.

## हरीभाऊ आपटे व नाथमाधव

कै. हरीभाऊ आपटे वारले त्या दिवशीं नाथांची–माझी गांठ पडली, हरीभाऊंच्या निधनाबद्दल सारेच हळहळत होते, इतक्यांत 'पण नाथ हरीभाऊ वारले; आतां कादंबरीकारांत तुम्हीच पहिले!' असे उद्गार तेथें बसलेल्या एका व्यक्तीनें काढले. नाथांचा चेहरा उग्र दिसूं लागला. "दुसरे मरून मला मोठेपणा नको; स्वतःच्या हिमतीवर मला मोठेपणा हवा." नाथांच्या तोंडून हे उद्गार निघतांच त्या व्यक्तीचा चेहरा पाहण्यासारखा झाला! नाथांच्या मनाची थोरवी वेळोवेळीं प्रत्ययाला येत असे.

## नाथांसाठीं नियम मोडला

मी चहा घेत नसें, यामुळें मी जेव्हां जेव्हां जाई तेव्हां तेव्हां इतरांच्या चहा-बरोबर माझ्याकरितां ते हॉटेलमधून दूध मागवीत. एकदोन वेळां मला त्याचें कांहीं वाटलें नाहीं; पण आपल्याकरितां दरखेपेस नाथांना तीनचार आणे दुधाचा

खर्च पडावा, हें मला बरें वाटेना. मीं दुसऱ्या खेपेला त्यांना 'मी हल्लीं चहा घेऊं लागलों' आहें म्हणून खोटेंच सांगितलें व चहाच घेतला. पण त्यामुळें मला सगळीकडेच चहा प्यावा लागे; कारण 'मी चहा घेत नाहीं' म्हटलें तर लोक म्हणत, 'आम्हीं नाथांकडे तुम्हांला चहा घेतांना पाहिलें आहे.'

पुढें खरी हकीकत नाथांना कळली, तेव्हां ते मला म्हणाले, "माझ्यासाठीं तुम्हीं आपला नियम मोडावा हें बरें नाहीं; पण यावरून तुमचें माझ्यावरचें प्रेम मात्र दिसून आलें!"

---

## वाङ्मयाची प्रगती झपाट्यानें कां होत नाहीं?

आमच्या वाङ्मयांत एक विशिष्ट प्रकारचें वाङ्मय तयार होण्याला राजकीय परिस्थिति अनुकूल नसेल; परंतु नवीन कल्पना, नवीन सुधारणा, नवीन विचार, यांचा परिचय व त्या योगानें उत्पन्न होणारे विकार या गोष्टी वाङ्मयाच्या वृद्धीस कारणीभूत होत असतात, याबद्दल एकमत होईल अशी माझी खात्री आहे. एका प्रकारच्या राजकीय स्थितींत विशिष्ट प्रकारचें वाङ्मय होणार नाहीं हें खरें; तरी पण दुसऱ्या पुष्कळ प्रकारच्या वाङ्मयास अनुकूल परिस्थिति असतां वाङ्मयाची वाढ व प्रगति जितक्या जोरानें व्हावयास पाहिजे, तितकी ती कां होत नाहीं, याचा विचार केल्यास आमच्या विद्वान् लोकांचा आळस आणि अनास्था असेंच म्हणावें लागेल.

१९२० —नाथमाधव



श्री. नाथमाधव हे पनवेल येथें औषधोपचारासाठीं
राहिले असतां.

# नाथमाधवांच्या समाधीवर आठवणींची पुष्पांजली

[८] ( लेखकः—श्री. के. सी. ठाकरे, प्रबोधनकार )

## भेटीचा पहिला प्रसंग

नक्की साल आठवत नाहीं, पण तें १९०५ किंवा १९०६ असावें. मी कांहीं कामानिमित्त उलव्याला बोटीच्या धक्यावर आलों होतों. वेळ सकाळची १० वाजण्याची. मुंबईची बोट धक्याला लागली. 'फासिन्दारां'ची चढण्याउतरण्याची एकच लगबग उडाली. सगळे उतारू उतरल्यावर, बोटीचे खलाशी नि धक्यावरचे हमाल यांची गडबड उडाली. या गडबडींत कांहीं मुंबईचे 'सोकाजी' दिसत होते. बोटीचा कप्तानही या गडबडींत 'ऐसा करो–वैसा पकडो' ऑर्डर सोडीत होता. जड मालाचीं कांहीं पार्सलें उतरायचीं आहेत, का बोटीवर कोणी मयत झाला, त्याला बाहेर काढायची ही धडपड आहे, कांहीं कळेना. मी जरा पुढें झालों. काय भानगड आहे म्हणून एका खलाशाला विचारलें, तेव्हां तो म्हणाला, "बीमार आदमीको बहार निकालना है."

एका लाकडी आर्मचेअरमध्यें स्वच्छ अभ्र्याच्या गाद्या उशा घातलेल्या. त्यावर, नेकटाय कॉलरचा इस्तारीचा शर्ट, ब्रेस्ट, कोट घातलेला, डोक्यावर फॅन्सी गोण्डेदार टोपी असा एक दांडगा गुबगुबीत गुलाबी गालांचा तरुण, मारे ऐटींत बसून सगळीकडे हसत हसत पाहत आहे. आजूबाजूला एक वृद्ध बाई, एक तरुणी आणि २–३ 'जण्टलमेन' उभे आहेत. 'बीमार माणूस कोण?' म्हणून चौकशी करतां, 'खुर्चीत बसलाय् तो' असें कळलें. मनांत मी म्हटलें, या टग्याला काय धाड झाली बुवा? चांगला घट्टाकट्टा दिसतो आहे. बेट्याचे दण्ड–छाती तर चांगलीं पिळदार दिसतात. थट्टामस्करी करतोय, हसतोय, खिदळतोय, हा कसला 'बीमार आदमी?' आणि याच्यासाठीं कप्तानानें बोट सोडायला १५ मिनिटें उशीर केला, असा हा कोण बडा प्राणी बुवा? धक्याच्या दोन शिड्या जवळजवळ

बांधल्या आणि १०-१२ खलाशी हमालांनीं ती मोठी थोरली खुर्ची तावुतासारखी अलगद उचलून 'हाय् लोम् धुमूश्या'च्या गर्जनेच्या ठेक्यावर उचलून बोटींतून धक्क्यावर आणली आणि एका वडाच्या सावलींत ठेवली.

इतक्या अवधींत पनवेलचे सगळे टांगे पॅसिंजर घेऊन निघूनही गेले होते. दोनतीनच काय ते या मुंबईकर पॅसिंजरांच्या अडचणीची अटकळ बांधून ताटकळत उभे होते. पैसे मिळण्याचा हाच मोका असतो. भोंगा वाजवून बोटही परत मुंबईला रवाना झाली. ते दोघेतिघे इसम टांगेवाल्यांशीं ठरवाठरव करीत होते. "१५ रुपये-१२ च्या खालीं नाहीं" असे त्रोटक शब्द माझ्या कानीं आले, म्हणून मी पुढें झालों. मला स्थानिक माणसाला पाहतांच, ते इसम माझ्याशीं बोलूं लागले. टांगेवाल्यांनीं अडवून धरलें आहे, अशी तक्रार त्यांनीं केली आणि बोलतबोलत आम्ही त्या वडाच्या झाडाखालीं खुर्चीत बसलेल्या त्या धडधाकट बीमार आदमी जवळ आलों. त्यानें हात जोडून अशा हास्यानें मला नमस्कार केला, कीं जणूं काय आम्ही अगदीं जुनेपुराणे दोस्त. त्याच्याशीं मी बोलत होतों तरीसुद्धां हा इसम आजारी असावा, अशी पुसटसुद्धा शंका मला येईना. याच पहिल्या भेटींत मला जी हकीकत कळली, ती मी स्वतंत्र देतच आहें.

"माझें नांव द्वारकानाथ माधवराव पितळे. सिंहगडावर मला अपघात झाल्यामुळें कमरेपासून खालचा भाग आदळून जायबन्दी झाला आहे. पुष्कळ उपचार केले. पनवेलच्या धूतपापेश्वर आरोग्यमन्दिराचें नांव नि किर्ती ऐकून तिकडे उपचारासाठीं जात आहें. आपण पनवेलचेच का ?" तो.

"होय, मी पनवेलकरच आहें."—मी.

"वा! तर मग या ओसाड धक्क्यावर आपण आम्हांला देवच भेटलांत. आमची कोणाशीं तिथें ओळख नाहीं."—तो.

"आपण कांहीं काळजी करूं नका मी सर्व व्यवस्था करतों."—मी.

टांगेवाला इब्ला माझ्या ओळखीचा होता. त्याला मीं चांगला ठाकरी दम भरून ठरवणीवर आणला. टांग्याचे टप (Top) काढल्याशिवाय हें 'पितळी' सिंहासन टांगारूढ होणें शक्यच नव्हतें. स्क्रू नाहीं कीं पाना नाहीं. कांहीं तरी ठोकाठोक केली नि टपाला पदच्युत करून मुद्देमालासह खुर्ची वर चढवून टांग्याला बांधली, आणि तीन टांग्यांची ही मिरवणूक १२ च्या सुमाराला

पनवेलकडे रवाना झाली. मला उलव्यास काम असल्यामुळें, माझे मित्र श्रीमंत आत्मारामशेट आटवणे आणि गुरुवर्य दादा आठल्ये ( 'केरळकोकिळ' चे एडिटर ) यांना, या नवख्या पाहुण्यांची व्यवस्था लावण्याबद्दल मीं पत्रें दिलीं.

## एक चमत्कारिक मिरवणूक

संध्याकाळीं मी पनवेलला गेलों. तेव्हां तर गांवकऱ्यांत कौतुकाचें मोठें तुफान माजलेलें दिसलें. टांग्यावर आर्मचेअर बांधलेली, त्यावर एक फॅशनेबल गुटगुटीत तरुण ऐटींत बसलेला, मागें उभें राहून एका इसमानें त्याच्या डोकीवर छत्री धरलेली. पुढें एक टांगा, मागें एक टांगा. फक्त ताशेवाजंत्रीच कमती. अशी ही चमत्कारिक वरात गांवाच्या नाक्यावर येतांच, ती पाहायला गावकऱ्यांचे थवेच्याथवे जमले आणि या घोळक्यासह नाथमाधव ॲण्ड कंपनीचें प्रोसेशन धूतपापेश्वर कारखान्याच्या दरवाज्याशीं येऊन धडकलें.

तेथें या पाहुण्यांची कांहीं सोय लागणार नाहीं, ही माझी अटकळ खरी ठरली. अखेर माझ्या पत्राप्रमाणें श्री. आत्मारामशेटनें यांच्या बिऱ्हाडाची व्यवस्था ताबडतोब श्रीमंत शंकरशेटच्या नव्या कोऱ्या चार मजली बंगल्यांत केली आणि नाथमाधवांची खास व्यवस्था चौथ्या कळशी मजल्याच्या उंच नि हवेशीर हवेलींत केली.

## अपघात कसा झाला ?

याविषयीं लोकांत बरेच गैरसमज आहेत. हवा तो हव्या त्या गप्पा ठोकीत असतो. त्याचें अखेर निराकरण मला केलें पाहिजे.

नाथ जबलपूर आर्टिलरींत नोकरीला होता. लष्करी पेशा; शिकारीचा मनस्वी नाद. बन्दुकीच्या नेमदारींत पक्का नामदार (Correct shot). कांहीं गोऱ्या ऑफिसरांबरोबर रजेमध्यें शिकार करायला सिंहगडावर गेला. बारीकसारीक शिकार पुष्कळ झाली; आणि एका वाघाच्या सुगाव्यानें सगळी पार्टी जागोजाग पांगली. टेहळ्यांच्या नि हाक्यांच्या सावज-हुसकावणीच्या आरोळ्या जसजशा कानीं पडत, त्या धोरणानें प्रत्येक शिकारी आपापल्या रोखानें हालचाल करीत होता. इतक्यांत नाथांच्या समोरून वाघाची डुरकावणी आली. नाथानें दोन कदम पीछे घेऊन एक वाघमार गोळी ठोकली. दुसऱ्या नेमाचें अवसान साधण्यासाठीं आणखी दोन पावलें मागें सरतो तोंच तेथें ६०

फूट खोलीचा कडा तुटलेला ! अजाणतेपणीं झोंक जाऊन नाथाचा तडाड कडेलोट झाला ! बेगुमान आदळतआपटत नाथ कड्याच्या नळाशीं जाऊन बेशुद्ध पडला.

बार ऐकतांच सगळे शिकारी त्या रोखानें धांवतच आले. वास्तविक तो वाघ एका गोळीनें मरण्याइतका नव्हता. आणि बार तर एकच झाला ! मग शिकार निपटली, का शिकारीनेंच शिकाऱ्याची शिकार केली ? अशा प्रसंगीं हीच विवंचना विशेष असते; म्हणून सगळे तत्काळ धावून आले. पाहतात तों नाथ बेपत्ता ! वाघ ठार ! "द्वारकानाथ, द्वारकानाथ, व्हेअर आर यू ?" च्या आरोळ्या हपिसर मारूं लागले. हाके नि टहाळे शोधासाठीं भराभर सैरावैरा धांवले. सुमारें अर्धा तास हीच धावाधाव झाली. अखेर एका हपिसराचें लक्ष सहज कड्याखालीं गेलें, तों नाथ तेथें बेशुद्धावस्थेंत पडलेला. त्या हपिसरानें शिट्या वाजवून सगळ्यांना कड्याखालीं जायचीं सिग्नलें दिलीं. ब्रॅण्डी पाजण्याचा प्रयत्न केला तरी दातखिळी कांहीं केल्या उघडेच ना. कपडे सगळे रक्तानें चिंब भिजलेले. गडाखालीं माणसें पाठवून डोली आणवली. तसाच बेशुद्ध स्थितींत नाथाला डोलींत घालून, चार तासांच्या पायचालीनें पुण्याच्या ससून इस्पितळांत आणलें.

इतक्या मुदतींत ठेचाळणीनें नाथाचें शरीर इतकें तट्ट सुजलें, कीं अंगावरील खाकी ब्रीच सूट, ठिकठिकाणीं बारक्या कात्रीचे छाट घेऊन, चिन्ध्या फाडूनच काढावा लागला. सुमारें ११ तासांनंतर नाथ थोडासा शुद्धीवर आला. तेव्हां सर्वांना थोडें हायसें वाटलें.

या अपघातानें नाथाचा स्पायनल् कॉर्ड (पाठकणा) जन्माचा अधु झाला आणि त्यामुळें कमरेच्या खालच्या भागाला कसलेंच चैतन्य अगर संवेदना मुळींच राहिली नाहीं. मरणापूर्वी कांहीं वर्षे काठी टेकून किंवा कोणाला तरी धरून तो चालत असलेला दिसला, तरी तें चालणें केवळ ढकलणीचें असे.

## गरजवंताच्या गोमाशा

या वर्षादीडवर्षाच्या पनवेलच्या मुक्कामांत नाथानें या दुखण्यापायीं हजारों रुपये खर्च केले. जात्या स्वभावानें कमालीचा सहनशील, उदार आणि मनमोकळा असल्यामुळें, २४ घंट्यांत रोग बरा करणारे ज्योतिषी, मान्त्रिक, देवखेळवे, हिप्नॉटिस्ट, ग्रहदशावाले, एकादशणी–रुद्रमहारुद्रवाले, सारे सगळ्या देवदूतांची सेना पनवेलची यात्रा करूं लागले. मद्रासचे दोन यण्डुगुण्डु मान्त्रिक तर नाथाचा

नांवपत्ता विचारीतच आले. या लोकांना कसा त्याच्या दुखण्याचा वास आला कोण जाणे ! "ब-ब्ब-बब्ब–बारा दिवसांत हिप्प-हिप्प–हिप्नॉटीनें र-र रोंग क-क–काय-मचा बब्ब-बब्ब–बरा" करणारे मुंबईचे एक त-त-त-तोत्रे स-स-सायकोलॉजिस्ट (Psychologist) दीड रुपयांत मिळालेल्या अमेरिकन डिप्लोम्याच्या दिमाखानें नाथांच्या खिशांतून शंभर रुपये काढून गेल्याचें मला माहीत आहे. दररोज कोणी ना कोणी तरी जेठा मारून बसलेलाच. सारांश नाथांचा बंगला म्हणजे भोजराजाचा दरबारच बनला होता. हवें त्यानें यावें, छांछू करावें आणि भरपूर दक्षिणा हबकून पसार व्हावें. याबाबत मी नाथाला फार बोलायचा, कित्येक वेळां त्या मान्त्रिकाची किंवा जोतिष्याचीही खरपूस हजेरी घ्यायचा. पण नाथ उलट म्हणायचा, "अरे मला हें सगळं कळतं. पण आईचा विश्वास आहेना ! तिला कशाला बरं आपण दुखवावी ? कोणाच्याही कोंबड्याच्या आरवण्यानें उजाडलं तरी हवंच आहे ना आपल्याला ? मग या मान्त्रिकतान्त्रिकांच्या होमहवनांत, तूं का आपल्या म्हसोबाला विनाकारण घुमवतोस ?"

## लेखनोपक्रमाचा ओनामा

तसें म्हटलें तर नाथाचें घराणें साहित्यसेवेंत पूर्वीपासूनच मुरलेलें. वडील बन्धु दादा पितळे यांच्या इतका व्युत्पन्न, व्यासंगी, मार्मिक आणि चिकित्सक साहित्यिक मला आजवर दुसरा भेटलाच नाहीं. नाथाला वाचनाचा विलक्षण नाद. पण तें सारें इंग्रजी. दर आठवड्याला खण्डेरावजी (नं. २ बन्धू) मुंबईहून पनवेलला येतांना, इंग्रजी मासिकांचे गठ्ठेच्यागठ्ठे बरोबर आणायचे. नाचणींत गाडून पडल्यावर तरी त्या बिचाऱ्यानें काय करायचें ? जवळ कोणी असलें, तर गप्पागोष्टी विनोद चालायचा. पण कोणीच नसल्यावर मग काय ? वाचनांतच वेळ घालवायचा.

दवाखान्याच्या दूरपणामुळें, लवकरच आत्मारामशेटनीं नाथांच्या बिऱ्हाडाची सोय गांवाबाहेर वडाळा तळ्यावरील आपल्या राजविलासी बंगल्यांत केली. सभोंवार अत्यंत रम्य बगीचा आणि मध्यें बंगला. या ठिकाणीं नाथ वाचनाबरोबर कांहीं सुंदर चुटके, छोट्या गोष्टी मराठींत भाषान्तर करीत असल्याचें एक दिवस मला आढळलें. त्या वाचून मला कौतुक वाटलें. मीं म्हटलें, "नाथा, अरे या गोष्टी मोठ्या छान आहेत रे. कुठं तरी दे कीं, छापायला पाठवून." त्यानें मला ट्रंकेंतून एक पुडकें काढायला सांगितलें. पाहिलें तों सगळ्या **नाकारून साभार परत** आलेल्या गोष्टी ! "असें रे कां ?"

## नांव कां बदललें ?

"बाबा, हा आमचा जातिभेद नडतो आहे जिथें तिथें. लेखक कोण? तर द्वारकानाथ माधव पितळे. त्याला काय लिहितां येतें? द्या फेकून कचरपट्टींत! मनोरंजनाकडे सुद्धां माझ्या गोष्टींची दाद लागत नाहीं."

इतक्यांत टपालवाला आला. त्याला पाहतांच नाथ म्हणाला, "पाहूं बरं माझी युक्ती सक्सेसफुल झाली आहे का?" इतर पत्रांबरोबर नागपुरच्या "महाराष्ट्र वाग्विलास" मासिकाचा अंक होता. तो पटकन् त्यानें फोडून चाळला आणि मोठ्या उमेदीनें म्हणाला, "जितं मया, जितं मया, गोळी बिनतोड लागली." मीं अंक चाळला, त्यांत एका गोष्टीवर

लेखकः—**नाथमाधव**

असें होतें. नाथ म्हणाला, "कां? कशी आहे ही नांवाची युक्ति? नांव बदलल्या-बरोबर सहा महिन्यापूर्वी नाकारलेली गोष्ट बिनचूक प्रसिद्ध होते!"

जात दाखविणाऱ्या **पितळे** आडनांवाची अडगळ झुगारून, **द्वारकानाथ माधव**चा नुसता **नाथमाधव** बनल्यामुळें, नाथांच्या गोष्टी मासिकवाले कधींमधी स्वीकारूं लागले. त्यालाही उत्तेजन मिळालें. वाचनाबरोबरच त्याचा लेखनक्रमही त्यानें वाढवला आणि पनवेलला असतानांच 'सायंकाळची करमणूक' नांवाचें एक गोष्टी-संग्रहाचें पुस्तक त्यानें प्रसिद्ध केलें. या लेखनाच्या कामीं नाथाला मीं जांभळ्या ( Violet ) शाईची जी दीक्षा दिली ती त्यानें आमरण चालविली.

नाथमाधवनें लेखक म्हणून लोकप्रियतेच्या प्रांगणांत पाऊल टाकलें, तरी त्याच्या जातीची पृच्छा साहित्यिक कंपूंत होतच असे. पुष्कळांना पुष्कळ वर्षें तो ब्राह्मण लेखक असावासें वाटे. पण नाथानें किंवा माझ्यासारख्या त्याच्या अनेक स्नेह्यांनीं हें गुह्य फोडण्याचें पाप चुकून सुद्धां केल्याचें स्मरत नाहीं. नाथमाधवाला ब्राह्मण समजून त्याच्या पहिल्यापहिल्या कादम्बऱ्यांवर लांबलचक अभिप्राय देणाऱ्या कांहीं पत्रकारांनीं पुढें कांहीं वर्षांनीं त्याची जात उमगतांच, आपल्या अभिप्रायांची लाम्बी रुन्दी क्षयासारखी रोडावण्यास सुरुवात केली.

एक गोष्ट मात्र सांगणें आवश्यक आहे कीं, आपल्या कादम्बऱ्या आपणच छापून प्रसिद्ध करण्याचा उपक्रम नाथानें केला नसता, तर मराठी साहित्याच्या

द्वारपाळांनीं नाथाची एक ओळसुद्धां प्रकाशांत येऊं दिली नसती. नाथमाधवांचे प्रकाशक म्हणून जी मंडळी मागाहून पुढें आली, ती खुद्द नाथानें आपल्या स्वावलम्बी प्रकाशनानें लोकप्रियता मिळविल्यावर; आधीं नव्हे. पब्लिशर्सनीं नाथमाधवाला उजेडांत आणला नाहीं, नाथानें रेम्याडोक्या चोपड्याविक्यांना प्रकाशक म्हणून ढवळ्याचे पवळे केलें.

## साऱ्या पनवेलला एप्रिलफूल केलें !

इंग्लंडचा यूजिन सॅण्डो मुंबईला आला होता. त्याचे शक्तीचे प्रयोग आणि व्याख्यानें मुंबईत धडाक्यानें चालू होतीं. तो पुण्यास जाणार होता आणि तोही मोटरीनें. त्या वेळीं मोटर म्हणजे परब्रह्म ! पाहण्यासाठीं लोकांची केवढी आतुरता. तशांत मोटरींत बसून सॅण्डो पनवेलमार्गानें पुण्याला जाणार ! "येथें घटकाभर येण्याविषयीं सॅण्डोला मीं पत्र लिहिलें आहे." असें नाथानीं मला सांगितलें होतें. खऱ्याखोट्याची चौकशी मी केली नाहीं.

एके दिवशीं दुपारीं ३ च्या सुमारास नाथाचा एक पोऱ्यानोकर (मोठा चलाख नि बेरकी होता) मला एक चिठ्ठी देऊन झटकन् निघून गेला. "आत्तांच स्पेशल स्टीम लाँचनें यूजिन सॅण्डो येथें बंगल्यांत आले आहेत. अर्धा तास फक्त मुक्काम आहे. मित्रमंडळीसह ताबडतोब यावें." अशाच चिठ्ठया गावांतील आणखी ९।१० जणांकडे पाठविल्या होत्या. चिठ्ठी मिळतांच मी धांवतच निघालों. वाटेंत शाळेंतल्या हेडमास्तरांना बातमी दिली. त्यांनीं गजर वाजवून मुलांना सॅण्डो पहाण्यासाठीं बागेकडे जाण्याची आज्ञा केली; आणि सगळ्या मास्तरांना बरोबर घेऊन तेही निघाले. जो वाटेंत भेटेल त्याला वर्दी देत मी बागेंत पोहोंचलों; पाहतों तों तिथें कोणीच नाहीं. "काय रे नाथा, सॅण्डो कुठं आहे ?"

—आज तारीख कोणती ?—तो.

—एप्रिल पहिली. मग ?—मी.

—मग तुम्ही सारे एप्रिलफूलच नव्हत का ?—तो.

अरे शहाण्या, मीं साऱ्या गांवांत ही बोंब केली, सारा गांव इथं आतां कोसळेल. त्याची काय वाट ?—मी.

—वाट धरावी घरची. आधीं तूं एका कागदावर "**एप्रिलफूल आहांत तुम्ही**" अशी ठळक अक्षरांची पाटी करून लाव या दरवाजावर. पुढचें पुढें—तो.

मी तशी पाटी करून लावली. झालें. शाळेंतलीं मुलेंमुली, गावांतले निमंत्रित पाहुणे, बरोबर आणखी १५०-२०० इतर–सगळा गांव आला बागेंत !

कुठं आहे सॅण्डो ? कुठं आहे सॅण्डो ? अशा आरोळ्या चालू झाल्या. नाचणीच्या पेटींत गाडलेला नाथ प्रत्येकाला हसतहसत सांगे, "तो पहा दरवाजावर टांगला आहे ! "

एप्रिलफूलची कल्पना पनवेलकरांसारख्या खेडवळांना कुठली ?—आणि मला तरी कुठली ? पण ती आम्हां सगळ्यांना नाथांनीं अशी कांहीं ठसठशीत शिकवली, कीं ती आमरण स्मरणांतून जाणार नाहीं.

शेंकडों आठवणींपैकीं या थोड्याशा आठवणी माझ्या दिवंगत दिल्दार नाथाच्या समाधीवर पुष्पांजली म्हणून मी वाहत आहें. नाथांचें समग्र चरित्र लिहिण्याचा योग आला, तर मला पुष्कळच लिहितां येईल; तथापि सध्यां त्रोटक आठवणीच का होत ना, मधून मधून कोठें ना कोठें प्रकाशित करीन, एवढेंच सांगून, या पुष्पांजलीचा आग्रह करणारे श्री. आप्पाराव कुळकर्णी या माझ्या सहकारी मित्राचे आभार मानून मी इतर कार्याकडे वळतों.

---

## तरुणांस स्वावलंबनाचा संदेश

"नाथमाधव हे कादंबरीकार तर होतेच; परंतु इतिहासकार या नात्यानेंही त्यानीं उत्कृष्ट कामगिरी बजाविली यांत शंका नाहीं. मनरंजनाबरोबरच इतिहासाच्या खऱ्या ज्ञानानें महाराष्ट्रीयांचीं मनें सुसंस्कृत करणें हेंच ध्येय त्यानीं आपल्या पुढें ठेविलें होतें. ते स्वतः पंगू होते; परंतु अखिल राष्ट्रांतील तरुणांनीं आपापल्या पायांवर उभे राहून राष्ट्रोद्धाराचें कार्य करण्यास पुढें यावें, हीच त्यांची सदैव इच्छा होती."

१९२८ —प्रो. शिवरामपंत परांजपे

# नाथांची लढाऊ वृत्ति

[ ९ ] ( लेखकः—श्री. **पी. आर्. लेले,** बी. ए., एल्एल्. बी. )

## कै. तात्यासाहेब कोल्हटकर व नाथमाधव

सन १९५२ च्या नाताळमधली गोष्ट. कै. तात्यासाहेब कोल्हटकर खामगांवाहून 'वधूपरीक्षा' नाटक लिहिण्यासाठीं मुंबईस आले होते. 'वधूपरीक्षा' नाटक कोल्हटकरांनीं माझ्याच बिऱ्हाडीं राहून लिहिलें. नाटक लिहून पुरें झाल्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं तात्यासाहेबांनीं नाथमाधवांना भेटावयाचें ठरविलें होतें. त्याप्रमाणें स्नान वगैरे आटोपल्याबरोबर आम्ही माझ्या प्रिन्सेस स्ट्रीटवरील बिऱ्हाडांतून बाहेर पडलों, आणि व्हिक्टोरियांत बसून नाथमाधवांच्या निवासस्थानापर्यंत गेलों.

वेळ सकाळची साडेआठ आणि नऊच्या दरम्यानची होती. तोंपर्यंत मी नाथमाधवांना कधींहीं पाहिलेलें नव्हतें. त्यामुळें कोल्हटकरांच्या बरोबर मीही नाथमाधवांच्या भेटीला गेलों. आम्हीं खोलींत पोहोंचल्यावर नाथमाधव कोल्हटकरांना पाहतांच त्यांचें स्वागत करण्यासाठीं जणूं काय उठताहेत असेंच मला वाटलें. नाथमाधवांच्या शारीरिक व्यंगाबद्दल मला तोंपर्यंत माहिती नव्हती. तात्यासाहेबांना ती माहिती असली पाहिजे. त्यांनीं झटकन पुढें जाऊन खुर्चीवर बसलेल्या नाथमाधवांचा हात धरला आणि नंतर एका खुर्चींत तात्यासाहेब बसले. खोलींत पसरलेल्या प्रशस्त बैठकीवर मी बसलों. या वेळीं मला प्रथम समजलें, कीं नाथमाधव पायानें अधु झालेले होते.

हें घर म्हणजे गिरगांव बॅकरोड आणि कांदेवाडी एकमेकांना ज्या ठिकाणीं मिळतात, तेथें असलेला पितळ्यांचा बंगला होय. हा बंगला जुन्या पद्धतीचा असून, त्या बंगल्यासभोंवती हल्लीं दुर्मिळ झालेलें असें उद्यान आहे. नाथमाधव या घरांत पहिल्या मजल्यावर आपल्या लेखनाच्या खोलींत बसलेले होते. त्यांची खुर्ची डॉक्टरच्या खुर्चीसारखी फिरती ( Revolving ) होती. असली खुर्चीसुद्धां वापरण्याचें कारण त्यांच्या पायांचें व्यंगच असलें पाहिजे.

त्यांच्या चेहऱ्यावर पाहतां ते सुदृढ प्रकृतीचे दिसत होते. ते मोकळ्या वृत्तीनें स्पष्ट आवाजांत–जरा मोठ्यानें म्हटलें तरी चालेल, बोलत होते. त्यांचा बोलण्याचा त्या वेळचा विषय कोणत्याही विशिष्ट स्वरूपाचा नव्हता. आंत गेल्यापासूनच मला नाथमाधव कौतुकानें पाहण्याची एक व्यक्ति होऊन बसले होते. कोल्हटकर त्या कालांत मुंबईस आले म्हणजे आपल्या परिचित मित्रांना भेटण्याचा–अर्थात् सवडीप्रमाणें–प्रयत्न करीत असत. त्यांतून नाथमाधवांना बाहेर पडणें शक्य नसल्यामुळें त्यांना भेटणें हें कोल्हटकरांना एक अगत्याचें कर्तव्य वाटणें साहजिक होतें. दोघांमध्यें चाललेल्या गोष्टी सर्वसाधारण प्रतीच्याच होत्या. विषय मात्र बहुतेक वाङ्मयासंबंधींचेच येत होते.

## नाथमाधवांस पाहून काय वाटलें ?

नाथमाधवांना पाहून मला जें वाटलें तें या ठिकाणीं मला सांगावयाचें आहे. मी प्रथमतः जरासा आश्चर्यचकितच झालों होतों, ही गोष्ट नमूद केली पाहिजे. हळूहळू माझ्या मनावरचा आश्चर्याचा पगडा दूर होऊं लागला. मला स्वतःला संभाषणांत मुळींच भाग घ्यावयाचा नसल्यामुळें श्रोता आणि द्रष्टा या भूमिका एकाग्रपणें करतां येत होत्या. त्या वेळीं नाथमाधवांच्या व्यंगाचें कारण मला समजलें नव्हतें; तें कारण कळल्यानंतर माझ्या मनांत थोड्या निराळ्या कल्पना आल्या; पण प्रथमच्याच भेटींत माझ्या मनावर एवढा परिणाम झाला कीं, त्यांच्या पायांतल्या व्यंगामुळें त्यांची कल्पनाशक्ति आणि लेखनशक्ति पुष्कळशी वाढली असली पाहिजे. साधारणपणें आपला असा अनुभव आहे कीं, ज्या व्यक्तीचें एखादें इंद्रिय विशेष अधु असतें त्या व्यक्तीचीं दुसरीं इंद्रियें जास्त तीक्ष्ण होतात. या नियमाचें प्रत्यंतर १०।१५ मिनिटांच्या निरीक्षणानें नाथमाधवांच्या रूपानें मला मिळालें.

यानंतर मला 'वधूपरीक्षा' नाटकासंबंधीं कांहीं कामानिमित्त यशवंतराव टिपणीसांच्याकडे जावयाचें असल्यामुळें मी निघून गेलों. तात्यासाहेब कोल्हटकर नाथमाधवांशीं बोलत बसले.

## योद्धा व लेखक

यानंतर जवळजवळ पांच वर्षांनीं पुण्याच्या बाळासाहेब घोरपड्यांकडून मला नाथमाधवांची हकीकत समजली. ज्या कांहीं गोष्टींचा प्रथमदर्शनीं मला उलगडा होऊं शकला नव्हता, अशा गोष्टींचा उलगडा या माहितीमुळें झाला. नाथमाधवांनीं

मराठ्यांच्या मर्दुमकीच्या विषयावर अनेक कादंबऱ्या लिहिलेल्या आहेत. आपल्या हृदयांत असलेली लढाऊ वृत्ति शारीरिक सामर्थ्यामुळें हृदयांतल्या हृदयांतच दाबून ठेवावी लागली. कृतीच्या स्वरूपांत जिचें आविष्करण करतां आलें नाहीं, ती लढाऊ वृत्ति त्यांच्या कादंबऱ्यांतून ऐतिहासिक योद्ध्यांचें वर्णन करतांना जनतेच्या दृष्टोत्पत्तीस आली.

प्रत्येक योद्धा चांगला लेखक असतोच असें नाहीं. त्याचप्रमाणें लढाईचें उत्तम वर्णन करणारा लेखक प्रत्यक्ष लढाईची वेळ आली तर लढेल किंवा नाहीं, हें सांगणें फार कठीण आहे; पण जो जात्या लढवय्या तो जर कांहीं कारणानें लेखक झाला तर मात्र लढाईबद्दल, मर्दुमकीच्या कृत्याबद्दल अधिकारी वाणीनें अत्यंत परिणामकारक असेंच वर्णन करील, अशी खात्री बाळगायला हरकत नाहीं. ज्याला याबद्दल पुरावा पाहिजे असेल, त्याच्यापुढें नाथमाधवांचेंच उदाहरण ठेवतों.

## लढाऊ वृत्तीचा साठा

लेखणीला तरवारीची उपमा देतात. नाथमाधवांच्या पुरती ही उपमा असामान्य अशा तऱ्हेनें सार्थ झाली. ज्या हातांत शत्रूच्या हृदयांतलें रक्त सांडणारी तलवार तळपावयाची त्या हातांत नाथमाधवांना हृदयाला आकर्षण करणारी लेखणी धरावी लागली. जी कृति आपल्या हाताखालच्या सैन्यासह त्यांनीं केली असती, ती अथवा तसली शौर्याची कृति आपल्या पूर्वज मराठ्यानीं कशी केली याचें वर्णन आपल्या लेखणीनें त्यांनीं केलें. कृतीच्या स्वरूपांत लढण्याचा उत्साह निघून गेला असल्यामुळें उत्साहाचा साठा जणूं त्यांच्या हृदयांत तुंबून राहिला होता. प्रत्यक्ष रणांगणावर जाऊन युद्धाचे डावपेंच करण्याची संधि न मिळाल्यामुळें त्यांना आपल्या कल्पनाचक्षूंपुढेंच निरनिराळे युद्धप्रसंग खेळवून त्यांत आपल्या पूर्वज वीरांनीं केलेले डावपेंच कल्पनेनेंच पाहावे लागत असत. अशा तऱ्हेनें वृद्धिंगत झालेल्या त्यांच्या कल्पनाशक्तीचा प्रभाव आपल्याला त्यांच्या कादंबऱ्यांत पाहावयास मिळतो.

नाथमाधवांची लढाऊ वृत्ति त्यांच्या आयुष्यांत स्पष्ट दिसत होती. शरीर दुबळें झालेलें असूनही, ते केव्हांही मनानें डगमगले नाहींत, इतकेंच नव्हे, तर त्यांचे पाय अधु झालेले होते हें लक्षांत घेतां त्यांची शरीरप्रकृतीसुद्धां त्यांनीं अतिशय चांगली ठेवली होती, असेंच कबूल करावें लागतें. पायांत असलेल्या कमीपणाचा वचपा

वरच्या भागाच्या सुदृढतेनें त्यांनीं भरून काढल्यामुळें त्यांच्या कल्पनेची आणि त्यांच्या लेखनव्यवसायी हातांची शक्ति जणूं काय दुणावली होती. त्यांची आनंदी वृत्ति ही तर त्यांच्या लढाऊ वृत्तीची सर्वांत उत्तम साक्ष होती.

## अत्युच प्रतीचा आदर

बाळासाहेब घोरपड्यांकडून नाथमाधवांच्या अपघाताची हकीकत कळल्यानंतर सरासरी सहा महिन्यांनीं नाथमाधवांना आणखी एकदां पाहण्याचा मला योग आला होता. मुंबईस बॉम्बे थिएटरमध्यें आर्यावर्त नाटक मंडळी आपले खेळ करीत होती. रविवारीं त्यांचा एक प्रयोग चाललेला असतांना कोणा तरी एका मित्राच्या खांद्यावर हात टाकून नाथमाधव स्टेजच्या बाजूच्या रिकाम्या जागेंत आले. त्यांचें येणें अनपेक्षित होतें. परंतु तसेंच निकडीचें काम असल्यामुळें आप्पा टिपणीसांच्या भेटीला ते आले होते. त्यांना आलेले पाहतांच टिपणीसांना आश्चर्य वाटलें आणि त्यांनीं सखेद माफी मागितल्यासारखें केलें. या वेळीं नाथमाधव ज्या मोकळेपणानें हसले आणि त्यानंतर ज्या उल्हसित वृत्तीनें ते बोलत होते, त्यामुळें त्यांच्या शारीरिक क्लेशाबद्दल इतरांना खेद वाटण्याचें कांहींच कारण नाहीं असें वाटूं लागलें. विपद्ग्रस्त मनुष्य पाहून निर्घृण माणसालासुद्धां कळवळा येतो. साधारण माणसाला कळवळा येतोच येतो आणि तो आपली सहानुभूति दर्शविण्याचा प्रयत्न करतो. या सहानुभूतींत-इंग्रजींत ज्याला ( Pity ) म्हणतात आणि ज्याचें मराठींत आपण कींव असें भाषांतर करतों तिचा भाग असतो. मानी माणसाला ही कींव शल्यासारखी बोचते. ज्या वेळीं विपद्ग्रस्त मनुष्य असामान्य धैर्यानें आपत्ति सहन करतो आणि आपल्या वृत्तीनें त्या आपत्तीचें अस्तित्वच झांकून टाकतो, त्या वेळीं पाहणाराला स्वतःचीच लाज वाटते आणि मनांत कींव यायच्याऐवजीं परमादराची भावना उत्पन्न होते. बॉम्बे थिएटरमध्यें त्या वेळीं हजर असणाऱ्या दरेकाच्या मनाची अशीच स्थिति झाली असली पाहिजे. निदान माझ्या मनांत तरी त्यांच्याबद्दल अत्युच प्रतीचा आदर त्या वेळीं उत्पन्न झाला आणि त्यांना मी पाहण्याची ती शेवटली वेळ असल्यामुळें माझ्या मनांत तीच भावना आजतागायत वसत आहे.

---

# नाथांचें कादंबरीलेखन

[ १० ] ( लेखकः— श्री. **विठ्ठल वामन हडप** )

मनुष्याच्या आयुष्यांत कांहीं कांहीं वेळा अशा आणीबाणीच्या ( Crisis ) येतात कीं, त्या वेळचे अनुभव त्या मनुष्याच्या मनावर जो ठसा उमटवून ठेव-तात, तो कांहीं केल्या पुसला जात नाहीं. अशीच एक आणीबाणीची वेळ माझ्या वयाच्या पंधराव्या वर्षी माझ्या आयुष्यांत आली होती; व त्यावेळीं नाथांची व माझी भेट होऊन त्यांनीं मला धीर, प्रोत्साहन—फार काय, द्रव्यसाहाय्यही हस्तें परहस्तें मिळवून दिलें.

ती वेळ मुंबई येथें मिरज-संस्थानाधिपतींच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या महा-राष्ट्र साहित्यसंमेलनाच्या सुमाराची होती. मी तेव्हां नुकताच एका वर्षापासून 'लेखक' होऊं लागलों होतों. दारिद्र्यामुळें व इतर अनेक अडचणींमुळें घरीं राहण्याची देखील सोय नाहीं, म्हणून 'जिकडे पुढा तिकडे मुलूख थोडा' या न्यायानें मी जो घरून निघालों, तो प्रथम नाथांकडेच यावयाचें कारण-आतां कारण काय व कसें सांगूं? ज्या वेळीं आपणाला कोणी ओळखीत व मानीत नसतें त्या वेळीं थोरांनीं आपणाला ओळखावें व मानावें असें कोणा महत्त्वाकांक्षी माणसाला वाटत नाहीं? पोरसवदा लेखक या नात्यानें मलाही तेव्हां तसें वाटे. म्हणून मी 'लेखक' आहें या बळावर तेव्हां ज्या कांहीं थोर लोकांशीं ओळख करण्याचा प्रयत्न पत्रद्वारें केला, त्यांपैकीं किती थोरांच्या थोरवीचे दिसावयाला ढबदार दिस-णारे ढब्बू, माणुसकीच्या नाणेबाजारांत चालवून पाहतां शिवराई निघाले, तें कटुसत्य इथें कशाला बोलूं? सुवर्णाचे तुकडे असे तेव्हां दोनच हातीं लागले. पैकीं एक नाथ, आणि दुसरे 'स्वामी रामतीर्थ' कर्ते कै. भास्कर विष्णु फडके.

हें कौतुकानें येथें सांगण्याचें कारण, माझी आणि वरील दोघांही महाभागांची ओळख, मी एक मध्यम वयाचा व बायकोमुलांचा संसार हांकणारा लेखक आहें अशी पत्रानें मीच त्यांना करून दिली होती. वयाच्या पंधराव्या वर्षी पत्रांतून

एकदम एवढा मोठा संसारी माणूस बनण्याचें कारण, त्यापूर्वी मी आणखी कांहीं जाड्या लेखकांकडून ओळखीची अपेक्षा केली असतां, व त्यांनीं माझ्या पोरसवदा लेखनकमालीचें कौतुक करावें अशी माझी अपेक्षा असतां, माझा पोरपणा माझ्या हेटाळणीला कारण झाला होता. म्हणून मी नाथांशीं परिचय करतांना पत्रद्वारा मध्यम वयाचा गृहस्थ बनलों आणि गृहस्थ संसाराशिवाय आहे असें समजतांच लोक हंसतील या अंगच्याच भीतीनें मी पत्रद्वारां बायकोमुलांचा संसार थाटला. पण पुढें प्रत्यक्ष भेट झाली, तेव्हां माझ्या पोरपणांतील लेखनजिज्ञासेचें पत्रांतल्यापेक्षांही अधिक कौतुक करणारे व मला हात देणारे नाथ हेच पहिले महाभाग !

असें असूनही नाथांपासून मीं वाङ्मयविषयक असा कोणताच गुण उचलला नाहीं, आणि माझ्या वाङ्मयावर भलेंबुरें जें काय असेल, त्यावर नाथांची छाया पडलेली नाहीं, याला कारणें माझी अनुकरणाविषयीं अप्रीति. आम्हां दोघांच्या स्वभावांतील भिन्नता, आणि अगदीं प्रथमच मला जगांत दुर्मिळ वाटणाऱ्या माणुसकीचा नाथांच्या ठायीं झालेला नितान्तरम्य साक्षात्कार, हीं होत.

मौज पाहा ! ते जितके प्रेमळ तितकाच मी तुसडा. ते महासागराप्रमाणें शांत व मी धगधगणाऱ्या अग्नीप्रमाणें तामसी. वय पाहतां पितापुत्राचें नातें शोभावें इतका आम्हां दोघांच्या वयांत फरक. मला तेव्हां गुरु नको होता, तर जिव्हाळ्याचा आसरा पाहिजे होता. तो आसरा मला नाथांत इतका अमूप मिळाला कीं, या कुबेराचा आसरा मिळाल्यावर कोरान्नावर मी पोट कां म्हणून भरावें ? माणुसकी हीच कुबेरसंपदा होय, व विद्वत्ता, कलानिपुणता वगैरे त्या कुबेराकडून इतरांना मिळणारें कोरान्न होय, असेंच मीं समजतों. असले कुबेर घरोघर भेटत नसतात.

नाथांच्या कोमल व हळुवार मनाची एक साक्ष म्हणजे त्यांची 'दैवाचे खेळ' कादंबरी होय. सदर कादंबरीला अनुसरून मी म्हणतों, नाथांचें पूर्वोक्त 'पात्रिक' ऋण माझ्या कातड्याचे जोडे करून नाथांच्या पायांत घालण्यानें देखील जरी फिटण्यासारखें नव्हतें, आणि मीही जरी तें ऋण फेडण्याची धास्ती कधीं बाळगली नाहीं, तरी मला नकळत तें ऋण निमित्तमात्र रूपानें अप्रत्यक्ष अत्यल्पांशानें तरी फिटलें, असा डौल तरी मीं डौलानें मिरवतों. 'दैवाचे खेळ' या कादंबरीची प्रेरणा नाथांना मुख्यतः माझी साहित्याच्या निबिड अरण्यांत तेव्हां 'प्रकाशक' या जातीच्या हिंस्र प्राण्याकडून होत असलेली नानाविध छळणूक पाहूनच झाली-

स्वतःच्या अंतरींचीं दुःखें ओकून हायसें म्हणावयाला मला निदान १९२० सालापावेतों तरी नाथांच्या घराखेरीज समव्यवसायित्वाच्या दृष्टीनें दुसरी जागा नव्हती.

तेव्हां मी नाथांपाशीं गायिलेल्या रडकथांनीं त्यांचें मन किती दुःखी होत असे, तें त्यांचे ते जाणोत. त्यांच्याइतका प्रेमळपणा माझ्याठायीं नसल्यानें मला ती कल्पना करतां येणार नाहीं. पण ते माझे अनुभव नाथांना 'दैवाचे खेळ' सांगतांना उपयोगी पडले. अमेरिकेंतल्या गोऱ्या लोकांना निग्रोंचे हाल हाल करण्यांत मौज वाटते, तशी मौज आजवर माझ्याशीं प्रत्यक्ष थोडाफार परिचय असणारांनीं व नसणारांनींही स्वतःच्या जन्मजात दुष्ट बुद्धीच्या प्रेरणेनें माझा उत्कर्ष सहन न झाल्यामुळें नाटक-कादंबऱ्यांतून माझी मनसोक्त विकृत निंदा करतांना अनेकांना वाटली आहे. त्याला अपवाद नाथ हे एकच होत.

नाथ हे खरे कर्मयोगी होते. गीतेचा व इतर अध्यात्मग्रंथांचा नाथांचा व्यासंग सखोल होता; व गीतेंतील लोकमान्यप्रणीत कर्मयोग त्यांना फार प्रिय होता. म्हणूनच मी स्वतः गीताबोधाचा खरा चाहता नसतांही गीतेंतील उत्तम व यथार्थ विशेषणानेंच इथें नाथांना संबोधीत आहें.

संसार असें रूढार्थानें आपण ज्याला म्हणतों, तो वैवाहिक संसार व परिवार नाथांच्या मागें नव्हता. ते आजन्म अविवाहित होते. प्रामाणिकपणें ब्रह्मचर्य पालन करण्याला अनुकूल अशी नाथांची मनोवृत्ति नीरस-शुष्क मुळींच नव्हती. पण अकालीं अपघातामुळें त्यांना विवाह करणें अनुचित वाटलें असावें. अशा अतृप्त वासनांच्या आंचेनें करपलेल्या मनोवृत्तीचा माणूस इतका आनंदी, कर्मनिरत व आशावादी-विकासक्षम असूं शकतो, ही गोष्ट सामान्य नव्हे.

नाथ स्वतः संसारी नसले तरी अनेकांचे संसार सुखाचे होण्यासाठीं अनेकदां अनेक प्रकारें ते झीज सोशीत असत. त्यांच्या त्या बैठकीच्या लहानशाच पण टापटिपीच्या व स्वच्छ खोलींत ज्या कोचावर व लोखंडी पलंगावर मोठमोठे नामवंत व मानवंत साहित्यिक येऊन नाथांशीं मनमोकळेपणानें निरनिराळ्या विषयांवर चर्चा करतांना दिसत, तेथेंच माझ्यासारखे 'कोणी तरी' बसून त्यांच्याशीं गप्पागोष्टी करीत, तेथेंच विडी-पान-तंबाकूसारखे साहित्यिकांच्या दृष्टीनें हलके वाटणारे व्यवसाय करणारे लोकही नाथांकडून कांहींना कांहीं हितबोध घेण्यासाठीं येऊन बसलेले व नाथांशीं अगदीं खेळीमेळीनें वागत असलेले दिसत. आणि ज्या नाथांना

मी एकाद्या गंभीर विषयावरील लेखनवाचन करतांना पाहिलें आहे, त्यांनाच अशा गोरगरीब अथवा गरजू धंदेवाल्यांचे हिशेबठिशेब लिहून अथवा तपासून देतांनाही पाहिलें आहे.

'To be great is to be misunderstood' अशी इंग्रजींत एक म्हण आहे. तिला अनुसरून नाथांच्या ह्या थोर समवृत्तीचा विपर्यासही झालेला एकदोनदां माझ्या निदर्शनाला आलेला आहे. नेहमीं नाथांच्या बैठकींत बसणाऱ्या व त्यांच्या स्वभावाचा पूर्ण परिचय असलेल्या एकदोघां जबाबदार लोकांकडून मी अशाही शंका ऐकल्या आहेत कीं, ह्या धंद्यांत नाथांची भागीदारी तर नसेल ना ? अर्थात् असल्या कुत्सित शंका नाथांसारख्या थोर साहित्यसेवकाविषयीं साहित्यिकांखेरीज दुसरे कोण घेणार ?

याहीपेक्षां नाथांच्या कर्मयोगाचें उदाहरण म्हणजे त्यांनीं आपल्या बंधूंच्या हयातींत व पश्चात् देखील त्यांच्या परिवारासाठीं सोसलेले कष्ट होत. नाथांच्या हयातींत त्यांचे बंधु कालवश झाले, व त्यांची पत्नी आणि चार पांच मुलें यांच्या प्रतिपालनाचा भार नाथांवर पडला.

शरीरानें नाथ दुबळे, वस्ती मुंबईच्या खर्चिक मायानगरींतली, परिवार एवढा मोठा, आणि या सर्वांचा योगक्षेम केवळ लेखणीच्या जोरावर चालविण्याची पाळी जेव्हां नाथांवर आली, तेव्हां त्यांचे काय हाल झाले असतील व त्यांतही प्रकाशकांनीं आपल्या सर्वसामान्य शिरस्त्याला अनुसरून त्यांचे काय हाल केले असतील, याची कल्पनाच करावी.

आणि अशा स्थितींत देखील स्वतःचें मन आनंदी राखून आपल्या चिंतेची झळ आपल्या परिवाराला व इष्टमित्रांना यत्किंचित् लागूं द्यावयाची नाहीं, ही नाथांची वृत्ति पाहून काय वाटे, तें मी शब्दांनीं कसें वर्णन करूं ?

माझ्या जन्मजात स्वभावानुसार पुढें पुढें कादंबरी लेखनाविषयीं नाथांशीं माझे कधीं कधीं चांगलेच शब्दकलह होत. उदाहरणार्थ एकदां नाथांच्या टेबलावर मी त्यांच्या नवीन कादंबरीचा सांगाडा पाहिला. त्यांची कादंबरी लिहिण्याची पद्धत अशी असे कीं, ते प्रथम कथानकाचा प्रकरणवार सांगाडा लिहून काढीत. अर्थात् त्यासाठीं त्यांना कथानकाचा स्थल-कालनिर्णय प्रथमच करावा लागे. प्रकरणांच्या सांगाड्याबरोबरच त्यांचा त्याविषयींचा एक नकाशाही आगगाडीच्या मार्गाच्या नकाशासारखा

रेखाटलेला समोर तयार असे. आणि गुलाबाच्या लगद्यांत साखर वगैरे मिसळून व्यापारी मागाहून गुल्कंद तयार करतात तशीं वर्णनें व संभाषणें यांची मुळच्या आराखड्याला जोड देऊन ते कादंबरी लिहून काढीत. अशानें कादंबरी बांधेसूद तयार होते, असें नाथ म्हणत; व कादंबरीच्या तंत्राचे साचे करणारे साहित्यशास्त्रीहि बहुतेक असेंच म्हणतात. पण माझा या पद्धतीवर विश्वास नव्हता व नाहीं. म्हणून मीं त्या दिवशीं तो नाथांचा कादंबरीचा सांगाडा पाहून त्यांना विचारलें, "नाथ, आतां यांत फक्त पेंढा भरावयाचा तेवढा शिल्लक आहे ना?"

"म्हणजे?" त्यांनीं मला हंसून विचारलें. रागावणें त्यांना सहसा माहीतच नव्हतें; आणि माझ्या बाबतींत रागावून कांहीं उपयोग होणार नाहीं, हेंही त्यांना माहीत होतें.

मी नाथांना म्हणालों, "अशा सांगाडेवजा लेखनांत पेंढाच भरतां येईल. जीवन कसें उत्पन्न करतां येईल?"

यावर नाथ म्हणाले, "कादंबरी हा कल्पनेचाच खेळ असतो ना? कल्पनेनें असें सुसंगत कथानक आपणाला सुलभपणें निश्चित करतां येतें."

पण मला तें पटलें नाहीं. मी म्हणालों, "समजा, मी उद्यां एखाद्या सभेंत भाषण करावयाला निघालों. भाषणाची सर्व तयारी केली, आणि वर्तमानपत्राला देण्यासाठीं त्याचा अहवालही लिहून बातमीदाराकडे आगाऊ दिला; पण मी सभागृहाकडे जातां जातां मला मोटारचा अपघात झाला तर? अथवा माझें भाषण माझ्या सभत माझ्या विरोधकांनीं होऊंच दिलें नाहीं तर?"

तो दिवस लोकमान्य टिळक वारल्यानंतर दोन तीन आठवड्यांनंतरचा होता. कै. अच्युतराव कोल्हटकरांनीं लोकमान्यांच्या निधनानिमित्त शांतारामाच्या चाळींत भरलेल्या सभेंत भक्तिभावानें भाषण करण्याची सदिच्छा दर्शविली असतां पूर्वग्रहदूषित अशा लोकमान्यांच्या कांहीं अंधभक्तांनीं कै० कोल्हटकरांविरुद्ध तेव्हां इतका गिल्ला केला कीं, अखेर मौ० शौकतअल्लींनीं कोल्हटकरांना आपल्या गजदेहानें सांवरलें व मोटारींत आणून बसविलें, म्हणून अपघात टळला. (तेव्हां त्या अंधभक्तांच्या चिडखोर मूर्खपणांत माझाही वांटा होता. माझ्या 'लोकशाही' पत्राचा पहिला अंक त्याच दिवशीं म्हणजे लोकमान्यांच्या निधनाच्या नवव्या दिवशीं त्या सभेच्या वेळींच प्रसिद्ध झाला होता, व त्यांत अच्युतरावांविरुद्ध लोकांना चिथावणी मिळेल, असा बराच जळजळीत मजकूर मी भावनावशतेच्या भरांत लिहिला होता. ही

माझी चूक म्हणून मी येथें ओघानें कबूल करीत आहें.) तें अच्युतरावांचें उदाहरण देऊन मी नाथांना विचारलें, "अच्युतरावांची जाज्वल्य टिळकभक्ति व ओघवान् वक्तृत्व ध्यानीं घेऊन आपण जर त्यांच्या त्या सभेंतील भाषणाच्या परिणामाची कल्पना केली असती, तर ती प्रत्यक्ष अनुभवानें किती खोटी ठरली असती ?"

"यावरून तुला सिद्ध तरी काय करावयाचें आहे ?" नाथांनीं मला विचारलें. मीं लेखक झाल्यापासून माझ्याशीं अरेतुरेच्या आपुलकीच्या भाषेनें बोलणारे नाथ हेच माझे एकुलते एक गुरुतुल्य हितेच्छु होते.

मी नाथांना म्हटलें, "कथानकाची स्वाभाविक व परिणामकारक प्रगति जर व्हावयाची, तर एक प्रकरण पूर्ण लिहून झाल्यावर त्यांतील पात्रांची व प्रसंगांची जी काय रचना झाली असेल, त्या धोरणानें पुढील प्रकरण मगच आंखतां अथवा लिहितां येतें. तेथवरचा टप्पा गांठल्याखेरीज पुढील मार्ग आपणाला कसा दिसणार ? कादंबरी हा कल्पनेचा खेळ खरा; पण कल्पना, आणि कल्पनाविकासांतून निर्माण होणाऱ्या प्रत्यक्ष घटना यांत अंतर कधींच पडत नाहीं का ?"

माझ्या संभाषणाचा रोख असा होता कीं, आपणाला आपल्या रोजच्या प्रत्यक्ष आयुष्यांत देखील भविष्यकाळ जर निश्चित ओळखतां येत नाहीं, तर काल्पनिक कथानकांतील पात्रांचा भविष्यकाळ तीं पात्रें कथानकाच्या ओघानें त्या प्रत्यक्ष स्थितीच्या जवळ जवळ जाऊन पोहोंचेपावेतों कसा ओळखतां येईल ?

असें म्हणून मी तेव्हा नाथांच्या लेखनशैलीला ठोकळेशाहीची लेखनशैली म्हणून समक्ष पुष्कळच नांवें ठेवलीं.

कोणताही सात्त्विक वृत्तीचा व सहृदय मनुष्य सहसा वादविवादकुशल नसतो. नाथही वादविवादकुशल नव्हते. ते गुणप्रधान वृत्तीचे होते, व मी बुद्धिप्रधान वृत्तीचा आहें-असें तेही म्हणत. त्यामुळें त्यांनीं तेव्हां माझें मन वादविवादानें दुखविलें नाहीं. ते तेव्हां एवढेंच म्हणाले, "माझी ही कादंबरी पुरी लिहून झाल्यावर तूं वाचून पाहा, आणि मग आपण या विषयावर बोलूं."

नाथांची ती कादंबरी कोणती हें मला आतां नक्की आठवत नाहीं, व ती वाचून तिच्यावर वादविवाद करण्याची वेळही पुढें आली नाहीं; परंतु भावनावशतेच्या भरांत आधीं कटु सत्य बोलून जावयाचें व मागाहून पस्तावत बसावयाचें, या माझ्या नेहमीच्या वृत्तीनुसार मी बिऱ्हाडीं गेल्यावर माझी आवडती असी नाथांची 'विहंगवृंद' कादंबरी वाचून पाहिली, व तिच्यांत जेव्हां मला ठोकळेबाजीचा

मागमूसही सांपडला नाहीं, तेव्हां मीं मनांतल्यामनांत कबूलही केलें कीं, निर्विकार अशा विचारी वृत्तीनें कुशल कल्पक कादंबरीकार जर कथानकांतील पात्रांचा व प्रसंगांचा अखेरपावेतों विचार करूं लागला, तर तो आपल्या आंगच्या द्रष्टेपणाच्या जोरावर अचूक अनुमानें काढूं शकतो. इतकेंच काय, पण कल्पनाशक्तीचा व प्रतिभेचा खरा विलास तेथें हटकून प्रत्ययाला येतो.

हें मीं नाथांपाशीं मग कबूल करून त्यांची क्षमा मागितली, तेव्हां ते हसून मला म्हणाले, "हें मला माहितच होतें. म्हणूनच तुझ्या अभिनिवेशात्मक संभाषणाचे कांटे मला बोंचले नाहींत.

---

## कादंबरी व शास्त्रीय विषय

समाज जर कादंबऱ्याच वाचतो तर ह्या कांदबऱ्यांतून निरनिराळे शास्त्रीय विषय प्रतिपादन करून समाजाची करमणूक करतां करतां त्या कादंबऱ्यांतूनच त्यांच्याकडून शास्त्रीय विषय वाचवून घ्यावा. करमणुकी बरोबर ज्ञानलाभ करून देणारी कादंबरी वाङ्मयांत केव्हांही उच्च समजली जाईल. आज जर समाजाचा कल कादंबऱ्या वाचण्याकडे आहे, तर जबाबदार लेखकांनीं आपल्या आवडीचा विषय सुंदरशा कथानकांत गोवून कादंबरीच्या रूपानें जर तो समाजापुढें ठेविला तर किती तरी फायदा होणार आहे. समाज शास्त्रीय ग्रंथ वाचण्यास जर खुषी नाहीं, तर एकादा जाणता चाणाक्ष वैद्य ज्याप्रमाणें कडू औषधाला साखरेचें पूट देऊन हट्टी रोग्याला तें औषध खाववितो, त्याचप्रमाणें शास्त्रीय विषय कादंबरीरूपानें समाजास वाचण्यास लाविले पाहिजेत.

१९२०

—नाथमाधव

# लेखक व प्रकाशक यांचे संबंध

[ ११ ]  ( लेखकः— श्री. गणेश महादेव वीरकर )

कै. नाथमाधव यांचा व माझा प्रत्यक्ष परिचय असा १९१८ सालीं झाला. त्या सुमारास नाट्यकलेची सेवा व कै. अच्युतराव कोल्हटकरांची भीड यामुळें नारिंगी निशाण या खेळाचे पुण्यामुंबईंत जे प्रयोग झाले त्यांत त्यांनीं थोरल्या बाजीरावांची भूमिका यशस्वी रीतीनें करून दाखविली. त्यांचे पाय अधु होते, यास्तव त्यांना सोईचें असें बैठेंच काम देण्यांत आलें होतें. त्यांची अस्खलित वाणी व आवेश यामुळें प्रेक्षकांचें मन ते सहज आकर्षून घेत.

## उत्कृष्ट कादंबरीकार

उत्कृष्ट नट हा त्यांचा विशेष नव्हता. नाथमाधवांचा विशेष म्हणजे ते उत्कृष्ट कादंबरीकार होते. हाच त्यांचा गुणविशेष मजसारख्या प्रकाशकास त्यांचा संबंध जोडण्यास व तो दृढ करण्यास कारणीभूत झाला.

प्रथम मी कै. शि. म. परांजपे व कै. सी. के. दामले अशांसारख्या लेखकांचीं पुस्तकें मिळविण्याची खटपट केली. या मंडळीचें लिखाण मिळण्याचें काम रेंगाळत गेलें. व मला तर प्रकाशनाच्या धंद्यास सुरवात करण्याची अत्यंत जरूरी होती. अशा स्थितींत मी कै. नाथमाधवांपाशीं विचारविनियम केला. ताज्या दमाचा आतुर प्रकाशक पाहून त्यांनीं माझ्या गळ्यांत सहज एखादें चोपडें बांधलें असतें. परंतु त्यांना प्रकाशनाचा व त्यांतील मुक्या माराचा भरपूर अनुभव इतरत्र पूर्वीच आलेला असल्यानें त्यांनीं मला या व्यवसायांतील अडचणींची जाणीव करून देऊन उदाहरणादाखल एका प्रकाशकाचें भेसूर चित्र मजपुढें ठेवलें. परंतु अडचणी पत्करूनही याच धंद्यांत पडण्याचा माझा निश्चय पाहून "स्वराज्याचा श्रीगणेशा" ही पहिली ऐतिहासिक कादंबरी त्यांनीं मला लिहून देऊन माझ्या धंद्याचा श्रीगणेशा केला.

## अधिकांत अधिक मोबदला

नाथमाधवांनीं सुरवातीस जागृत केल्याप्रमाणें आजतागायत माझ्या प्रकाशनाचा क्रम खडतर असाच चालू आहे. अडचण एकाच स्वरूपाची नसते. स्वराज्यावरील ज्या त्यांच्या सात कादंबऱ्या मी प्रसिद्ध केल्या, त्या सुमारें तीसपर्यंत लिहिण्याचा त्यांचा संकल्प होता. ज्या सात कादंबऱ्या ते लिहूं शकले तेवढ्यानेंही त्यांच्या लौकिकांत विशेष भर पडल्याचें आज दिसत आहे. त्यांपैकीं सुरवातीचीच "श्रीगणेशा" कादंबरी निघाल्यावर माझ्यावरील त्या वेळच्या एका विशिष्ट अडचणीनें ती खपते कशी व ही माला सुरळीत चालते कशी, हा प्रश्न उभा राहिला; परंतु पुस्तकाच्या गुणामुळें म्हणा, अगर त्यांच्या व माझ्या योगायोगानें म्हणा, त्या अडचणींतून ही माला पार पडून यशस्वी ठरली.

ज्ञानकोशांत नमूद केल्याप्रमाणें महाराष्ट्रांतील आजवरच्या नामांकित कादंबरीकारांत अधिकांत अधिक प्रथमच एक रकमी मोबदला मिळण्याचा योग नाथमाधवांनाच लाभला.

## लेखक व प्रकाशक यांचे परस्पर संबंध

ग्रंथनिर्मितीचें काम यशस्वीप्रकारें व वाढतें चालू राहण्यास लेखन व प्रकाशन हीं दोनही अंगें स्वतंत्रपणें विभागलीं जावींत असें त्यांना सदैव वाटे. आपल्या प्रकाशकानें इतर लेखकांचीं पुस्तकें ठरविल्यास तसेंच आपल्या लेखकानें इतरांस पुस्तकें प्रकाशित करण्यास दिलीं तर परस्परांत साहजिकच कुरबुर होण्याचे प्रसंग येतात. नाथमाधव हे यापासून सर्वस्वीं अलिप्त होते. त्यांच्या मी प्रसिद्ध केलेल्या सात कादंबऱ्यांच्या प्रकाशनाचें काम चालू असलेल्या मुदतींत त्यांनीं जीं ४।५ इतर पुस्तकें लिहिलीं, त्यांची सोय, मला सवड नाहींसें पाहून त्यांनीं इतरत्र केली. रियासतकार श्री. गो. स. सरदेसाईंच्या त्या सुमारास ज्या दोन रियासती तयार होत्या, त्यांच्या प्रकाशनाचें काम करण्यास त्यांना कोणी तरी योग्य प्रकाशक हवा होता व म्हणून श्री. गोविंदरावजी सरदेसाई यांनीं नाथमाधवांस पत्र लिहून अशा एकाद्या इसमाची चौकशी केली. तेव्हां लागोलाग माझी भेट होण्याची वाट न पाहतां पत्रोत्तरीं माझी शिफारस करून रियासतकारांसारख्या एका सुप्रसिद्ध लेखकाचा संबंध जोडण्याच्या कामीं खटपट करून त्यानीं आपला थोरपणा व्यक्त केला.

## प्रकाशकाच्या गरजांची जाणीव

प्रकाशन भरपूर, वक्तशीर व अधिक किफायतशीर होण्यास या धंद्यास छापखाना, तसेंच एखादें घरचें नियतकालिक असणें इष्ट आहे. प्रकाशकांच्या अशा गरजांची जाणीव व कदर नाथमाधव बाळगीत असत. १९२२ च्या सुमारास गणेश महादेव आणि कंपनीच्या वाढत्या प्रकाशनाच्या वेळीं छापखाना सुरू करतांना सुरवातीचे हजार रुपये, नाथमाधवांनीं आपल्या एका स्नेह्यास देण्यास भाग पाडलें. पुढें १९२५ सालीं 'चार आणे माला' काढतांनाही त्यांनीं आपलेपणानें प्रोत्साहनपर सल्ला व सूचना दिल्या.

कै. नाथमाधवांच्या चार चाहत्यांनीं त्यांच्या 'आठवणी' प्रसिद्ध करून महाराष्ट्र-वाचकांच्या मनांतील कै. नाथमाधवांची आठवण ताजी ठेवण्याची योजना मुक्रर केल्यावर माझे जुने स्नेही व व्यवसायबंधु श्री. पु. बा. कुलकर्णी यांनीं इतरांबरोबर मलाही आग्रह केला व त्यामुळें नाथमाधवांबद्दल वाटणारी कृतज्ञता व्यक्त करण्याची संधि मिळाली, म्हणून मी आज प्रकाशकाचा "लेखक" होत आहें. जें कांहीं लिहिलें त्या 'आठवणी' ठरतील अगर त्या वाचनीय होतील कीं नाहीं, हा विचार न करतां चार ओळी आठवल्या तशा लिहिल्या आहेत.

---

## स्वराष्ट्राकरितां झटण्यांत खरें मनुष्यपण

थोरांच्या चरित्रांवरून असें दिसून येतें कीं, आपल्याच्यानें जें कांहीं करवेल तें इतरांकरितां—स्वजनांकरितां—स्वराष्ट्राकरितां—मनुष्यजातीकरितां करणें यांतच काय तें खरें मनुष्यपण आहे. तें ज्या ज्या दिशांनीं आमच्या साधुसंतांना करावयाचें साधलें, त्या त्या दिशांनीं त्यानीं तें केलें आहे. त्यानीं आपल्या ज्ञानाचा उपयोग स्वदेशोन्नतीच्या कामीं केला. तेव्हां ज्या जन्मभूमीमध्यें त्यांस हें महाज्ञान मिळालें होतें, तिच्या उपकारऋणांतून ते मुक्त झाले आणि म्हणूनच त्यांचीं नावें आज चोहींकडे सारखीं गाजत आहेत.

—नाथमाधव

# सिंहगडानें धडा शिकविला

[ १२ ] ( लेखकः—श्री. **श्रीपाद केशव नाईक** )

श्री. द्वारकानाथ माधवराव पितळे यांचा जन्म मुंबईस झालेला होता. आर्यन एज्युकेशन सोसायटीच्या शाळेंत यांचें कांहीं शिक्षण झालें. तेथेंच त्यांचा-माझा प्रथम परिचय झाला. ते विनोदी, उत्साही, हौशी व प्रेमळ होते. त्यांना क्रिकेटचा फार नाद असे. इतकेंच नव्हे, तर त्यांत त्यांनीं आपलें नांव कमावलें. मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाल्यावर त्यांनीं कुलाब्यास गनकॅरेज फॅक्टरींत नोकरी पत्करली. नंतर सिंहगडावर वाघाची शिकार करीत असतां त्यांना झालेल्या भयंकर अपघाताची हकीकत सर्वांना माहीत आहेच.

ते नेहमीं म्हणत कीं, मम्माच्या बाराखडींतले मरणारे लोक मोठे असतात. कारण लो. टिळक यांचा मधुमेह तर आपल्याला मूळव्याध. त्यांना या दुखण्यांतून बरें होण्यासाठीं बरेच पैसे खर्च करावे लागले, तरी ते त्यांतून निखालस बरे झाले नाहींत. मानवजीवित काय आहे हें सिंहगडानें शिकविलें, असें ते सांगत.

## ओळख पटली

पुढें कांहीं वर्षांनीं मला नाथमाधव या सहीनें दादरहून एक पत्र आलें. त्यांत आपल्या भेटीस यावें म्हणून लिहिलें होतें. त्याप्रमाणें मी गेलों आणि पाहातों तों द्वारकानाथ यांनाच 'नाथमाधव' हा कोण ? म्हणून विचारलें. तेव्हां त्यांनीं "ती व्यक्ति आपणच" म्हणून सांगितलें. तेव्हां हे नाथमाधव पूर्वाश्रमींचे पितळे होत, हें मला कळलें.

ते १९१२ सालीं मुंबईतल्या आर्यन एक्सेलसिअर लीगचे सभासद झाले आणि शेवटपर्यंत टिकले. याच सालीं दादर येथें त्यांच्यासमोर राहात असलेले श्री. बाळकृष्ण नानाजी कोपर्डे यांच्याशीं त्यांची मैत्री जमली, याचें कारण कोपर्डे यांना गाण्याचा नाद होता व त्यांना तें ऐकण्याची आवड होती.

त्यांनीं १९०७ व १९०८ सालांत पुष्कळ वाचन केलें आणि नंतर वाङ्मय-क्षेत्रांत पाऊल टाकलें. अण्णा किर्लोस्कर यांनीं पनवेलीस ज्या जागेंत 'रामराज्य-

वियोग' नाटक लिहिलें आणि 'सुटला पितृदिशेचा वारा' हें पद रचलें, त्याच जागेंत त्यांच्या लेखनास प्रारंभ झाला.

१९१७ सालीं लीगच्या 'हिंदु मिशनरी सोसायटी' सप्ताहांत भाग घेऊन त्यांनीं आपलें अनुकूल मत प्रगट केलें आणि 'मिशनरी' नांव न घेतां 'हिंदु सनातनधर्म-प्रसारक मंडळ' असें नांव सुचविलें. यावरून त्यांच्यांत स्वभाषेविषयीं किती अभिमान होता हें दिसून येतें.

## नाथांचे इतर छंद

त्यांच्या लिखाणाचा परिणाम कोणावर कसा झाला हें पाहावयाचें झाल्यास आपल्याला दिसून येईल कीं, श्री. वि. धों. कुळकर्णी यांनीं शाळेंत विद्यार्थी असतांना 'रायक्लब अथवा सोनेरी टोळी' ही कादंबरी वाचली. त्या वेळीं तिचा लेखक पंगु असेल ही कल्पना नव्हती. जेव्हां त्यांना ही गोष्ट कळली, तेव्हां त्यांना त्यांच्या-बद्दल विशेष कौतुक वाटूं लागलें. नंतर त्यांनीं त्यांच्या इतरही कादंबऱ्या वाचल्या.

नाथांना ज्योतिषाचा नाद असे. त्याचप्रमाणें जपजाप्यही माहीत होतें. एकदां मिसेस् भांडारे यांनीं आपल्या मुलीची पत्रिका त्यांच्यापुढें टाकिली. त्यांनीं ती पाहून तिला मृत्यु आहे तो टाळण्यासाठीं घरीं जाऊन जप करावयास सांगितलें. 'हें माझ्या पतीला पसंत पडणार नाहीं; म्हणून मला तसें करतां येणार नाहीं,' असें तिनें त्यांना सांगितलें. तेव्हां ते त्या दिवशीं सायंकाळीं आपल्या घरीं ध्यानाला बसले ते दुसऱ्या दिवशीं सकाळीं तेथून उठले. अशा रीतीनें त्यांनीं तिचा अपमृत्यु टाळला.

त्यांची 'श्रीनिवास' कादंबरी सरकारजमा झालेली होती, पण पुढें त्यांत थोडा फेरफार करून निराळ्या नांवानें प्रसिद्ध करण्याची त्यांना परवानगी मिळाली. त्यांनीं १९२३ सालीं उपासनी महाराज यांचें चरित्र लिहिलें, तें पैसे घेऊन दिलेल्या सामुग्रीला धरून लिहिलें. त्यांत त्यांनीं आपलें मत व्यक्त केलेलें नाहीं. ही गोष्ट मला माहीत आहे. कारण त्याच सुमारास लीगतर्फे त्यांच्या शेजारीं हिराबागेंत 'भोंदु बुवांचा संसार' हा सप्ताह सुरू होता.

परिस्थितीला तोंड देऊन स्वराज्याच्या प्रभातसमयीं भूतकालचा उज्वल इतिहास दाखविणारा हा महाराष्ट्रलेखक आपल्या ४६ व्या वर्षी इहलोकची यात्रा संपवून १९२८ सालीं जून महिन्यांत निघून गेला. त्यांनीं आपल्या रोजनिशा लिहून ठेवि-लेल्या असाव्या. त्या कामीं न लावतां जशाच्या तशा प्रसिद्ध झाल्यास त्यांचें आत्मचरित्र कळून येईल. तोंपर्यंत त्यांचें प्रसिद्ध झालेलें वाङ्मय एकत्र करून ठेविल्यास तो संग्रह एक प्रकारें त्यांचें स्मारकच होणार आहे.

# नाथमाधव व ग्रंथकर्तृत्व

[१३]     (लेखक—शेठ **दामोदर सांवळाराम यंदे**)

कै. नाथमाधवांची व माझी पहिली भेट सन १९०७–८ सालीं झाली. 'श्री सयाजी-विजय' पत्राच्या ग्राहकांस दरसाल एका सुंदरशा ग्रंथाची भेट देण्याची आमची वहिवाट होती; व वेगवेगळ्या लेखकांकडून भेटीस देण्याकरितां पुस्तकें येत असत. त्यांत जें उत्तम ठरेल, त्याचें प्रकाशन करण्यांत येत असे. त्या सालीं आम्हां-कडे वेगवेगळ्या लेखकांकडून बरींच पुस्तकें परीक्षणाकरितां आलीं होतीं. त्यांत कै. नाथमाधव यांची 'तरुण रजपुत सरदार' ही ऐतिहासिक कादंबरी पसंत करण्यांत आली; आणि त्यांची समक्ष भेट घेण्याकरितां कै. श्रीयुत पितळे यांजबरोबर त्यांच्या घरीं जाण्याचा प्रथमच योग आला.

## प्रेमळ स्वभाव

त्या वेळीं ते कोचावर पद्मासनासारखें आसन करून बसलेले होते. ते पायानें अधू आहेत, ही कल्पनाही मनाला शिवली नाहीं. त्यांच्या कल्लेदार मिशा, टपोरे डोळे व भव्य चेहरा पाहून हे कोणी तरी लष्करी अंमलदार असावे, अशी माझी भावना झाली. परंतु त्यांजबरोबर बोलणें सुरू होतांच ते एक मार्मिक संशोधक व लेखक असल्याचें माझ्या प्रत्ययास आलें. आमचा विषय 'तरुण रजपुत सरदार' ही कादं-बरी कोणत्या प्रसंगावर व कोणत्या इतिहासास अनुसरून लिहिली याचा खुलासा करावयाचा हा होता; व तो खुलासा त्यांनीं अत्यंत समाधानकारक रीतीनें केला. तो ऐकून आम्हांस समाधान वाटलें. श्री. नाथमाधव यांचा इतिहासग्रंथांवरील व्यासंग चांगला असल्याचें पाहून मराठ्यांच्या इतिहासाला धरून शिवचरित्रावर एकादी कादंबरी लिहिण्याविषयीं आम्हीं त्या वेळीं त्यांस सूचना केली, ती त्यांस फार आवडली आणि त्यांनीं शिवकालीन चरित्रावर कादंबरी लिहिण्याचें काम हातीं घेतलें. शिवचरित्रावर लिहिलेल्या त्यांच्या कादंबऱ्या किती लोकप्रिय झाल्या हें सर्वश्रुत आहेच. सारांश, ह्या पहिल्या भेटींतच त्यांचा प्रेमळ स्वभाव, बहुश्रुतपणा, दांडगें

वाचन व शीघ्र लेखन यांचा अनुभव आला आणि त्यांचा चेहरा जसा लष्करी बाण्याचा-भव्य दिसतो, तसेच ते साहित्यकार्यांतही उत्तम कम्पाउंडर आहेत, अशी आमची खात्री झाली व मोठें कौतुक वाटलें.

## कै. नाथमाधव व वक्तृत्व

उत्तम लेखक असला तरी तो उत्तम वक्ता असतोच, असें फार क्वचित् आढळून येतें. परंतु कै. नाथमाधव यांच्या ठायीं हे दोन्ही गुण एकसमयावच्छेदेंकरून सारखेच सामावलेले होते. पायांच्या अधूपणामुळें सर्वेच सार्वजनिक सभांत त्यांस भाग घेतां येत नसे. परंतु साहित्यकार्याची सभा असली म्हणजे ते हजर राहण्याचा व साहित्यचर्चेंत भाग घेण्याचा प्रयत्न करीत असत. एकदां त्यांचें व्याख्यान ऐकण्याचा योग आला. त्या वेळीं त्यांची अस्खलित वाणी, भव्य आवाज व विषयप्रतिपादनाची शैली पाहून श्रोतृसमुदाय तल्लीन झालेला दिसून आला. त्यांची भाषा सरळ, साधी व सोपी असल्यामुळें ऐकणारांवर त्यांच्या भाषणाची छाप चांगलीच पडत असे.



## नाथमाधव आदरणीय कां वाटतात?

"त्यांनीं केवळ साठसत्तर कादंबऱ्या लिहिल्या म्हणून आम्हांस त्यांचेविषयीं आदर वाटत नव्हता; तर ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिण्याची त्यांनीं आपल्यामध्यें जी पात्रता आणिली होती ती खरोखर अत्यंत स्पृहणीय होती. विशेषसें शिक्षण न झालेला तरुण पायांनीं लुळा झाल्यामुळें लेखनव्यवसाय करूं लागतो काय, व एकाहून एक सरस अशीं ऐतिहासिक कथानकें आधारभूत घेऊन सुंदर कादंबऱ्या प्रसवतो काय! सुप्तावस्थेंत असलेली त्यांची कल्पकता पाय लुळे होतांच वाढीस लागली व तिच्या सहाय्यास स्फूर्ति येऊन भराभर ग्रंथरचना होऊं लागली! इतका त्यांचे हातून उद्योग झाला, इतकी ग्रंथरचना झाली, पण त्यामुळें त्यांच्यावर अहंतेची सांवलीही पडली नाहीं."

ता. १-७-१९२८ —सुबोधपत्रिका

# वंदनीय वाङ्मयसेवा

[ १४ ] ( लेखकः—महामहोपाध्याय **दत्तो वामन पोतदार**, बी. ए. )

'हिंद एजन्सी'चे चालक रा. केतकर यांच्यामुळें माझा व नाथमाधव यांचा कांहींसा परिचय ते पुण्यास असतां घडला. त्या दुकानीं, आप्पा बळवंत चौकाशेजारीं, जोगेश्वरी नाक्याजवळ, आमच्या मधून मधून भेटी होत.

नाथमाधव हे पायानें अधू झाले ते शिकारीच्या नादांत अपघात झाल्यामुळें झाले होते; आणि अशाही स्थितींत ते जबरा लेखनव्यवसाय करीत, हें पाहून मला त्यांच्याविषयीं फार कौतुक वाटे !

ऐतिहासिक कादंबऱ्या लिहाव्या आणि अशा रीतीनें मराठ्यांचा उज्वल इतिहास रम्य स्वरूपांत लोकांस चाखवावा, ही त्यांची मोठी महत्त्वाकांक्षा होती; कदाचित् या कामीं माझा उपयोग करून घेतां येईल किंवा घ्यावा असा त्यांचा हेतु असावा; तथापि नाथमाधव अपंग, आणि मला काल्पनिक कथावाङ्मयाची अंतरींची आवड नाहीं, यामुळें आमचा संबंध या दृष्टीनें कांहीं दृढ झाला नाहीं.

कै. नाथमाधव यांनीं सतत निष्ठेनें मराठी वाङ्मयाची सेवा आपल्या शारीरिक आपत्ति न जुमानतां केली, ती खरोखरीच वंदनीय समजली पाहिजे, असें मला वाटतें.

---

# नाथमाधवांचें अमरत्व

"संकटांतून वाट काढून जीवितसाफल्य करून दाखविण्यासंबंधीं अंतःकरणाची तळमळ असली म्हणजे कोणालाही पुढील उपाय सुचतो. विधिघटनेनें पंगुत्व आलें असतां दुःख करीत न बसतां पहिल्याइतक्याच जोमानें व आनंदानें शक्य तें काम करून नाथमाधवांनीं जी मराठीची वाङ्मयसेवा केली ती राष्ट्राच्या कारणीं रुजू आहे. नाथमाधव गेले, पण त्यांच्या कृती हयात आहेत. या दृष्टीनें त्यांनीं आपल्याला अमरत्व प्राप्त करून घेतलें आहे. या त्यांच्या जीवनांतही एक उत्तम धडा आपणां सर्वांस त्यांनीं शिकविला आहे. माणसानें संकटें आलीं असतां धीर सोडूं नये; होईल तें कर्तव्य करीत रहावें यांतच व्यक्तीचें व राष्ट्राचें कर्तव्य सिद्धीस जातें."

१९५२—रियासतकार **गो. स. सरदेसाई**

# नाथमाधवांबद्दल मला काय वाटतें ?

[ १९ ] ( लेखक:—श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, नागपूर )

नितांत आदर वाटतो, हें लिहावयाला नकोच. मला त्यांच्या वाङ्मयाबद्दल दहशत अशी फक्त एकदांच वाटली. १९१४ सालीं त्यांची 'वीरधवल' ही कादंबरी मीं अगदीं अधाशीपणानें वाचून टाकली. ती वाचीत असतांना तर मनाचा आणि शरीराचा थरकांप सारखा होतच होता; परंतु त्या रात्रीं मी स्वप्नांतूनही दोनतीनदां दचकून उठल्याचें आठवतें.

कांहीं लोक मला मराठींतील 'पहिला राजकीय कादंबरीकार' समजतात; परंतु माझ्या मतें मी राजकीय कादंबरीकार नाहीं; व पहिला तर नाहींच नाहीं. कै. हरीभाऊ आपटे यांच्या 'मी', 'यशवंतराव खरे', 'कर्मयोग' या राजकीय चर्चेनें युक्त असलेल्या कादंबऱ्या सोडल्या, तरी नाथमाधवांची सरकारजमा झालेली कादंबरी 'श्रीनिवासराव' ही राजकीय कादंबरी आहे; व ती आज लोकांपुढें नसल्यामुळेंच लोक 'राजकीय कादंबरी' हा अगदीं नवा कथाप्रकार समजतात.

नाथमाधवांचें दुसरें वैशिष्ट्य म्हणजे त्यांची 'सांवळ्या तांडेल' ही कादंबरी. मराठींतील ही पहिली आरमारी कादंबरी आहे, असें म्हटल्यास तें चूक ठरणार नाही. हरीभाऊंच्या 'उषःकाल' नें प्रथम 'सांवळ्या' मराठी वाचकवर्गापुढें आणला आणि तो अत्यंत लोकप्रियही झाला; परंतु नाथमाधवांनीं त्या 'सांवळ्या' ला तांडेल बनवून आरमारी कादंबरीचें अगदीं नवें सदर मराठींत निर्माण केलें, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.

'विमलेची ग्रहदशा' ही कादंबरीही अशीच विशेष उल्लेखनीय आहे. धर्मांतरित हिंदु मुलींच्या दुर्दशेचें चित्र, मला वाटतें, याच कादंबरींत प्रथम रेखाटलेलें दिसतें.

त्यांच्या कादंबऱ्यांविषयीं किंवा कथनकौशल्याविषयीं विस्तारानें लिहिण्याची ही जागा नव्हे; परंतु रसाळ वर्णनें, सुगम भाषा, मार्मिक समाजचित्रण आणि राष्ट्रीय प्रश्नांविषयींचा जिव्हाळा, या गुणांमुळें त्यांच्या कादंबऱ्या सदैव गोडीनें वाचल्या जातील, याबद्दल मला शंका वाटत नाहीं.

# नाथमाधवांचा 'विहंगवृंद'

[ १६ ] ( लेखकः— प्राध्यापक **श्रीकृष्ण स. भावे**, एम्. ए., एल्एल्. बी., पीएच्.डी. )

कै. नाथमाधव यांच्यासंबंधानें मीं कांहींतरी लिहावें, अशी सूचना मला मिळाली, त्या वेळीं माझ्या मनांत १९१५ सालीं नाथमाधव यांची 'विहंगवृंद' ही कादंबरी मीं प्रथम वाचली त्यावेळचा प्रसंग एकदम उभा राहिला. मला मराठी वाङ्मयाची गोडी नुकतीच लागली होती आणि एकाद्या अधाशाप्रमाणें हातीं लागेल ती गोष्ट व कादंबरी मी वाचून काढीत होतों.

त्या अद्भुतरम्य वातावरणांत वावरतांना इतर सर्व गोष्टींचा विसर पडून शाळेचा अभ्यास करण्याचें राहिल्यामुळें पुष्कळदां मारही खाण्याचा प्रसंग आला होता; परंतु मनोहर आणि कान्ता यांचें काय झालें तें जाणण्याच्या उत्सुकतेनें तो मार सहन करूनही मी पुन्हां विहंगवृंदांतच गुंगून गेलों.

खरोखरच रस्किन म्हणतो त्याप्रमाणें ललित वाङ्मयाच्या पहिल्या पेल्याची निशा दारूच्या पेल्याहूनही और आहे. या निशेचें सुख नाथमाधवांचीं पुस्तकें वाचतांना मला मिळालें. 'वाचक हो' अशा संबोधनानें सुरू केलेल्या कादंबऱ्या लिहिण्यास आज कदाचित् लेखक धजावणार नाहींत; वाचक तर निश्चित वाचणार नाहींतच, नाहींत; परंतु अशा तऱ्हेच्या संबोधनानें नाथमाधव वाचकाला अगदीं आपल्या कह्यांत ओढतात व त्याची भरपूर करमणूक करून त्याला बोधामृतही पाजतात आणि तें वाचक आनंदानें पिण्यास कबूल होतो, यांतच त्यांच्या यशाचें मर्म सांठविलेलें आहे.

" वाचक हो ! तो पहा विहंगवृंद ! आणि ती पहा कान्ता ! ती आतां पूर्वीची हट्टी आणि हेकेखोर कांता राहिली नाहीं." अशांसारखीं त्यांचीं वाक्यें अजूनही आवडतात. नाथमाधवांचें गद्य जिवंत असून अतिशय तळमळीनें लिहिलेलें आहे. भाषा

तर कित्येक ठिकाणीं अतिशय रेखींव आहे; आणि आपल्याला पटेल तो बोध समाजाला देण्याला त्यांनीं बिलकुल मागेंपुढें पाहिलेलें नाहीं !

'स्वराज्याचा श्रीगणेशा' वगैरे त्यांच्या कादंबऱ्या तर उत्कृष्टच आहेत. तथापि माझ्या मनाला ऐतिहासिक कादंबरींत तितकेंसें समरस होतां येत नाहीं, त्यामुळें नाथमाधव हें नांव उच्चारल्याबरोबर माझ्या मनांत एकदम 'विहंगवृंद' च उभा राहातो. मला अशी खात्री वाटते कीं, मराठी ललित वाङ्मयाच्या इतिहासांत 'नाथमाधव' यांना एक विशिष्ट स्थान आहे आणि आजच्या चौखंदळ वाचकांनाही त्यांच्या कादंबऱ्यांतून मनोरंजन आणि मनोबोधन या दोहोंचाही उत्तम लाभ होईल.

---

# गुरुजींची भविष्यवाणी

बहुतेक लोकांना आपल्या पुस्तकांतील दोष कोणीं दाखविले तर ते आवडत नाहींत. त्याबद्दल त्यांची मर्जी खप्पा होते; इतकेंच नव्हे तर द्वेषबुद्धि उत्पन्न होऊन कोणत्या ना कोणत्या तरी मार्गानें सूड उगविण्याचाही प्रयत्न होतो; परंतु कित्येक पुरुष फार थोर मनाचे असतात. त्यांना आपल्या ग्रंथांतील दोष पाहून त्याबद्दल विचार करावयास साधन झाल्यानें उलट आनंदच होतो. अशा प्रकारचे उदार अंतःकरणाचे जे थोडेबहुत महाभाग आमच्या नजरेस आले, त्यांपैकींच **श्री. नाथमाधव हे** एक होत. त्यांचा आमचा अत्यंत स्नेह आहे, व त्यांच्या १।२ ग्रंथांतील आम्ही जसे गुण तसेच दोषही दाखविले आहेत. त्यावरून कदाचित् त्यांच्या आमच्या मैत्रीस धक्का बसतो कीं काय अशीही भीति वाटत होती; परंतु त्यांनीं आपल्या पत्रांत त्याबद्दल तिरस्कार व्यक्त केला नाहीं; एवढेंच नव्हे तर उलट 'आपल्याकडून मला असेंच शिक्षण मिळेल अशी आशा आहे,' असे उद्गार काढले ! इतकेंच नव्हे तर त्यासोबत लगेच 'सांवळ्या तांडेल' हें पुस्तक परीक्षणाकरितां प्रेमपूर्वक भेट पाठविलें. यावरून त्यांचें अंतःकरण किती निर्मळ आहे ह्याची उत्तम साक्ष पटते.

अशा निर्मळ व पवित्र अंतःकरणाच्या पुरुषास आपल्या कृतींत परिपूर्ण यश येण्याला परमेश्वराचा आशीर्वाद आहे असें खास समजावें; आणि त्यावरूनच नाथमाधव हे लौकरच ग्रंथकर्त्यांमध्यें उच्च प्रतीची जागा पटकावून सत्कीर्तिमंदिरांत विराजमान होतील तसें मी खात्रीनें म्हणतों.

१९१० —'महाराष्ट्रभाषाचित्रमयूर' श्री. कृ. ना. आठल्ये

# नाथमाधव व ध्येयदृष्टि

[ १७ ] ( लेखकः—प्राध्यापक **कृ. र. पोतदार,** एम्. ए. )

एका व्यापक प्रश्नाचा संकुचित स्वरूपांत विचार करावयाचें या लेखांत योजिलें आहे. 'नाथमाधवांनीं 'सोनेरी टोळी' सारखी डिटेक्टिव्ह कथा व 'वीरधवल' सारखी अद्भुतरम्य रूपांतरात्मक कादंबरी लिहिली म्हणून, 'सामान्यतः त्यांचें लेखन सामान्य वाचकांचें मनोरंजन करण्याच्या स्वरूपाचें होतें; त्यांत विचाराची सखोलता किंवा ध्येयवादात्मक लेखनदृष्टि यांचा अभाव आहे' असे वरपांगी विचार व्यक्त केलेले कित्येकदां आपणांस ऐकूं येतात. विशेषतः हरीभाऊ आपट्यांच्या नंतर कादंबरीच्या क्षेत्रांत पदार्पण केल्यामुळें पुष्कळ टीकाकारांना हरीभाऊंच्या 'मी' सारख्या ध्येयवादी सामाजिक व 'उषःकाल' सारख्या ऐतिहासिक कादंबऱ्यांबरोबर नाथमाधवांच्या सामाजिक व ऐतिहासिक कादंबऱ्यांची तुलना करण्याचा मोह होतो व नंतर उपरिनिर्दिष्ट स्वरूपाचें वरपांगी विधान केलें जातें.

हरीभाऊ व नाथमाधव यांनीं 'लेखन हेतुपूर्व असावें' या विचारसरणीच्या कालांत आपलें वाङ्मय निर्माण केलें. 'कलेकरितां कला', 'मनोरंजनाकरितां कला', 'प्रचाराकरितां कला' वगैरे वाङ्मयाचे ध्येयदृष्टिविषयक वाद त्या वेळीं निर्माण झाले नव्हते, यामुळें वाङ्मय हेतुपूर्व असतें व असावें, या तत्त्वाच्या निकषावरच त्यांच्या लेखनसुवर्णाची परीक्षा करावयास हवी.

## दुर्दम्य आशावाद

या दृष्टीनें आपण नाथमाधवांच्या वाङ्मयसंसाराकडे दृष्टिक्षेप केला तर आपणांस असें दिसून येईल कीं, जरी नाथमाधवांच्या वाङ्मयानें शंभर टक्के मनोरंजन होत असलें, तरी केवळ निर्भेळ मनोरंजनाकरितां त्यांनीं लेखन केलें नाहीं खास ! त्यांचें लेखन एवढें हेतुशून्य असूं शकेल का, या प्रश्नाच्या विचाराकरितां त्यांच्या जीवनाकडे एक दृष्टिक्षेप टाका ! आपणांस असें आढळून येईल कीं, त्यांचें जीवन जीविताशीं झग-

ण्यांत गेलें. जीवितामध्यें निराशा-केवळ निराशा वांट्यास आली असतांही त्यांनीं या निराशेची अंधुकशी कृष्णछायाही आपल्या लेखनावर पडूं दिली नाहीं. यांतच सर्वस्वानें त्यांच्या जीवनाचें व लेखनाचें वैशिष्ट्य दिसून येतें. जीवनामध्यें इतक्या दुर्दम्य आशावादाचा ज्यानें अवलंब केला त्याचें लेखन हेतुशून्य असूंच शकणार नाहीं. त्यांच्या पार्थिव देहाकडे एक कटाक्ष टाका! अर्धशरीर पंगु झालेलें, पण जणूं काय त्यामुळेंच त्या शरीरार्धांतील सामर्थ्य उर्वरित शरीरविभागांत दुणावलें होतें. त्यांची भव्य व प्रथमदर्शनीं प्रेक्षकांवर छाप पाडणारी शरीरयष्टि, तारुण्यकालाचा अनुभव घेण्यापूर्वींच आलेल्या पंगुत्वामुळें जणूं अप्रतिहतपणें दृग्गोचर होणारा बाल्यसुलभ असा मुद्रेवरील निरागस भाव, या गोष्टी ध्यानांत घेतल्यास वर निर्दिष्ट केल्यासारखा एकांगी विचार व्यक्त करण्यापूर्वीं कोणीही टीकाकार क्षणभर आपल्या लेखणीस विराम देईल. इतकेंच नव्हे, तर नाथमाधवांच्या वाङ्मयाचा आपण त्यांच्या जीवनाच्या दृष्टीनें विचार केला आहे का, असा प्रश्न स्वतःस विचारील, व नंतर उचित परिशीलनानें असल्या अनिर्बंध टीकेचा प्रसंगच उपस्थित होणार नाहीं.

## ध्येयवादाची नाजूक छटा

त्यांच्या सामाजिक स्वरूपाच्या दोन कथा 'सोनेरी टोळी' व 'डॉक्टर कादंबरी' या ह्या. पहिल्या कथेकडे पुष्कळसे लोक 'सर्वसामान्य वाचकांचें अव्वल दर्जाचें मनोरंजन करणारी एक कथा' या दृष्टीनें पाहतात; परंतु या कादंबरीच्या नायकाच्या (रायाच्या) स्वभावाचें व जीवनाचें अधिक निरीक्षण केल्यास यांत सामान्य जनांच्या आटोक्यांतील असा ध्येयवादी मनुष्य दिसेल. साधारणतः ध्येयवादी कादंबरीच्या नायकाचें स्वभावचित्र वाचून सामान्य वाचकास आश्चर्ययुक्त आदर वाटतो. त्याला तो गुणमूर्ति, ध्येयमूर्ति समजून शतशः प्रणाम करील. परंतु त्याबरोबरच स्वतःचा विचार करतां आपण त्यापेक्षां कितीतरी हीन श्रेणीचे आहोंत असा न्यूनगंडयुक्त विचार त्याच्या मनांत उद्भवल्याशिवाय राहणार नाहीं. 'राया'च्या बाबतींत तसें होण्याचा सुतराम् संभव नाहीं. समाजांतील दंभाचा रायासारखा आपणांसही स्फोट करतां येईल. बावळेपणापासून होणाऱ्या नुकसानींतून आपण कांहीं व्यक्तींस खात्रीनें वांचवूं शकूं. मिरासदारांची मिरास सामान्य बुद्धीनेंही आपणांस स्तंभित किंवा नष्ट करतां येईल, अशा तऱ्हेचे विचार ती कथा वाचल्यानंतर कोणाही सामान्य वाच-

मनोरंजकपणें आपल्या त्या प्रदीर्घ कथेंत सूचित केल्या आहेत ! सामान्य जनांस आकलनीय अशा ध्येयवादाच्या छटा इतक्या नाजूकपणें ते चित्रित करूं शकले यांतच त्यांच्या लेखणीच्या कुंचल्याचें वैशिष्ट्य आहे.

## शाकुंतल व डॉक्टर कादंबरी

'डॉक्टर कादंबरी' या कथेची गोष्ट घ्या. पत्नी ही कांहीं झालें तरी पतीपेक्षां हीन दर्जाची आहे, असा प्रतिगामी स्वरूपाचा विचार कांहीं त्या कादंबरीनें ध्वनित होत नाहीं. डॉक्टर कादंबरीनें रघुनाथाच्या चरणावर मस्तक ठेवणें यांत तिच्या शिक्षणाचा, बुद्धीचा व पत्नीत्वाचा उपहास होतो अशी शंकाही कुणाच्या मनांत डोकावणार नाहीं. प्रत्येक व्यक्तीस तिच्या व्यक्तित्वाबरोबरच सामाजिक अस्तित्वही असतें, व त्याकरितां प्रसंगीं तीस आपल्या व्यक्तित्वालाही मुरड घालावी लागते, हें तत्त्व त्यांनीं अत्यंत सहृदयपणें रंगविलें आहे; व कादंबरीच्या लीनतेंत प्रकर्षानें दिसणारा विजय हा रघुनाथाच्या पौरुषाचा नसून पश्चात्तापाच्या अग्नींत तावून सुलाखून निघालेल्या त्याच्या संस्कारयुक्त हृदयाचा होय. संस्कृति ही बौद्धिक शिक्षणावरच आधारलेली नसते, बौद्धिक शिक्षणानें ती विचलित होऊं शकत नाहीं. बौद्धिक शिक्षणाबद्दलचे पूर्वग्रह व्यक्तिजीवनांतील सौख्याला प्रतिबंध करूं शकतात, हीं तत्त्वें किती मनोरंजकपणें त्यांनीं या कथेंत ग्रथित केलीं आहेत ! रघुनाथाच्या मनावर संस्कार होते; परंतु त्या संस्कारांवर पूर्वग्रहाचीं पुटें चढलीं होतीं–चढविलीं गेलीं होतीं. व त्यामुळें त्याचें मन व जीवन कांहीं काल मलिन झालें. कादंबरी म्हणजे एक सरलतेची व विशुद्धतेची प्रतिमा ! अर्थातच मनोमालिन्यामुळें तो कांहीं काल तिचा सहचर या दृष्टीनें नालायक ठरला व तिचा सहवास त्याला दुरावला हें ठीकच झालें; परंतु जेव्हां मलिनतेचीं पुटें दूर झालीं तेव्हां त्यांच्यांत बौद्धिकदृष्ट्या अंतर पडलें असलें तरी हृदयाची विशुद्धता, सरलता व निरागसता या गुणांचें समप्रमाण झालें व नंतर त्यांच्या मीलनांत अंतर राहण्याचें कांहीं कारण नव्हतें व त्याप्रमाणें घडून आलें. पतिपत्नीजीवन सुखमय होण्यास हृदयाची एकरूपताच आवश्यक असते. बुद्धीची समता नव्हे ! बुद्धीची विषमता संसारसुखांत तट उभारूं शकत नाहीं हें सत्यही या कथेमध्यें किती सुंदरपणें चितारलें गेलें आहे ! नायक-नायिकांचें प्रथम मीलन, नंतर नायकाच्या गैरसमजामुळें होणारा विरह, नंतरच्या कालांत नायिकेनें केलेली तपश्चर्या व तदनंतर संस्कारशुद्धतेमुळें अवश्यभावी असें

त्यांचें पुनर्मीलन या प्रसंगक्रमावरून डॉक्टर कादंबरीची शाकुंतलाशीं तुलना करण्याचा मोह मला उत्पन्न होतो व ज्या तत्त्वाच्या श्रेष्ठतेमुळें शाकुंतल हें अद्वितीय नाटक ठरलें, त्यामुळेंच डॉक्टर कादंबरीची श्रेष्ठताही प्रस्थापित होते. लोकप्रियतेचें शिखर त्या कादंबरीनें अगोदरच गांठलेलें आहे; परंतु त्या कादंबरीचें तात्त्विक अधिष्ठान संक्षेपानें हें असें आहे.

## राष्ट्रसेवेच्या दृष्टीनें महत्त्व

त्यांच्या स्वराज्यावरील कादंबऱ्यांचा या दृष्टीनें अभ्यास केल्यास जीवनांतील कितीतरी सुंदर तत्त्वें त्यांत ग्रथित केलेलीं दिसून येतील. या दृष्टीनें नाथमाधवांच्या वाङ्मयाचा साकल्यानें अजून विचार झाला नाहीं. त्यांच्या लेखनांत ध्येय-दृष्टि आहे व त्यांच्या लेखनप्रतिभेस तात्त्विक भूमिकेचें अधिष्ठान आहे. त्या दृष्टीनें त्यांच्या वाङ्मयाचा अभ्यास होणें जरूर आहे असें मला वाटतें. व्यक्ति, समाज व राष्ट्र या सर्वांगीण उत्कर्षाच्या दृष्टीनें त्यांनीं विचार केला होता. व जरी 'मी' सारख्या कादंबरींतील आत्यंतिक ध्येयवादाचें चित्रण आवश्यक असलें तरी नाथमाधवांच्या वाङ्मयांत दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या सामान्य जनांच्या ध्येयवादाला तत्कालीन समाज-सुधारणा व राष्ट्रसेवा या दृष्टीनें अतिशय महत्त्व आहे हें विसरून चालणार नाहीं. त्यांच्या कथांत सामान्यतः दिसून येणाऱ्या अद्भुतरम्यतेमुळें व नाट्यप्रसंगांमुळें सामान्य वाचकाला आपलें मनोरंजन होतें असें वाटतें, हा त्यांच्या लेखनकलेचा विजय आहे. पण या मनोरंजनानें उल्हसित झालेल्या मनोवृत्तींत त्यांच्या सूचित ध्येयवादाचा प्रवेश वाचकाच्या नकळत होतो; व त्यामुळें वाचकाची वृत्ति अधिक विकसित होते.

या परिणामांचें सूक्ष्म दृष्टीनें निरीक्षण करून त्यांच्या जीवनदृष्टीवर अधिक प्रकाश पाडण्यास कोणीतरी प्रवृत्त व्हावें, या इच्छेनें प्रेरित होऊन शलाकादृष्टीनें हा लेख लिहिला आहे. नाथमाधवांच्या वाङ्मयावर या सूक्ष्म दृष्टीनें ग्रंथ लिहिला गेल्यास त्यांच्या जीवनाची व वाङ्मयाची श्रेष्ठता सर्वमान्य होईल यांत तिळमात्रही संदेह वाटत नाहीं.

---

# करमणूक व ध्येय यांचा सुंदर मिलाफ

[ १८ ] ( लेखकः डॉ. भि. अ. परब, एम्. ए. पीएच्. डी. )

उत्तम कथावाङ्मयाची कसोटी काय ? असें मला कोणीं विचारलें तर मी त्याला सांगतों; "जें कथावाङ्मय वाचूं लागलें असतां वाचीत जावेंसें वाटतें, वाचून संपविल्याशिवाय राहूं नये असें मनापासून वाटतें, तें उत्तम कथावाङ्मय."

या वाङ्मयकसोटींत अनेक गुणांचा समावेश होतो. माणसें कथाकादंबऱ्या वाचतात तीं करमणुकीसाठीं, म्हणून वाचतांना मन गुंगून जाऊन वाचीत राहावें असें वाटल्याखेरीज बहुधा वाचक पुस्तक हातांत घेत नाहींत. स्वतःच्या वाचनाची घमेंड मिरविणारे वाचक आपल्या या ना त्या खुळाचें ( फॅड ) प्रदर्शन मांडतात. पण बहुसंख्य वाचक वाचतात ते करमणुकीसाठीं व समाधानासाठीं.

येथील मुंबई ग्रंथसंग्रहालयांतील वाचावयास गेलेल्या पुस्तकांत कथाकादंबऱ्यांचें प्रमाण शेंकडा सुमारें ऐशीं टक्के पडतें. हरीभाऊ आपटे, नाथमाधव, वि. स. खांडेकर, ना. ह. आपटे, प्रो. फडके, यांच्या कादंबऱ्यांवर वाचकांच्या उड्या पडत असतात !

नाथमाधवांच्या 'वीरधवल' कादंबरीची संक्षिप्त शालेय आवृत्ति तयार करतांना प्रस्तुत लेखकास या बाबतींत अनुभव आला तो सांगण्यासारखा आहे. 'वीरधवल' ची उपलब्ध प्रत दोनचार पानांतच खराब झालेली होती व अक्षरें दिसत नव्हतीं. म्हणून प्रकाशकानें ग्रंथालयांतून 'वीरधवल' आणवून जरूर तो भाग उतरून ( कापून नव्हे ! ) घेण्याचा विचार केला. पण चौकशी करतां पुस्तक वाचावयाला गेलेलें ! पाहिजे असल्यास 'हक्क राखून' ठेविल्यास महिनाभरांत मिळेल असें उत्तर मिळालें.

वर उल्लेखिलेल्या कादंबरीकारांच्या कांहीं कांहीं कृतींसाठीं वाचकाला अद्यापीही आठवडेच्या आठवडे हक्क ठेवून वाट पाहावी लागते.

## करमणुकीला उत्कट ध्येयाची जोड

नाथमाधवांच्या कादंबऱ्या वाचकांना इतक्या आवडतात याचें कारण त्या प्रणयकथा आहेत हें नव्हे. "कादंबरी लिहिणें म्हणजे नायक-नायिकेचें प्रेममीलन झालेलें

दाखविणें" अशी कल्पना त्यांच्या पहिल्या कृतीच्या वाचकांस येईल; परंतु पुढील कृतींत त्यांनीं करमणुकीला उत्कट ध्येयाची जोड दिली आहे. विहंगवृंद,' 'विमलेची ग्रहदशा' व 'डॉक्टर कादंबरी' या कादंबऱ्यांतील सामाजिक प्रश्न जिव्हाळ्याचे आहेत व ते चटकदार कथानकाच्या रूपानें वाचकांपुढें मांडलेले आहेत. त्यांची दारूबंदीवरील कादंबरी ( श्रीनिवासराव ) सरकारजमा झाल्याचें त्यांच्या प्रकाशकांकडून मला कळलें. त्या कादंबरींतील प्रत्येक प्रकरणाच्या आरंभीं विविध भाषांतील व विविध लिपींतील ( उर्दू सुद्धां ) अवतरणें दिलीं आहेत !

नाथमाधवांच्या स्वराज्याच्या इतिहासावरील कादंबऱ्या, सांवळ्या तांडेल व वीरधवल या विद्यार्थ्यांना प्रिय आहेत. एके काळीं या कादंबऱ्यांना फार लोकप्रियता लाभली होती; अजूनही ती बरीच कायम आहे. देशप्रेम व स्वातंत्र्य या गुणांचा वाचकांच्या मनावर कायम ठसा उमटवून त्यांची करमणूक करणें हेंच या कादंबऱ्यांचें ध्येय आहे व तें नाथमाधवांनीं उत्तम रीतीनें साधलें आहे. 'वीरधवल' ही इतकी उत्कृष्ट कादंबरी आहे कीं, ती रूपांतरित आहे हें वाचकाला सांगूनही पटावयाचें नाहीं.

नाथमाधवांचें वाङ्मय असें आहे. तें त्यांच्या हयातींत गाजलें व त्यानें कीर्ति मिळविली; अजूनही तें खूप लोकप्रिय आहे. नाथमाधव सैनिक होते, ते सिंहगडाच्या कड्यावरून पडून लंगडे झाले. पण त्यांची अभिजात वीरवृत्ति लंगडी झाली नाहीं. ती कादंबरींतील त्यागी व स्वातंत्र्यार्थ प्राणाहुति देणाऱ्या वीरांच्या रूपानें प्रगट झाली.

---

## देशाची उन्नति

"एका विद्वानानें म्हटलें आहे कीं, आपल्या देशाची उन्नति ही एक मोठी इमारत आहे. ही बांधण्यास अनेक प्रकारचे कारागीर पाहिजे आहेत. ते तयार व्हा. कोणी कोलंबस व्हा. कोणी लूथर व्हा. कोणी रामशास्त्री व्हा. कोणी दादाभाई व्हा. कोणी कांहीं व्हा. आणि एकदांची ही इमारत बांधून शेवटास न्या. अशा प्रकारच्या इमारती ज्यांनीं आजपर्यंत बांधल्या, त्यांना चार चार हात नव्हते कीं चार चार डोळेही नव्हते. ते तुमच्या-आमच्यासारखेच होते. त्यांनीं जीं कामें केलीं तीं तुम्हां-आम्हांस कां करतां येऊं नयेत? अगदीं खरें आहे; करतां यावींत आणि करतां येतील यांत तिळमात्र शंका नाहीं; परंतु तीं करावयाचें मनावर घेतलें पाहिजे. तीं पार पाडावयास कांहीं वेदांती नकोत किंवा कोणी वैराग्य घ्यावयास नको. इष्ट कार्याकडे निरंतर दृष्टी ठेवून माणसांनीं आपापल्या योग्यतेप्रमाणें आपापले व्यवहार करीत रहावें म्हणजे झालें."

१९२० —नाथमाधव

# नाथमाधवांचें वाङ्मयक्षेत्रांतील वैशिष्ट्य

[ १९ ] ( लेखकः—श्री. अच्युत बळवंत कोल्हटकर )

नाथमाधवांनीं वाङ्मयक्षेत्रांत एवढें यश मिळवावें अशी सृष्टिदेवतेनें त्यांना कोणती अनुकूलता दिलेली होती ! कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, हरी नारायण आपटे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर किंवा कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांच्यापैकीं प्रत्येक जण असा होता कीं, त्यांच्या कुलपरंपरेंत सरस्वतीची उपासना होती. त्यांच्या पिढ्यान् पिढ्या सरस्वतीच्या उपासनेंत गेलेल्या होत्या. जेथें सरस्वतीची सेवा हें कुलव्रतच होतें, तेथें एकादा वंशज सरस्वतीच्या विशेष कृपेंतला निघाला तर त्यांत कांहीं नवल नाहीं; परंतु नाथमाधव ह्यांचा आणि सरस्वतीचा असा कोणताही पिढीजात संबंध नव्हता. त्यांची ओळख नवीन होती–त्यांचा परिचय ह्याच आयुष्यांतील होता; आणि तोही स्वतःच्या स्फूर्तीनें नव्हे, तर आवश्यकतेमुळें ! ज्याप्रमाणें एकादा प्रवासी वाट चालतां चालतां संध्याकाळ झाली म्हणजे जेथें निवारा मिळेल तेथें वस्ती करतो, त्याप्रमाणें शरीरास भयंकर अपघात होऊन ज्या वेळीं नाथमाधवांच्या आयुष्यावर एकाएकीं संध्याकाळचा अंधार दिसायला लागला, त्या वेळीं त्यांनीं निवाऱ्यासाठीं सरस्वतीचा प्रांत धुंडाळला ! नाथमाधव व सरस्वतीदेवी यांची गांठ ह्याप्रमाणें आकस्मिकपणें पडली–नाइलाज म्हणून पडली ! पण त्याच सरस्वतीचे ते इतके प्यारे बनले कीं, तिनें आपल्या मधुमधुर स्तन्यांचा अपूर्व अमृतप्रसाद ह्या नवबालकासाठीं सहस्र धारांनीं अर्पण केला ! खरोखर तिच्या खास अपत्यांवरही तिची एवढी कृपादृष्टि झाली नसेल–वंशपरंपरेनें तिच्या प्रांगणांत बागडणाऱ्यांवरही तिची इतकी मेहरनजर कधीं झाली नसेल !

## हें तेज आगळें

तेव्हां हरीभाऊ आपटे, विष्णुशास्त्री चिपळूणकर, गडकरी किंवा विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनीं वाङ्मयांत प्रतिष्ठा मिळविणें आणि नाथमाधव यांनीं वाङ्मयांत प्रतिष्ठा मिळविणें यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे असें आम्ही

समजतों. पिढ्यान् पिढ्या ज्यांची मातृभाषा इंग्रजी आहे, त्यांच्यापैकीं एकानें टेनिसनसारखें इंग्रजी काव्य लिहिलें तर त्याचें आपण आश्चर्य मानीत नाहीं; पण देवी सरोजिनीसारखी एकादी बंगाली गुलाबकळी इंग्रजींत काव्यें रचायला लागते त्या वेळीं आपल्याला आश्चर्य वाटतें ! हमजेखानाच्या वंशांतल्या एकाद्यानें कुस्ती मारली म्हणजे आपणांस आश्चर्य वाटत नाहीं, पण ज्या वेळीं डोळ्यांवर पिन्स नेझचा चष्मा लावणारा एकादा भोपटकर चड्डी कसून दांडपट्टा खेळतो त्या वेळीं आपण तोंडांत बोट घालतों ! एकादा बॅरिस्टर एकाद्या खटल्यांत आठ आठ दिवस बोलला म्हणून आपण नवल करीत नाहीं, पण ज्या वेळीं कै. लोकमान्य बाळ गंगाधर टिळकांसारखा एकादा देशभक्त हायकोर्टांतील जज्जासमोर एकसारखे सहा दिवस भाषण करितो त्या वेळीं आपण आश्चर्यानें निपन्चित होऊन जातों ! कारण आपणास माहीत असतें कीं, हें तेज कांहीं विलक्षण आहे ! हें तेज कांहीं विशेष सामर्थ्य घेऊन आलेलें आहे !

नाथमाधव यांचा वाङ्मयप्रांतांतील प्रवेश ही अशीच आश्चर्यकारक गोष्ट होय ! ते वाङ्मयासाठीं उपजलेले नव्हते ! किंवा वाङ्मयासाठीं त्यांना शिक्षणही मिळालें नव्हतें ! त्यांनीं आपला आयुष्यक्रम पलटणींतील पराक्रमी जीवितासाठीं आंखलेला होता. आणि तो त्यांचा आयुष्यक्रम त्यांच्या मुद्रेवरूनही दिसून येण्यासारखा होता. त्यांना पाहिलें कीं हा कोणी तरी वीर पुरुष आहे, अशी त्यांच्याविषयीं भावना होऊन जात असे. तो त्यांचा तेजस्वी चेहरा, ती त्यांची उमदी मूर्ति, तो त्यांचा सहज दिसून येण्याजोगा आत्मविश्वास, तसेंच तो त्यांच्या सर्व शरीरभर दृश्यमान होणारा अदृश्य पराक्रम—हीं सर्व चिन्हें वीरवृत्तीचीं—वीर पुरुषाचीं होतीं. तेथें वाङ्मयाचा वास मुळींच नव्हता.

## नाथमाधवांची थोरवी

पण एके प्रसंगीं ते सिंहगडावर वाघाची शिकार करायला गेले असतां त्यांचा पाय घसरला–ते पडले–त्यांना भयंकर जखमा झाल्या–आणि त्यांचे पाय अजिबात लुले झाले—अशा स्थितींत मनांत विक्रमाच्या भयंकर ऊर्मि असतांही त्यांना नाइलाजानें तरवार सोडून लेखणी पत्करावी लागली !

ह्याप्रमाणें त्यांचा वाङ्मयाशीं संबंध केवळ नाइलाजानें जडला ! वरील अपघातानें ऐन पंचविशीच्या उमेदींत त्यांचे पाय जर अजिबात गेले नसते, तर ह्या वीरानें रणांगणावर तरवार, बंदुका, गोळीबार चालविला असता ! पण ऐन पंच-

विशींतच पाय गेल्यामुळें आणि त्यानंतर अनेक धन्वंतऱ्यांचे उपचार केले असतांही हें लुल्या पायांचें व्यंग कायमचेंच राहिल्यामुळें नाथमाधवांना आपलें वीर–आयुष्य वाङ्मयसेवेला वहावें लागलें! ह्याप्रमाणें ते जन्मजात लेखक नव्हते–दैवकृत लेखक होते. पण चमत्कार असा कीं, त्यांनीं समरभूमीवर जितके पराक्रम केले असते, त्यापेक्षांही जास्त पराक्रम वाङ्मयभूमीवर केले! किंबहुना ते अखेरपर्यंत लष्करी पेशांतच रहाते तर त्यांचें नांव जगास माहीतही झालें नसतें; पण आज मराठी भाषेच्या शिवशाहींत नाथमाधवांचें नांव माहीत नाहीं असा एकही मनुष्य नाहीं! रा. रा. नाथमाधव यांचें आडनांव 'पितळे' असें होतें; पण आपणांस असें अभिमानानें म्हणतां येईल कीं, जोंपर्यंत ह्या पृथ्वीतलावर मराठी भाषा अस्तित्वांत राहील, तोंपर्यंत नाथमाधवांचें नाव पितळेच्या नव्हे, सोन्याच्या अक्षरांत चमकत राहील!

—सन्देश, ता. २२-६-२८

---

# मनुष्यजन्माचें सार्थक

"मनुष्य जन्माला आल्यापासून त्याच्या एकट्याच्या पोटाची त्याला काळजी लागते. तेवढें मिळविणें फारसें कठीण नसतें. आईबाप, बायकापोरें वगैरे संसाराची काळजी नसल्यास एका फटिंगाचें पोट वाटेल तसें भरूं शकतें...परंतु त्यानें कांहीं साध्य होणार नाहीं. आपापलें उदरपोषण सर्व प्राणिमात्र करतात. इतर योनींपेक्षां मनुष्ययोनींत आलेल्या जीवाला जास्त साधन करण्याची सोय आहे. ती त्यानें व्यर्थ घालवूं नये. शेक्सपीयरनें म्हटलें आहे कीं, खावें, प्यावें आणि निजावें, एवढें मात्र करून जर कोणी रहात असेल तर तो मनुष्य कशाचा? तो माणूस नव्हे तर पशु होय."

—नाथमाधव

# नाथमाधव यांचें व्यक्तिदर्शन

[ २० ] ( लेखक—प्राध्यापक विश्वनाथ गोपाळ शेट्ये
बी. ए. एल्एल्. बी. )

## मरणिं अमरता—

या जगांत ज्यांना लाभते त्यांना आठवणींच्या रूपानें इतिहासांत अमर होण्याचें भाग्य लाभतें. दृष्टीआड सृष्टि झाली कीं ती विस्मृतीचा विषय बनते. तरी पण कविवर्य तांबे यांच्या या शब्दांत 'मरणिं अमरता' राखून जे सृष्टींतून दृष्टिआड होतात, अर्थात् जगाच्या दृष्टीनें मरूनही जे स्मृतिरूपानें मागें उरतात, त्यांच्याच आठवणी लिहिल्या जातात. असलें भाग्यशाली मरण आमच्या मराठी साहित्यसृष्टींत ज्या थोड्याफार साहित्यिकांना लाभलें त्यांत माझे स्नेही नाथमाधव यांची प्रामुख्यानें गणना करण्याइतकी त्यांची वाङ्मयीन पुण्याई थोर आहे; पण—

## नाथांची महनीयता—

केवळ त्यांच्या वाङ्मयीन पुण्याईतच आहे असें मात्र मी मानीत नाहीं. त्यांचा मोठेपणा बहुविध आहे. ते जितके थोर साहित्यिक तितकेच ते थोर माणूस होते. जितके श्रेष्ठ दर्जाचे कादंबरीकार तितकेच ते सच्चा दिलाचे स्नेही होते. नाथांच्या पहिल्या प्रभावळींत जीं कांहीं थोडींफार माणसें होतीं तीं त्यांच्या बुद्धीपेक्षां त्यांच्या हृदयानें त्यांच्याकडे आकर्षिलीं गेलीं होतीं; हें मी स्वानुभवानें म्हणूं शकतों. आजच्या नव्या पिढीला त्यांचें वाङ्मय वाचून त्यांच्या मोठेपणाची जी प्रचीति येईल, ती एकांगी ठरेल. नाथ हे एक नामवंत कथालेखक आणि अव्वल दर्जाचे कादंबरीकार होऊन गेले, एवढेंच फार तर त्यांना कळेल. पण त्यांच्या आजच्या कादंबरी-वाचकांना तेवढ्यानें त्यांची खरी थोरवी थोडीच कळणार आहे ? नाथांसारखा मोकळ्या मनाचा, निष्पाप दिलाचा, भोळा प्रेमळ जीव, तसेंच निष्कपटी आणि निर्मत्सरी सुहृद व दिलदार आणि उदार माणूस विरळा.

केवळ बुद्धीचा प्रकर्ष साधून उत्तमोत्तम कादंबऱ्या लिहिणारे कथालेखक मागें झाले असतील आणि पुढेंही होतील; पण त्याबरोबरच हृदयाच्या दैवी संपत्तीचा अमोल ठेवा बाळगणारे मराठी कवींत बालकवि ठोमरे आणि कथावाङ्मयांत एक नाथमाधवच होऊन गेले असें मी मानतों. यांत कुणाला अतिशयोक्ति वाटेल; पण नाथांच्या सहवासांत जे माझे थोडेफार दिवस गेले, त्या वेळच्या अनुभवानें आणि निरीक्षणानें त्यांच्याविषयीं बनलेलें हें माझें प्रामाणिक मत आहे.

## माझी प्रथम भेट–

सन १९१० सालीं झाली. ही भेट योगायोगानें घडून आली असें म्हणण्यापेक्षां भेटीचा योग मींच आपण होऊन घडवून आणिला. पुढें कालांतरानें नाटककार मामा वरेरकर आणि आप्पा टिपणीस यांना नाथांच्या घरीं नेऊन मींच त्यांची ओळख करून दिली होती; पण माझी ओळख त्या वेळीं मलाच करून द्यावी लागली.

मी त्या वेळीं कॉलेजचा विद्यार्थी होतों. त्या काळीं विद्यालयीन अगर महाविद्यालयीन शिक्षणक्रमांत मराठी भाषेला स्थान नव्हतें. त्यामुळें घरीं मराठीचा खाजगी व्यासंग करणारा मुलगा परीक्षेचा अभ्यास सोडून नादी बनला, बिघडला, असाच पालकांचाही समज असे; आणि म्हणून त्यांचा रोष टाळण्यासाठीं अभ्यासाच्या पुस्तकांखालीं मराठी कथावाङ्मयाचीं पुस्तकें ठेवून तीं मुलांना चोरून वाचावीं लागत असत. अशाचपैकीं मीही मराठीचा चोरून व्यासंग करणारा एक विद्यार्थी होतों.

आज मराठी मासिकांचा आणि नियतकालिकांचा सुळसुळाट झालेला आहे. त्या काळीं मराठींत कथावाङ्मयास वाहिलेलें 'मासिक मनोरंजन' हें एकच मासिक होतें. त्यांतील संपूर्ण गोष्टी वाचून आपणही एकादी गोष्ट लिहावी असें वाटून मीं एक 'अभागी सुशीला' नांवाची गोष्ट लिहिली आणि ती प्रसिद्धीला देण्यापूर्वी कुणा तरी साहित्यिकाला दाखवावी असें ठरविलें. त्या वेळीं माधवबागेंतील नाथांच्या एक आणा मालेंतील कथा प्रकाशित करणारे केतकर यांचा 'वुड एनग्रेव्हर' या नात्यानें संबंध असलेले माझे स्नेही निळकंठ भाऊ गांधी यांनीं मला नाथांचें नांव सुचविलें आणि त्यांच्याकडूनच नाथांच्या घराचा पत्ता घेऊन मी त्यांना जाऊन भेटलों.

## माझ्याकडे कां आलांत ?

माधवबागेच्या नाक्यावर पितळे यांचा एक मोठा बंगला आहे. त्यांत रस्त्याला लागून माडीवरील एका खोलींत मी गेलों; त्या वेळीं नाथमाधव लेखन करीत बसले

होते. कोणत्या तरी एका कादंबरीचें त्यांचें लेखन चाललें होतें असें स्मरतें. जांभळ्या शाईनें आणि नऊ नंबरच्या 'ओ' च्या टांकानें गोल अक्षरांत मोठ्या टापटिपीनें लिहिलेला अर्धा बंद टेबलावर होता. हातांतील टांक तसाच खालीं ठेवून त्यांनीं माझी विचारपूस केली. माझ्या भेटीचा मूळ हेतु समजून येतांच ते विनोदबुद्धीनें म्हणाले, "अहो, तुम्ही कॉलेजचे विद्यार्थी! माझें शालेय शिक्षणही पुरें झालेलें नाहीं असा सामान्य माणूस मी! असें असतां तुम्ही माझ्याकडे आलांत?"

"होय," मीही उत्तरलों. "आमच्या कॉलेजांत आम्हांला जें मिळत नाहीं, तें मिळण्याचें हें स्थळ आहे असें कळलें, म्हणूनच मी इथें आलों आहें!"

नाथ या वेळीं अगदीं मनमोकळेपणीं हंसले. या त्यांच्या हास्यांतच मला नाथांच्या स्वभावांतील मोकळेपणा आणि त्यांचें व्यक्तिमत्त्व यांचें प्रथम दर्शन घडलें!

पुढें थोडा वेळ बोलणें झाल्यावर व त्यांनीं उद्यां पुन्हां या, तोंवर मी तुमचें लिखाण वाचून ठेवतों, असें सांगितल्यावर टेबलावर माझें हस्तलिखित ठेवून "माझें काम झालें आहे, आतां मी येऊं?" असें म्हणून मी जाण्यासाठीं उठलों.

तोंच ते म्हणाले, "बसा हो!"

इतक्यांत मी समोरच्या भिंतीवर टांगलेल्या पाटीकडे बोट दाखवून म्हटलें, "मीं आपला अधिक वेळ घेतला तर आपल्या व्यवसायांत व्यत्यय येईल. तेव्हां मी आपला निरोप घेतों."

त्या पाटीवर "कामाशिवाय येथें कोणीं बसूं नये" अशीं ठळक अक्षरें होतीं.

ते पुनश्च हंसले आणि म्हणाले, "बसा हो! ही पाटी तुमच्याकरितां नाहीं. रिकामटेकड्या गप्पा मारण्यास येथें येऊन माझा फुकट वेळ घेणाऱ्यांसाठीं ती पाटी आहे. ज्या व्यवसायांत मी गुंतलों आहें, त्याच व्यवसायबुद्धीनें तुम्ही येथें आलां आहांत. शिवाय विद्वान् माणसांना त्यांच्या घरीं जाऊन भेटावें असें माझ्या मनांत आलें तरी मला तें शक्य नाहीं. अशा स्थितींत तुमच्यासारखी विद्याव्यासंगी मंडळी आपण होऊन आली, तर त्यांत मलाही अलभ्य लाभ आहे असें मी मानतों. —बसा!"

नाथांच्या या शेवटच्या उद्गारांतील खोंच मला त्या दिवशीं तरी कळली नाहीं. मी पुन्हां दुसऱ्या दिवशीं त्यांच्याकडे गेलों तेव्हां त्यांच्या बोलण्यांतील इंगित मला समजलें.

## मनीषा एक आणि नियति अन्य !

अशीच नाथांच्या जीवनाला कलाटणी मिळाली होती. ती त्यांना लेखक बनविणारी विधिघटना मला दुसऱ्या दिवशीं अगदीं अजब अशा नाट्यप्रसंगानें कळली. मी जातांच माझ्या गोष्टीची व लेखनाची नाथांनीं प्रशंसा केली; आणि हा माझा प्रथम प्रयत्न आहे तेव्हां मला उत्तेजन मिळावें म्हणून कुणीतरी प्रकाशक गांठून देण्याचेंही अभिवचन त्यांनीं मला दिलें. परंतु मला प्रकाशक नको होता. माझे त्या वेळचे तरुण व्यापारी मित्र श्री. दत्तात्रय गोविंद लुब्री यांनीं ती वाचून पूर्वींच छापण्याचें ठरविलें होतें; पण ती छापली जाण्यापूर्वी कुणातरी अधिकारी लेखकाच्या नजरेखालून जावी एवढ्या एकाच मनीषेनें मी नाथांकडे आलों होतों, हें त्यांना समजून सांगून व त्यांचे आभार मानून निघतांना मीं सहज म्हटलें, "एकसारखें या खुर्चीवर बसून बसून कंटाळा येत नाहीं का ? चला आपण थोडा वेळ चौपाटीवर फिरायला जाऊं !"

इतकें मीं बोलतांच नाथ आपल्या नित्य सरावाप्रमाणें मुक्त कंठानें हंसूं लागले. त्या वेळीं त्यांच्या अंगांत शर्ट आणि खालीं पायजमा होता. हंसत हंसतच त्यांनीं खुर्ची फिरविली आणि पायजम्याकडे नजर टाकीत ते उद्गारले, "पहा ! अहो ! ही खुर्ची हेंच माझें घर आणि ही चौपायी हीच माझी चौपाटी !"

तरीही मला तितकासा उमज पडला नाहीं. नंतर ते बाजूला असलेली कुबडी घेऊन कुबडीच्या आधारें लंगडत लंगडत दाराशीं जाऊन आणि आपल्या पुतणीला चहाची वर्दी देऊन तसेच लंगडत येऊन खुर्चीवर बसले. मला तर तो प्रकार पाहून धक्काच बसला !

## अपघाताची हकीगत

त्यानंतर त्यांनीं आपल्या सिंहगडावरील अपघाताची आणि त्या अपघातांत जिवावरच बेतलें होतें, पण शेवटीं पाय लुळे होण्यावरच कसें निभावलें, याची साद्यंत हकीगत सांगितली. अनेक स्नेह्यांनीं ती हकीगत साद्यंत आपल्या आठवणींत दिली असल्यामुळें तिची पुनरुक्ति मी करीत नाहीं. ती साग्र हकीगत त्यांचेच तोंडून त्या वेळीं ऐकून मी तर अगदीं स्तंभित झालों, आणि कुणीही सहृदय माणूस रोमांचित होईल अशीच ती घटना होती.

आयुष्याच्या ऐन उमेदींत पराक्रम करून नांवलौकिक मिळवावा या मनीषेनें हातांत बंदूक घेऊन त्यांनीं लष्करी पेशा स्वीकारला; पण नियतीनें त्यांच्या मनीषेला ठोकर देऊन, त्यांच्या हातीं लेखणी दिली आणि त्यांना लेखक बनविलें!

## नाथांचें खरें चरित्र आणि चारित्र्य

ऐन उमेदींत अपघातानें त्यांचेवर आलेल्या या दैवी प्रसंगांतच आहे! अपघात-पूर्वकालीन आणि तदनंतर घडलेला त्यांचा जीवन–चित्रपट ज्यांच्या नजरेसमोर आहे, असा कुणीही लेखक असेंच म्हणेल कीं, त्यांच्या जीवनाला ऐन जवानींत कलाटणी देणाऱ्या या निर्घृण विधिघटनेंतच नाथांचें खरें चरित्र आणि चारित्र्य आहे. त्यांच्या सुस्वभावाचे विविध पैलू याच प्रसंगाच्या दुर्बिणींतून स्पष्ट पहायला मिळतात. धीरगंभीर प्रवृत्ति आणि झुंजारवृत्ति मिळूनच नाथांचा असामान्य पिंड बनलेला होता. नाहींतर कुणीही लेचापेच्या मनोवृत्तीचा सामान्य माणूस या घोर आपत्तीनें कोलमडून नामशेष झाला असता! प्राप्त परिस्थितीशीं टक्कर द्यायला लागणारें धैर्य आणि झुंजारवृत्ति, तसेंच प्राप्त परिस्थितींत समाधानवृत्ति, हे अजब गुण त्यांच्या ठायीं होते आणि यांतच त्यांच्या यशस्वी जीवनाचें रहस्य आहे.

## नियतीचा निर्णय

जिवावरच्या अपघातानंतर हॉस्पिटलमध्यें याच गुणामुळें ते जगूं शकले आणि बरे होऊन घरीं आले ते अपंग! परावलंबी जीवन कंठण्याचा अघोर प्रसंग गुदरलेला! त्यांच्या वडील बंधूंनीं त्यांना आपल्या घरीं आणलें होतें, आणि त्यांना जन्मभर पोसण्याची त्यांची तयारी व ताकत होती. बंधूच्या रूपानें देव त्यांचा पाठिराखा होता. पण नाथांच्या मानी मनाला हें पटेना. सांप्रतच्या आर्थिक परिस्थितींत आपल्या बंधूवर सर्वस्वी भार टाकून जीवन कंठण्याचें त्यांना रुचेना! 'ठेविलें अनन्तें तैसेंचि रहावें' या न्यायानें प्राप्त स्थितींत समाधानवृत्तीनें रहावें, पण स्वाभिमानानें जगावें, हा त्यांचा बाणा! या बाणेदार मानी स्वभावानुसार, आपल्या पोटापुरतें तरी कसें कमवितां येईल या विचारानें त्यांनीं कांहीं रात्री जागून काढल्या. देहाच्या त्या अपंग स्थितींत, बसल्या जागीं, पोटापुरता कोणता व्यवसाय करतां येईल या विचारांत असतां, नियतीनें त्यांना लेखनाचा मार्ग सुचविला. नियतीनें त्यांना हा मार्ग सुचवला असें मी म्हणतों, कारण नियतीनेंच तशी पूर्वयोजना केली होती. या अपघातानें कमरेखालीं विशेषतः पायांना

अधूपणा आला होता. पण डोकें आणि उजवा हात देवदयेनें शाबूद राहिलीं होतीं ! तरीही एवढ्या सामुग्रीवर काय होणार ? नाथांचें शालेय शिक्षण जेमतेम मॅट्रिकपर्यंत झालेलें होतें आणि तेंही पुढें लष्करीपेशा घेण्याच्या मनीषेनेंच.

पण बुद्धि आणि परिश्रम हें काय कमी भांडवल आहे ? एकदां एक कल्पना सुचल्यावर ते त्या तयारीला लागले आणि आरंभींचे कांहीं दिवस मराठी इंग्रजी कादंबऱ्यांचें वाचन आणि मराठी भाषेचें व्याकरण, शुद्धलेखन वगैरेचा परिश्रमपूर्वक अभ्यास करून, आपल्या मतें अल्प सामुग्रीवर कथावाङ्मय-लेखनाला त्यांनीं सुरवात केली, आणि आमरण चिकाटीनें आणि दीर्घ परिश्रमानें हरीभाऊ आपटे यांचे समकालीन श्रेष्ठ दर्जाचे कादंबरीकार असा आपला लौकिक मराठी साहित्यसृष्टींत प्रस्थापित केला. देहानें अपंग अशा माणसाकडून झालेली ही काय थोडी अजब कामगिरी किंवा कमी मोलाची कर्तबगारी आहे ?

## लेखन हा व्यवसाय—

आमच्या मराठींत आजही समाधानकारक होऊं शकत नाहीं. मधल्या काळांत मोठ्या नाटक मंडळींत ज्यांचीं नाटकें रंगभूमीवर येऊं शकलीं असे नाटककार व आजचे मराठी पटकथालेखक यांनाच जो कांहीं कथावाङ्मयलेखनावर द्रव्यलाभ झाला अगर होत असेल तो सोडला तर इतर लेखकांची दैना आहे. माझी आणि नाथांची पहिली ओळख झाली त्या वेळीं त्यांच्या एक दोन कादंबऱ्या लिहून झाल्या होत्या व कांहीं आणामालेचे उपन्यास त्यांनीं लिहिले होते. त्या काळांत लेखनावर उपजीविका करण्याचा निर्धार हें एक धार्ष्ट्य आहे असें मला वाटलें आणि मीं तसें त्यांना बोलूनही दाखविलें; पण त्या बाबतींत त्यांचा आत्मविश्वास दांडगा ! परंतु त्यांचेही या दृष्टीनें हाल झाले नाहींत असें नाहीं. प्रकाशकांकडून योग्य वेळीं आणि योग्य तऱ्हेनें मोबदला पोहोंचू न शकल्यानें त्यांना क्लेश झाले नाहींत असें नाहीं. असें असलें तरी ज्या ध्येयबुद्धीनें आणि ज्या परिस्थितींत नाथांनीं हा व्यवसाय पत्करला होता तें त्यांचें ईप्सित त्यांच्यासारख्या समाधानी वृत्तीच्या माणसाच्या बाबतींत तरी पुरें झालें, असेंच म्हणावें लागेल. परिस्थित्यनुरूप उपजीविकेसाठीं त्यांनीं लेखणी हातीं घेतली असली तरी केवळ वाङ्मयसेवेसाठीं निघालेल्या मासिकांना त्यांनीं निःस्वार्थपणें मदत केलेली आहे. हा अनुभव मला मीं 'वैश्य मासिक' काढून चालविलें तेव्हां आला. त्या वेळीं गंगाराम शिरसाट या नांवाचे माझे एक स्नेही होते. त्यांनीं 'उद्यान' मासिक काढण्याचें ठरवून तें पुढें काढलेंही. शिरसाट मला घेऊन

नाथांकडे मदतीसाठीं गेले. त्यांना आम्हां दोघांचेंही लेखनसहाय्य हवें होतें. पण मालकीचा, नफ्याचा अगर मोबदल्याचा प्रश्न गुलदस्तांत ठेवून ते बोलत होते. त्या वेळीं स्नेही या नात्यानें नाथांनीं मला सुचविलें कीं, दुसऱ्याच्या घरांत आपलें बिऱ्हाड ठेवण्यापेक्षां आपला संसार आपल्या स्वतःच्या मालकीच्याच घरांत थाटावा हें बरें.

त्यानंतर उद्यानाचा नाद सोडून 'वैश्य मासिक' काढलें तें नाथांच्याच प्रोत्साहनानें आणि मदतीनें. नाथांना मासिकाच्या प्राप्तीच्या मानानें मीं मोबदला पोंचविला. पण तो इतका अत्यल्प होता कीं, त्यांनीं मासिकाला केलेली मदत मामा वरेरकर यांनीं केलेल्या मदतीप्रमाणें केवळ वाङ्मयसेवेच्या बुद्धीनें केली, असेंच मी मानतों.

## नाथांची दिनचर्या–

अगदीं आंखीव आणि रेखीव अशीच होती. लेखन, वाचन आणि आल्यागेल्यांच्या गांठीभेटी हाच त्यांचा नित्यक्रम. त्यांचें दैनंदिन वेळापत्रकही असे. पण भेटीस येणाऱ्या लोकांच्या वेळीं-अवेळीं येण्यानें वेळेपुरतें गडकऱ्यांच्या कंकणच्या भाषेंत 'कांहीं इकडचे असामी जागा सोडून तिकडे झाले' तरी आपलें लेखनाचें संकल्पित काम ते दुसरा दिवस उजाडण्यापूर्वीच पुरें करून ठेवीत. छापखान्याशीं संबंध असल्यामुळें तसें त्यांना करावेंच लागे.

नाथांना कांहीं विशिष्ट संवया ( Hobbis ) होत्या. ते लेखन करीत तें केव्हां व कसें ? शाई कोणत्या रंगाची, टांक व कागद कसला वापरीत यासंबंधीं, तसेंच त्यांना ज्योतिषाचा व स्वप्नार्थ शोधण्याचा यासारखे कांहीं नादही कसे होते यासंबंधीं अगर त्यांचीं विशिष्ट मतें आणि चर्चेचे विषय यासंबंधींच्या अनेक आठवणी सांगतां येतील. व त्या अनेकांनीं सांगितल्याही असतील. पण नव्या पिढीला नाथांचें यथार्थ व्यक्तिदर्शन व्हावें या एकमेव हेतूनें हा स्मृतिलेख मी लिहीत असल्यामुळें पहिल्या दोन दिवसांच्या भेटीच्या प्रसंगांचें वर्णन मीं तपशिलानें केलें आहे. या पहिल्याच भेटीच्या वेळीं नाथांच्या स्वभावांतील विविध अंगोपांगांचें आणि व्यक्तित्वाचें दर्शन मला घडलें तेंच अखेरपर्यंत टिकलें. त्यांचा ध्येयवाद, व्यासंग, दीर्घ परिश्रम, सोशिकता, चिकाटी, स्वाभिमान आणि सर्वांत अधिक म्हणजे मनाचा मोकळेपणा आणि प्रेमळपणा या अगर उपरिनिर्दिष्ट अशा अनेक गुणांत जसे नाथमाधव मला दिसले तसेच सुखदुःखाच्या अनेक प्रसंगांत 'संपूर्ण नाथमाधव' मलाच काय पण अनेकांना पहा-

यला मिळाले असें मी समजतों. माझ्यापूर्वी अनेकांनीं नाथांच्या आठवणी दिल्या आहेत आणि म्हणूनच स्थलाभावामुळें व पुनरुक्तीचा दोष टाळावा म्हणून यापुढें कांहीं वेंचक आणि माझ्यापुरते संस्मरणीय एवढेच प्रसंग निवडून हा लेख आटोपता घेणार आहें.

## कादंबरी कीं नाटक?—

असें द्वंद्व नाथांच्या मनांत कांहीं काळ चालू होतें, हें सत्य आहे. कादंबरी-लेखनानें नाथांनीं आपल्या वाङ्मयसेवेला सुरवात केली आणि माझी ओळख झाली त्यावेळपर्यंत कादंबरीकार या नात्यानें त्यांनीं लौकीकही मिळविला; पण तदनंतरच्या काळांत त्यांचें हें लिखाण चालू असतां, नाटककारांना कादंबरीकारा-पेक्षां भारी मोठ्या प्रमाणावर मोबदला मिळतो असें पाहून, कादंबरी-लेखनाकडून आपली लेखणी नाट्यलेखनाकडे वळवावी असें सहाजिकच त्यांना वाटूं लागलें.

त्या काळांत नाथांच्या घरीं माझी दर रविवारीं नित्यनेमानें एक खेप असे. महाराष्ट्र नाटक मंडळीचे मालक श्री. आप्पासाहेब टिपणीस हे आपली भारत कंपनी मोडून नवीन आर्यावर्त नाटक मंडळी काढण्याच्या विचारांत होते. आप्पांचा व माझा स्नेहसंबंध होता. एक दिवस नाथांकडे बोलत बसलों असतां मी म्हणालों, "आप्पा आपल्या नव्या कंपनीच्या सुरवातीला शिवाजीची प्रमुख भूमिका आपल्यासाठीं निव-डून शिवकालीन कथानकावर एक नाटक लिहिण्याच्या तयारींत आहेत."

## ऐतिहासिक कादंबरी-माला

त्यानंतर पुढल्या रविवारीं मी गेलों त्या वेळीं नाथ आपल्या टेबलावर असलेले भारत इतिहास संशोधक मंडळानें प्रकाशित केलेले खंड व इतर ऐतिहासिक पुस्तकें दाखवून मला म्हणाले, "हें पहा, ऐतिहासिक एकच कादंबरी लिहावी असा माझा पूर्वसंकल्प होता, पण आतां ऐतिहासिक कादंबऱ्यांची खंडशः माला प्रसिद्ध करावी असें मीं ठरविलें आहे."

हें ऐकून मला आनंद झाला आणि त्यांचा व्यासंग चालू झाला. पण याच्यापूर्वी आपण एकादें ऐतिहासिक नाटक लिहावें कीं कादंबरीमालाच चालू ठेवावी असें द्वंद्व त्यांच्या मनांत कांहीं काळ चालू झालें.

मींही त्यांना नाटक लिहा, आपण आप्पांच्या कंपनींत तें आणण्याची खटपट करूं असें म्हटलें; आणि तसा प्रयत्नही केला; पण जमेना. आप्पांचें पहिलें ऐतिहासिक

नाटक 'चंद्रग्रहण' पुण्यास यशस्वी होऊन मंडळी मुंबईस आली होती; आणि आप्पा आपलें दुसरें ऐतिहासिक नाटक 'राज्यारोहण' बसवीत होते. तेव्हां त्यांना नव्या ऐतिहासिक नाटकाची जरुरी नव्हती. राज्यारोहणानंतर त्यांना सामाजिक अगर काल्पनिक कथानकाची जरुरी होती. आणि माझें 'लोकशासन' नाटक त्यांनीं काढण्याचें ठरविलें होतें व पुढें तें काढलेंही.

## डाव कसा हुकला ?

नाथांना मीं स्वतः नेऊन चंद्रग्रहण व राज्यारोहण हीं दोन्ही नाटकें दाखविलीं होतीं. माझें 'लोकशासन' नाटक बसत असतां मी आप्पांकडे पुनश्च नाथांच्या नाटकाचा प्रश्न काढला, त्या वेळीं आप्पांनीं मला आपलें हृद्गत व्यक्त केलें. त्यांची दृष्टि धंदेवाईक होती; आणि त्या दृष्टीनें त्यांचें प्रामाणिक मत असें होतें कीं, उत्तम नाटककार उत्तम कादंबरीकार होऊं शकेल, पण शब्दपाल्हाळ ( Verbosity ) हा कादंबरीचा आत्मा तर शब्दसंक्षेप ( Brevity ) हा नाटकाचा आत्मा असल्यामुळें उत्तम कादंबरीकार हा उत्तम नाटककार होऊं शकेलच असें सांगतां येणार नाहीं. ही त्यांची भीति अगदींच निराधार नव्हती, हें पुढील अनुभवानें सिद्ध झालें आहे. कादंबरी क्षेत्रांत असामान्य यश मिळविलेले श्री. फडके अगर श्री. खांडेकर यशस्वी नाटककार होऊं शकले नाहींत,—मात्र उलटपक्षीं श्रेष्ठ दर्जाचे नाटककार श्री. मामा वरेरकर हे कादंबरीक्षेत्रांतही तितक्याच प्रभावानें चमकले... तेव्हां मीं आप्पांना म्हटलें कीं नाथांचें नाटक वाचून तर पहा; पण मानी मनाचे नाथ वाचून नापसंतीचा धोका घेण्यास तयार होईनात आणि तो योग कांहीं जुळून येईना. तरीही नाथांनीं 'लोकसंग्रह', 'जातिवंत मराठा वीर' यांसारखीं नाटकें लिहिलींच.

## नाथमाधव-युग

लोकमान्य नाटक मंडळींत त्यांचें 'लोकसंग्रह' नाटक कसें येऊं शकलें नाहीं याची आठवण श्री. ना. वि. कुलकर्णी यांनीं दिलीच आहे. 'जातिवंत मराठा वीर' हें त्यांचें नाटक शाहुनगरवासीमध्यें आणि 'लोकसंग्रह' आनंदविलासमध्यें आलें. पण 'विनोद' आणि 'म्युनिसीपालिटी'च्या धूमधडाक्यांत नाथांचें हें गंभीर प्रसंगाचें नाटक टिकाव धरूं शकलें नाहीं. कारणें कांहींही असोत; नाथांनीं कादंबरीचा आपला वैभवाचा आणि सन्मानाचा संसार मोडून या नकली, नाटकी, दिखाऊ वैभवाकडे वळणें आत्मघातकी होईल व त्यांच्या लेखणींतून निघणाऱ्या ओजस्वी,

तेजस्वी कादंबऱ्यांना मराठी वाङ्मय मुकेल या दृष्टीनें त्यांची 'कादंबरी कीं नाटक ?' या द्वंद्वांतून लौकरच मुक्तता व्हावी असें त्यांना पटवून देण्याच्या माझ्यासारख्या स्नेह्याच्या प्रयत्नास यश आलें आणि मनाचा विकल्प सोडून त्यांनीं आपल्या पूर्व-संकल्पाला वाहून घेऊन एकापेक्षां एक अधिक तेजस्वी कादंबऱ्या लिहून हरी-भाऊंच्या आणि फडके-खांडेकरांच्या कालखंडांत "नाथमाधव-युग" निर्माण केलें, आणि त्याचबरोबर मराठी कादंबरी-वाङ्मयांत आपलें नांव अजरामर केलें.

## नाथ अल्पायु—

गेले आणि मराठी साहित्याची मोठीच हानी झाली. अल्पायु गेल्यामुळें तिघांच्या अकालीं निधनानें अशी हानी झाली आहे. कवींमध्यें बालकवि ठोमरे, नाटककारां-मध्यें गडकरी आणि कादबंरीकारांत नाथमाधव. गडकऱ्यांच्या अकालीं निधनामुळें एकच प्याला नाटकांतील पदें, 'राजसंन्यास' नाटक अपुरें आणि कितीतरी संक-ल्पित नाटकांना महाराष्ट्र मुकला. तीच स्थिति नाथांच्या निधनानें कादंबरी क्षेत्रांत झाली. शिवकालीन कथानकें संपल्यावर संपूर्ण पेशवाई कादंबरीरूपानें पूर्ण करावी असा नाथांचा संकल्प होता; आणि तो पुढें त्यांचे तरूण मित्र श्री. हडप यांनीं पूर्ण केला, ही गोष्ट वेगळी. पण नाथांची मनीषा अपुरी राहिली ती राहिलीच! आणि म्हणून नाथांच्या त्या पुढील वाङ्मयाला महाराष्ट्र मुकला हें निर्विवाद आहे.

## नाना आणि नाथ—

दैवज्ञ समाजाला भूषणभूत असे हे दोन थोर पुरुष होऊन गेले. एक ना. नाना शंकर शेट आणि दुसरे नाथ-माधव. दोघांचें कार्य वेगळें, परिस्थिति वेगळी व मिळविलेला लौकिकही वेगळा. पण या दोघांचें एकत्र नांव मला सुचण्याचें कारण असें कीं, हे दोघेही केवळ जातीसाठीं झिजले नसून नाना महाराष्ट्रांतील आम जनतेसाठीं आणि नाथ अखिल मराठी वाङ्मयासाठीं झटले आणि नांवलौकिकास आले. दोघांमध्यें आणखी एक साम्य आहे. दोघांची थोरवी त्या दृष्टीनें सारखीच आहे. ते दोघेही वंशाच्या उपनांवानें ओळखले जात नसून प्रत्येकानें आपल्या नांवानें एक नवी वंशशाखा निर्माण केली. नानांचें उपनांव मुर्कुटे व नाथांचें उपनांव पितळे; पण या मुर्कुटे वंशांत नानांनीं नाना शंकर शेट ही वंशशाखा निर्माण केली आणि नाथांनीं आरंभीं कोणत्याही हेतूनें कां होईना, पण नाथमाधव या टोपण नांवानें दैवज्ञ समाजांतील पितळे वंशांत—फार काय पण मराठी कथा वाङ्मयांतील

व्यक्ति आणि वाङ्मय विभागांत एक स्वतंत्र उपशाखा स्थापून नवें नाथमाधव युग निर्माण केलें; ही काय कमी थोरवी ?

## व्यक्ति आणि वाङ्मय—

अशी दुहेरी ओळख कुणाही साहित्यिकाची करून देण्यांत येते. लेखकाच्या वाङ्मयाची ओळख समीक्षा-ग्रंथानें होते; आणि व्यक्तीची खरी ओळख अशा या आठवणी-ग्रंथानें होते.

नाथांच्या कादंबऱ्यांचें वाङ्मयीन समीक्षण आज ना उद्यां होईल अशी मी आशा बाळगतों. त्या दृष्टीनें आजवर उपेक्षा झालेल्या माझ्या या कादंबरीकार मित्राकडे नाथांचे एक निस्सीम चहाते आणि या आठवणींचे संग्राहक श्री. पु. बा. कुळकर्णी यांच्या दीर्घ व चिकाटीच्या प्रयत्नानें कां होईना पण विद्यमान विश्वविद्यालयीन विद्वान प्राध्यापकांचें लक्ष वेधलें जात आहे, ही आशादायक घटना आहे. त्यांच्या शिफारशीनें नाथांचीं पुस्तकें जर विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमांत घेण्यांत आलीं तर त्यांच्या वाङ्मयीन ग्रंथांचें समीक्षण होणें सुकर होईल. आणि नाथांच्या कादंबऱ्यांचें यथार्थ मूल्यमापन मराठी वाचकांस वाचायला मिळून नाथांची खरी वाङ्मयीन महनीयता जगापुढें येईल. स्नेही आणि सामान्य वाचक या दृष्टीनें तरतमभावांत न शिरतां मी आज या लेखांत एवढेंच म्हणूं शकेन कीं, हरीभाऊंच्या हयातींतही हरीभाऊंचा समकालीन म्हणून एक श्रेष्ठ व तितकाच लोकप्रिय कादंबरीकार असा नांवलौकिक नाथांनीं मिळविला, हीच त्यांची वाङ्मयीन महनीयता !

व्यक्ती या दृष्टीनें त्यांची थोरवी त्यांच्या वाङ्मयीन पुण्याईपेक्षां अधिक आहे हें मीं या लेखाच्या प्रारंभींच सांगितलें आहे. नाथमाधव या व्यक्तीची खरी ओळख नव्या पिढीला व्हावी या दृष्टीनें त्यांच्या समकालीन निकटवर्ती स्नेह्यांच्या व परिचित अधिकारी लेखकांच्या आठवणी व लेख परिश्रमपूर्वक मिळवून ते या ग्रंथांत प्रकाशित करण्यानें माझे मित्र श्री. पुरुषोत्तम बाळकृष्ण कुळकर्णी यांनीं फारच थोर कामगिरी केली आहे, असें मी मानतों. आणि याच दृष्टीनें मी त्यांचें अभिनंदन करून हा स्मृतिलेख संपवितों.

---

# नाथमाधवांच्या सामाजिक कादंबऱ्यांतील कांहीं महत्त्वाचे विशेष

[ २१ ] ( लेखिकाः—प्रा. सौ. **चारुशीला गुप्ते**, एम्. ए. )

कै. नाथमाधवांनीं आपल्या सामाजिक व ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या द्वारें मराठी कादंबरीचें दालन भव्य आणि विस्तृत केलें; परंतु त्यांच्या वाङ्मयसेवेचा सत्कार रसिकांकडून ज्या प्रमाणांत व्हावयास पाहिजे होता त्या प्रमाणांत झाला नाहीं असें खेदपूर्वक म्हणावें लागतें. महाराष्ट्रशारदेच्या दरबारांत त्यांना उपेक्षित मानकऱ्याचीच जागा देण्यांत आली आहे. एकादी दुसरी कादंबरी लिहूनही ज्यांचा अपूर्व गौरव करण्यांत आला आहे असे बरेच कादंबरीकार दाखवितां येतील ! परंतु केवळ संख्येनेंच नव्हे तर वाङ्मयीन मूल्याच्या दृष्टीनेंही ज्यांनीं मराठी कादंबरीला नवबहार आणला, त्या नाथमाधवांना प्रत्येक जाणत्या रसिकानें अवश्य मुजरा करावयास हवा.

## एक श्रेष्ठ दर्जाचे कादंबरीकार

मराठी कादंबरी-क्षेत्रांतील वास्तववादी युगाला हरीभाऊंनीं सुरवात केली. मध्यम वर्गातील महाराष्ट्रीय जीवनाचीं सत्य व यथायोग्य चित्रें त्यांनीं आपल्या सामाजिक कादंबऱ्यांतून रेखाटून आपल्यापुढें मांडलीं आणि सामाजिक कादंबरीची एक परंपरा निर्माण केली. याच परंपरेंतील एक अग्रेसर लेखक म्हणून कै. नाथमाधव यांचा गौरवानें उल्लेख करण्यांत येतो. या युगपरंपरेचे बरे वाईट विशेष नाथमाधवांच्याही कादंबऱ्यांतून दिसणें अपरिहार्य आहे. परंतु आपल्या युगाच्या प्रतिनिधित्वाबरोबरच त्यांची सामाजिक कादंबरी स्वतंत्र व वैशिष्टयपूर्ण असें वाण आपल्याबरोबर घेऊन आली. एक श्रेष्ठ दर्जाचे सामाजिक कादंबरीकार म्हणून नाथमाधवांचा जो उल्लेख करण्यांत येतो, त्यांतील रहस्य हें आहे व त्याचाच उहापोह प्रस्तुतच्या संक्षिप्त लेखांत करावयाचा आहे.

## कुटुंबव्यवस्थेचा टीकाकार

कै. नाथमाधव ज्या काळांत वावरले तो काळ सामाजिक सुधारणेचा होता. बालविवाह, प्रौढविवाह, जातिभेद, स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह वगैरेसारख्या त्या काळांतील अनेक जिव्हाळ्याच्या समस्या तत्कालीन जाणत्या समाजसेवकांपुढें उभ्या

होत्या. स्त्रीपुरुषांच्या वैयक्तिक व सामाजिक परस्पर संबंधांसंबंधीं खल होत होता. या सर्व सामाजिक चळवळींचे पडसाद तत्कालीन वाङ्मयांत उमटणें अटळ होतें. कादंबरीकार हा मानवी व त्याबरोबरच सामाजिक जीवनाचा भाष्यकार असतो. त्यामुळें ज्या काळांत तो वावरतो त्या काळांतील निरनिराळ्या आंदोलनाबरोबर त्याच्या लेखणीला उदासीन राहतां येणें सुतराम् शक्य नसतें. आणि म्हणूनच बसु बिलापासून ते अराजकतेपर्यंतचे सर्व प्रश्न नाथमाधवांनीं आपल्या सामाजिक कादंबऱ्यांतून हाताळले आहेत; परंतु नाथमाधवांचें वैशिष्ट्य एका निराळ्या मुद्यामुळें आपल्या प्रत्ययास येतें. आणि तें म्हणजे सामाजिक टीकाकाराच्या भूमिकेबरोबरच त्यांनीं कुटुंबव्यवस्थेच्या टीकाकाराची भूमिका स्वीकारून आपल्या सर्व सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यांच्या काळांत सर्व समाजसुधारकांचें लक्ष सामाजिक वा पर्यायानें राष्ट्रीय प्रगतीच्या मार्गांत धोंड म्हणून खड्या राहिलेल्या प्रश्नांकडे वेधलें होतें; परंतु ज्या कुटुंबसंस्थेच्या व्यवस्थापनेवर सबंध सामुदायिक जीवनाचें व्यवस्थापन अवलंबून असतें त्याकडे कुणींही विशेष लक्ष दिलें नव्हतें. दुर्लक्षित झालेले असे कौटुंबिक प्रश्न नाथमाधवांनीं आपल्या कादंबऱ्यांतून हाताळून, अशा प्रश्नांची उपेक्षा केल्यास कोणती हानी होते, हें आपल्या कादंबरींतील चित्रणाच्याद्वारें स्पष्टपणें दाखविलें.

## गृहशिक्षणाचें महत्त्व

नाथमाधवांच्या काळांत मध्यम वर्गीय महाराष्ट्रीय कुटुंबांमध्यें 'सावत्रपणाचा' प्रश्न अतिशय प्रबल स्वरूपांत वावरत होता. हा प्रश्न अत्यंत कुशलतेनें हाताळून सावत्रपणाच्या भावनेमुळें किती घोर परिणाम होतात याचीं त्यांनीं यथार्थ व वास्तविक चित्रें रेखाटलीं. 'सावत्र' हा शब्दच मत्सराचें व द्वेषाचें रण माजविणारा. त्यानें कित्येक कुटुंबें व घराणीं रसातळास पोंचविलीं आहेत एवढेंच नव्हे, तर खून आणि रक्तपात सुद्धां केले, असे त्यांनीं स्वतःच उद्गारही काढले आहेत. 'सापत्नभाव' या कादंबरींत सावत्र आईचें—नंदिनीचें जें व्यक्तिचित्र त्यांनीं रेखाटलें आहे तें अत्यंत परिणामकारक व वस्तुस्थितिनिदर्शक आहे. सावत्रपणाचा प्रश्न इतक्या जिव्हाळ्यानें दुसऱ्या कोणत्याही कादंबरीकारानें हाताळला नाहीं.

कै. नाथमाधव गृहशिक्षणाचे भोक्ते होते असें त्यांच्या कादंबऱ्या वाचल्यानंतर तात्काळ लक्षांत येतें. योग्य त्या गृहशिक्षणाच्या अभावीं लहान मुलांच्या मनांवर कशा प्रकारें संस्कार घडतात व पुढें त्यांचा स्वभाव तऱ्हेवाईक कसा बनतो, हें त्यांनीं 'देशमुखवाडी' व 'डॉ. कादंबरी' या दोन कादंबऱ्यांतून दाखविलें. यशवंत-शांता, कमलिनी आणि प्रभाकर या परस्परविरोधी जोड्या रेखाटून त्यांनीं योग्य गृहशिक्ष-

णाचा सुपरिणाम दाखविण्याचा प्रयत्न केला. ज्या कुटुंबामध्यें योग्य तें गृहशिक्षण नाहीं तें लवकर अधोगतीस जातें. गुणवान् व सुशील अशीं गृहरत्नें ज्यांच्या घरीं आहेत तें कुटुंब व पर्यायानें तो समाज सामर्थ्यवान व चारित्र्यवान झाल्याशिवाय राहाणार नाहीं हीं त्यांचीं आवडतीं तत्त्वें त्यांनीं आपल्या अनेक सामाजिक कादंबऱ्यांतून वाचकांना शिकविलीं.

## संयमशील लेखन

नाथमाधवांच्या कालखंडांत सुशिक्षित समाजामध्यें दिखाऊपणा वाढल्या प्रमाणावर दिसूं लागला होता. उथळ वृत्तीचे सुशिक्षित स्त्री-पुरुष सामाजिक सुधारणेच्या व व्यक्तिस्वातंत्र्याच्या मूलभूत तत्त्वांचा विपर्यास करीत असलेले आढळून येत होते. मार्ग चुकलेल्यांना योग्य ती दिशा दाखविण्याचा प्रामाणिक प्रयत्न नाथमाधवांनीं केला आहे, असेंच त्यांच्या सामाजिक कादंबऱ्या आपणांस दर्शवितात. नाथमाधव सुधारणेच्या विरुद्ध नव्हते. तसें असतें तर त्यांच्या मानसकन्यांचे त्यांनीं प्रौढविवाह केले नसते. त्यांना सुशिक्षितच नव्हे तर परदेशप्रयाण करण्याएवढें अतिशिक्षितही रंगविलें नसतें. परंतु सुधारणा जरी झाली तरी ती मानवेल तेवढीच असावी, नव्याजुन्या पिढीला अनुमत एवढीच असावी असा बालबोध दृष्टिकोण नाथमाधवांचा आहे. त्यामुळेंच त्यांनीं डॉक्टर कादंबरीला उच्च शिक्षण देऊनही अत्यंत शालीन किंबहुना पुराणांतील पंचकन्यांच्या तोडीची पतिनिष्ठ रेखाटली आहे. या कांहींशा बालबोध विचारसरणीमुळेंच त्यांची लेखणी अत्यंत संयमशील राहिली आहे. त्यांच्या कादंबऱ्यांतून खलनायक आहेत, पण ते दुष्टपणाचे मूर्तिमंत पुतळे नाहींत. त्यांच्या कादंबऱ्यांतून शृंगाररसाचा मर्यादित आविर्भाव आहे. कोणत्याही भावनेला वा विकाराला एका विशिष्ट कक्षेच्या बाहेर जाऊं न देण्याची सावधानता घेतल्यामुळें त्यांच्या कादंबऱ्यांतील कथासूत्रें बांधेसूद व रेखींव उतरलीं आहेत.

## मानवी जीवनाकडे पहाण्याची सूक्ष्म दृष्टी

नाथमाधवांच्या नंतरच्या युगांत मराठी कादंबरीनें मानसशास्त्राची दुशाल पांघरली. परंतु आपल्या आवडत्या तत्त्वांचा प्रचार करण्यासाठीं त्यापूर्वींच मनाचें शास्त्रीय दृष्टया पृथक्करण करण्याचा उपक्रम अभावितपणें कां होईना, नाथमाधवांनीं सुरू केला. डॉक्टर कादंबरींतील कमलिनीचा पति रघुनाथ किंवा शांता, 'सापत्नभाव' मधील नंदिनी, 'नटसम्राट' मधील नायक हीं स्वभावचित्रें वरील विधानाची साक्ष देतात. बहुतेक सर्वच कादंबऱ्यांतील पात्रांच्या स्वभावाचा विकास मनोविश्लेषण पद्धतीनें केला गेला आहे; त्यामुळें तें स्वभावचित्रण अत्यंत उठावदार व स्वाभाविक

झालें आहे, व त्यावरून कादंबरीकारांच्या मानवी जीवनाकडे पाहण्याच्या मार्मिक, सूक्ष्म व चिकित्सक दृष्टीचाही अनुभव येतो.

## जिवंत स्वभावलेखन

बोधवादाची बैठक बहुधा कादंबरीच्या सहजसुंदर गुणांना मारक होत असते. इतकेंच नव्हे, तर त्यामुळें स्वभावलेखनांतही विसंगती उत्पन्न होते. परंतु नाथमाधवांच्या कादंबऱ्यांतून बोधवाद व कलात्मकता यांचा मनोहर मिलाफ झाला असल्याकारणानें सर्वसाधारणपणें बोधवादामागें रेंगाळत येणारे हे दोष आपोआपच टळले आहेत. याचें कारण म्हणजे मानवी मनाच्या नाजूक व संस्कारक्षम तंतूवरून यांनी अत्यंत हळुवार हातानें गज फिरवून युक्त व इष्ट पडसाद उमटविले आहेत. शिवाय आपल्या विशिष्ट तत्त्वांशीं त्याबरोबरच अत्यंत एकनिष्ठ राहिल्यानें त्यांच्या कादंबऱ्यांतून अभिजात गुणांचा सहज उत्कर्ष झाला आहे व स्वभावलेख जिवंत उतरले आहेत.

## त्यांच्या लेखणीचा गुणगौरव

याखेरीज, अत्यंत रसाळपणानें व खुलवून कथावस्तु वाचकांपुढें ठेवणें हाही एक महत्त्वाचा व ठळक विशेष त्यांच्या कादंबऱ्यांतून आढळून येतो. कथावस्तु कशी असावी यापेक्षां तिची मांडणी कशी केली आहे, यावर कादंबरीचें अर्धें यश अवलंबून आहे, असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. कै. नाथमाधवांनीं ही खुबी चांगलीच आत्मसात् करून घेतली होती आणि म्हणूनच ज्या काळांत हरीभाऊंच्या युगाची मोहिनी मराठी वाचकांच्या मनावर पसरली होती, ज्या वेळीं कै. वा. म. जोशांच्या रागिणीनें मराठी रसिकांचीं मनें भारून टाकलीं होतीं, अशा काळांतही नाथमाधवांच्या कादंबऱ्या लोकप्रिय झाल्या, एवढेंच नव्हे तर नंतरच्या काळांत 'फडके-खांडेकर' यांच्या लालित्यपूर्ण लेखणीबरोबरही नाथमाधवांची लेखणी तगून राहिली, यांतच तिचा 'गुणगौरव' आहे.

कालमानाप्रमाणें वाङ्मयीन कसोटीमध्येंही फरक पडत जातो. नाथमाधवांच्या कादंबरीला आजची कसोटी कदाचित् लागू पडणार नाहीं. उज्वल प्रतिमेचा उत्कट उत्कर्ष कदाचित् त्यांच्या कादंबरींत आढळून येणार नाहीं; परंतु अव्याहतपणें जें मनाला भासमान झालें व पटलें तें प्रामाणिकपणानें मराठी वाचकांच्या पुढें ठेवण्याचा जो अमर्याद उत्साह कै. नाथमाधवांनीं दाखविला, त्याबद्दल त्यांचें आदरयुक्त कौतुक प्रत्येक समंजस वाचकानें करावयास हवें असें मला वाटतें.

---